ग्रंथसंपादक व प्रसारक मंडळीची ग्रंथमाला.

ग्रंथ ३२ वा.

# मेकालेसाहेबांचें चरित्र.

लेखक

रा. रा. नारायण लक्ष्मण फडके, बी. ए.

प्रकाशक

दामोदर सांवळाराम आणि मंडळी.

मुंबई व बडोदें.

मुंबई,

" इंदुप्रकाश " स्टीम प्रेसमध्यें छापिलें.

ता. १ दिसेंबर सन १९०६. इसवी.

किंमत १॥ रुपया.

# प्रस्तावना.

प्रस्तुत लेख सर जॉर्ज ट्रेव्हेल्यनकृत " Life & Letters of Lord Macaulay" (लॉर्ड मेकाले यांचें चरित्र व पत्रें) नामक जो इंग्रजींत अत्यन्त प्रसिद्ध ग्रंथ आहे, त्याच्या आधारानें तयार केलेला आहे. इंग्रजींत जे अत्युत्तम ह्मणून नांवाजलेले "बासवेल्कृत जान्सनचें चरित्र," "लॉखार्टकृत सर वाल्टर स्कॉटचें चरित्र" इत्यादि थोडेसे चरित्रग्रंथ आहेत, त्यांपैकीं हा एक आहे, अशी याजबद्दल प्रसिद्धि आहे. तो दहा बारा वर्षांपूर्वी प्रत्यक्ष वाचण्यांत आला; तेव्हां तो तसाच आहे, अशी मनाची खात्री पटून त्याचा अल्प स्वल्प आस्वाद निव्वळ मराठी जाणणाऱ्या स्वदेशबंधूंस देतां येईल तर पाहवें, अशी मनास स्फूर्ति झाली, व तिच्या भरांत हा लेख सुमारें दहा वर्षांपूर्वी तयार केला. पुढें तो इतकी वर्षें कांहीं ना कांहीं कारणांनीं तसाच पडून राहिला. तो आज बडोदें येथील सुप्रसिद्ध ग्रंथसंपादक व प्रसारक मंडळीच्या कृपेनें प्रसिद्ध होत आहे.

हें प्रस्तुत प्रयत्नाच्या उत्पत्तीच्या संबंधानें झालें. आतां त्याच्या उपयुक्ततेच्या संबंधानें पाहतां, प्रस्तुत चरित्राच्या नायकाचा हिंदुस्थानाशीं एका काळीं किती निकट संबंध होता, त्याचीं एतद्देशीय लोकांस पाश्चात्य शिक्षण द्यावें किंवा नाहीं• ह्यासंबंधानें किती खोल व उदार मतें होतीं, आणि तीं अमलांत आणण्यासाठीं त्यानें किती निर्व्याज श्रम केले, ह्या गोष्टी इतिहासप्रसिद्ध आहेत, आणि त्यांचा विशेष उल्लेख प्रस्तुत ग्रंथांतहि आलेलाच आहे. तेव्हां अशा पुरुषाच्या चरित्राची माहिती आपणास असणें किती आवश्यक

आहे, हें विशेष खुलासेवार रीतीनें सांगितलें पाहिजे असें नाहीं. मात्र त्या दृष्टीनें प्रस्तुत लेख कितपत उतरला आहे, हें पाहणें अर्थात् सुज्ञ वाचकांकडे आहे.

मुळांतील इंग्रजी ग्रंथ जरी अत्यन्त हृदयंगम व बोधप्रद वठलेला आहे, तरी तो चरित्रनायकाच्या फार लाडक्या अशा एका भाच्याच्या कलमांतून उतरलेला असल्यामुळें त्यामध्यें पक्षपातित्व व अतिशयोक्ति यांचा कांहींना कांहीं तरी अंश असणें बहुतेक अनिवार्यच होतें; आणि मूळ ग्रंथाच्या महत्त्वाच्या सर्व अंगांचें प्रतिबिंब मराठींत होईल तेवढें हुबेहुब उठवावें अशी मनाची निदान इच्छा असल्यामुळें, त्या अंशाची छटा यांतहि अवश्य उतरलीच असेल, यांतहि बिलकूल शंका नाहीं; पण त्यास उपाय नव्हता, असें वाटतें.

असो; शेवटीं हा स्वल्प प्रयत्न ग्रंथसंपादक मंडळीचे उदार आश्रयदाते गोड करून घेतील अशी आशा प्रदर्शित करून ही छोटी प्रस्तावना पुरी करूं.

ना. ल. फडके.

# प्रकाशकांचे दोन शब्द.

श्रीमंत युवराज फत्तेसिंहराव गायकवाड, छोटे महाराज साहेब, मुंबई युनिव्हर्सिटीच्या प्रवेशपरीक्षेत उत्तीर्ण झाल्यानंतर त्यांची स्वारी इंग्लंड देशाच्या विश्वविद्यालयांत अभ्यास करण्याकरिता ता. १९ एप्रिल सन १९०१ रोजीं गेली. त्या वेळच्या स्मरणार्थ आमचे विद्याभिलाषी श्रीमंत सयाजीराव महाराज गायकवाड सरकार यांनीं ग्रंथसंपादक व प्रसारक मंडळीस १२०० बाराशें रुपयांची देणगी दिली; व त्या रकमेच्या व्याजांतून उपयुक्त ग्रंथ तयार करवून ते श्रीमंत युवराजांस अर्पण करावे असें कळविलें. त्याप्रमाणें सन १९०२ सालीं अमीर अबदुल रहिमान यांचें चरित्र श्रीमंत युवराज फत्तेसिंहराव महाराज यांस समर्पण करण्यांत आलें, व आज हें लॉर्ड मेकाले यांचं चरित्र समर्पण करण्यांत येत आहे.

प्रकाशक.

# अनुक्रमणिका.

| प्रकरण. | विषय. | पृष्ठ. |
| --- | --- | --- |

# मेकाले साहेबांचें चरित्र.

## प्रकरण पहिलें.

### जन्म व शिक्षण.

कोणत्याही माणसाचें चरित्र लिहावयाचें म्हटलें ह्मणजे त्याच्या पूर्वजांची थोडीशी हकीकत देण्याची चाल आहे. त्याचा एक उद्देश बहुधा असा असावा कीं, आनुवंशिक तत्त्वास अनुसरून कुळांतील कोणत्या माणसांचे कोणते गुण चरित्रनायकाच्या स्वभावांत उतरले होते, ह्याचा त्याजवरून साधारणपणें झाल्यास अंदाज करतां यावा. ह्मणून त्या पद्धतीस अनुसरून मेकाले साहेबाच्या पूर्वजांची थोडीशी हकीकत येथें सांगतों.

आमच्या चरित्रनायकाच्या पणजाचें नांव ऑले मेकाले ह्मणून असून तो स्काटलंद देशांत एका गांवीं धर्माध्यक्षाचें काम करीत असे. ह्यास एकंदर चवदा मुलें होतीं. पैकीं केनेथ नांवाच्या एका मुलानें 'सेन्ट किल्डाचा इतिहास' नांवाचा एक लेख लिहिली होता अशी प्रसिद्धि आहे. तात्पर्य 'इंग्लंडचा इतिहासकार' ह्मणून जी आमच्या चरित्रनायकाची ख्याति आहे, त्याचें बीज कोणास पाहिजे असल्यास तें ह्या त्याच्या पूर्वजाच्या ठिकाणीं दृष्टीस पडतें, असें मानतां येईल.

ऑले मेकालेचा वडील मुलगा व आमच्या मेकालेचा आजा जॉन मेकाले ह्याचें जन्म इ. स. १७२० ह्या सालीं झालें. तोहि धर्माध्यक्षाचेंच काम करीत असे. त्याची वक्तृत्वशक्तीविषयीं फार ख्याति असे. त्याचीं दोन लग्नें झालीं होतीं. पैकीं पहिली बायको पहिल्या बाळंतपणाचे वेळींच निवर्तली. दुसरें लग्न त्यानें १७५७ सालीं केलें. ह्या बायकोपासून त्यास बारा मुलें झालीं; व त्या सर्वांचें संगोपन त्यानें स्कॉच लोकांच्या जुन्या पुराण्या पद्धतीस अनुसरून केलें:—ती कोणती ह्मणाल तर स्वच्छ हवा, साधें अन्न, आणि धार्मिक व व्यवहारिक उत्तम शिक्षण.

जॉन मेकालेचीं बरींच मुलें उदयास आलीं. ऑले व आलेक्झांडर हे धर्मखात्यांत शिरले. कॉलिन नांवाचा दुसरा एक मुलगा ईस्ट इंडिया कंपनीच्या सैन्यांत शिरला, व जनरल होऊन मेला. पण ह्या सर्व मुलांत झशारी मेकाले हा पुढें फार प्रसिद्धीस आला; आमच्या चरित्रनायकाचा हाच बाप होय. ह्याचें जन्म १७६८ सालीं झालें. तो सोळा वर्षांचा असतांच जमेका बेटांत गेला, व तेथें त्यास एका शेतवाडीच्या व्यवस्थापकाचें काम मिळालें. त्यावेळीं तेथें शेतांचीं वगैरे कामें शिद्दी गुलामांकडून करवीत असत; ह्मणून तें काम करीत असतां, अर्थात् गुलामगिरी ह्मणजे काय, ह्याची माहिती त्यास चांगली झाली. गुलाम करून ठेवणें ही चाल वाईट आहे, असा त्याचा कांहीं पूर्वीपासूनचा ग्रह नव्हता, व त्याचा पोटाचा उद्योग पाहतां, ती चाल कायम रहावी ह्यांतच त्याचा फायदा होता, शिवाय, ह्या चालीचा उल्लेख बायबलांत केलेला असल्यामुळें त्याच्या बापाचें मत तर तिला अनुकूळ असेंच होतें, व बापाबद्दल मुलाच्या मनांत अर्थात् पूज्यबुद्धि होती.

असें असूनही पुढें त्याचें मत अनुभवावरून बदललें. त्या लोकांस केवळ जनावरांप्रमाणें वागवितात, त्यांस शिक्षण ह्मणून

कोणतेंच मिळत नाहीं, इत्यादि गोष्टी पाहून त्यास फार वाईट वाटलें. प्रथम त्यानें त्यांचें दुःख होईल तितकें कमी करण्याची खटपट आरंभिली; पण शेवटीं व्यवस्थापकांच्या कामास कंटाळून तें काम अगदीं नीतीविरुद्ध आहे अशी त्याची खात्री होऊन, मोठी नोकरी मिळत असतां तिजवरही पाणी सोडून वयाच्या चाविसाव्या वर्षी तो स्वदेशास परत आला.

या वेळीं इंग्लंदांतील कित्येक लोकांच्या मनांत ह्याच्यासारखेच विचार यावयास लागले होते, व आपल्या वसाहतींतून गुलामगिरी राहूं देणें ह्मणजे आपणा प्रत्येकास लाजिरवाणें आहे, असें त्यांस वाटूं लागलें होतें. ह्मणून अशा लोकांनीं ही चाल मोडून टाकण्याची खटपट सुरू केली, व झशारी मेकाले हा त्यांस आनंदानें मिळाला. खुद्द इंग्लंदांत कोणीही गुलाम ह्मणून रहावयाचा नाहीं, त्यानें इंग्लंदच्या किनाऱ्यावर पाय ठेविला कीं तो गुलामगिरींतून मुक्त झालाच, ही गोष्ट दहा वर्षांपूर्वींच कायद्यानें ठरून गेली होती. पण ह्या मुक्त झालेल्या शिद्दयांचें करावयाचें काय, हा मोठा प्रश्न त्या वेळीं उत्पन्न झाला होता. ह्मणून वर निर्दिष्ट केलेल्या लोकांनीं अशी एक तोड काढिली कीं, असल्या शिद्दयांची वसाहत सेरा लोन नामक आफ्रिकेच्या एका किनाऱ्यावरील प्रदेशांत करावी. ह्या उद्देशानें त्यांनीं एक कंपनी स्थापन केली; व झशारीचा पूर्व वृत्तांत ऐकून त्याची नेमणूक त्या वसाहतीच्या गव्हर्नराचे ठिकाणीं त्यांनीं मोठ्या खुशीनें केली.

पण हें काम फार बिकट होतें. आफ्रिकेंतून गुलाम भरून नेण्याचें काम ह्या किनाऱ्यावर जारीनें चाललेलें असे; तेव्हां अर्थात् गुलामांचे व्यापारी ह्या कंपनीचा द्वेष करूं लागले, व तिच्या कामांत येतील तेवढीं विघ्नें आणूं लागले. स्वतः मुक्त झालेले

शिद्दीशी नियमानें उद्योग करण्यास किंवा लिहिणें वाचणें वगैरे शिकण्यास तयार होते असें मुळींच नाहीं. ह्मणून प्रथम गलबतांतून आणलेले पदार्थ खाऊन पिऊन फन्ना पाडण्याचें काम तेवढें मात्र त्यांनीं चांगल्या रीतीनें पार पाडलें; पण पुढें जेव्हां खाणें बेतावर आलें व काम खरोखर अंगावर पडूं लागलें, तेव्हां ही मंडळी गव्हर्नरावर बिथरली, व वरचेवर बंडाळी करूं लागली.

अशा प्रसंगास टक्कर देण्यास हुशारी मेकाले फारच योग्य माण होता. त्याच्या अंगीं सहनशीलता, आत्मनिग्रह व दीर्घोद्योग हे ग असून, शिवाय इतकें स्थिर धैर्य होतें कीं, कशीही वेळ आली डगमगावयाचें नाहीं. ह्मणून तो तसाच आपल्या कर्तव्यास चि राहिला; आणि हवा तापकरी असतां, व त्याच्यावर अनेक रच्या कामांचें ओझें एकट्यावरच पडत असतां, तें सगळें त्यानें थोडक्याच काळांत ती वसाहत नांवारूपास आणिली. त्यान तेथें एक शहर वसविलें, शेतें पाडिलीं, व शाळा स्थापिल्या. नीग्रो लोकांस शिकण्यास उत्तेजन देण्याकरितां त्यानें असा कायदा केला कीं, जे लिहावयास व वाचावयास शिकतील, त्यांस शरीर-कष्टाचें काम अगदीं थोडें सांगावें.

पण अशा रीतीनें हें गाडें सुयंत्रित चाललें असतां १७९४ सालीं त्याजवर एक जबरदस्त वावटळ आली. पांच वर्षांपूर्वीं फ्रान्स देशांत जी महा राज्यक्रांति उडून गेली होती, तिच्या सपा-ट्यांत इंग्लंद व फ्रान्स यांजमध्यें लढाई सुरू झाल्यामुळें कांहीं फ्रेंच लोक सैरा लोनवर चाल करून आले; त्यांनीं वसाहतीची धूळधाण करून टाकिली, व होतें नव्हतें तें घेऊन ते चालते झाले. त्यांनीं हुशारीनें तसें करूं नये ह्मणून पुष्कळ प्रयत्न करून पाहिले, पण कांहीं वळलें नाहीं. पुढें काटकसरीनें वागून व इंग्लंदांतून पैसे

नेऊन त्यानें एका वर्षांत त्या वसाहतीस सरासरी पूर्व स्वरूप आणून दिलें; व नंतर हार्डी ज्वरानें व्यथित होत्साता इंग्लंदास प्रकृति सुधारण्याकरितां परत आला.

इंग्लंदास परत आल्यावर विल्यम विल्बरफोर्स, हेन्री थार्न्टन वगैरे वरील कंपनीचे जे मुख्य उत्पादक त्यांचा त्याचा निकट व कायमचा स्नेह जमला. व त्यामुळें त्याच कंपनींतील जी हाना मूर नांवाची इतिहासप्रसिद्ध बाई तिला भेटण्याकरितां त्यांस ब्रिस्टल शहरीं जावें लागलें. त्या ठिकाणीं सेलिना मिल्स ( ही त्याची भावी पत्नी ) ह्मणून एक मुलगी शिकावयास राहिली होती, तिची त्याची गांठ पडली. ती फारच सुंदर असे ह्मणून ह्मणतात. तिचा बाप क्केकर नामक पंथाचा असून तो पुस्तकें विकण्याचा धंदा त्या शहरीं पूर्वी करीत असे. या वेळीं तो निवर्तला होता. त्याचा एक मुलगा त्या शहरांतील एका वर्तमानपत्राचा संपादक असून तें काम तो फार चांगल्या रीतीनें करीत असे. तो फार आनंदी व चतुर माणूस असून गोष्टी सांगण्याच्या कामांत फार हुशार असे.

असो. ह्या मुलीवर झशारीचें प्रेम जडलें, व तीही त्याजवर प्रीति करूं लागली. ह्या प्रेमसंपादणीस त्या मुलीच्या नातेवाईकांनीं अडथळा आणण्याचा बराच यत्न केला; पण शेवटीं हाना मूरच्या खटपटीनें वाग्निश्चय ठरला. तथापि तिला ते त्याजबरोबर आफ्रिकेंत जाऊं देईनात, ह्मणून लग्न मात्र व्हावयाचें राहिलें. तेव्हां आपली बहीण मिसेस बाबिंग्टन हिजजवळ तिनें रहावें, अशी व्यवस्था करून तो १७९६ सालीं परत आफ्रिकेंत गेला.

त्याच्या गैरहजिरींत नीग्रो लोकांनीं भयंकर दंगा आरंभिला होता, त्याचा तेथें गेल्यावर त्याला प्रथम निकाल लावावा लागला. तें बंड त्यानें दमशमादि सौम्य उपायांची योजना करून मोडिलें.

पण त्यानें आपल्याबरोबर कांहीं मिशनरी नेले होते, त्यांनीं मात्र तारावर पाय ठेवल्यापासून आपापसांत भांडून त्याचें डोकें भणाणून सोडिलें. तेव्हां त्यांस सुटें करून त्यांचीं तोंडें त्यास जबरीनें बंद करावीं लागलीं. ही गोष्ट जेव्हां त्यानें पुढें कंपनीच्या मुख्यास कळविली, तेव्हां त्यानें पुढील गोष्ट त्यास सांगून त्याचें समाधान व जबाबदारींतून आपली मोकळीक करण्याचा यत्न केला. ती अशी. एका नोकरास कांहीं झुंजणारे कोंबडे एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं न्यावयाचे होते; ते त्यानें निरनिराळे न घेतां मेहनत वांचविण्यासाठीं एकाच पोत्यांत घालून घेतले; पुढें इष्ट ठिकाणीं जाऊन उघडून पाहतो तों त्यांनीं एकमेकांस फाडून टाकिलें आहे. पुढें त्याच्या ह्या मूर्खपणाबद्दल जेव्हां त्याचा मालक त्यास बोलूं लागला तेव्हां तो ह्मणाला, "महाराज, सगळे कोंबडे तुमचेच असल्यामुळें मला वाटलें कीं, ते सर्व एकाच पक्षाला लढतील, व ह्मणून मी तसें केलें."

असो. सेरा लोन येथें तीन वर्षें राहून व हे सर्व बखेडे मोडून त्यानें त्या सर्व वसाहतीस इतक्या नांवारूपास आणिलें कीं, पुढें कांहीं वर्षांनीं सरकारानें ती वसाहत विकत घेतली. शेवटीं आपण एकीकडे व आपली भावी पत्नी दुसरीकडे ही स्थिति त्यास, तीस व नको नको ह्मणणाऱ्या तिच्या नातेवाईकांस, तिघांसही असह्य होऊन तो नोकरी सोडून १७९९ त इंग्लंदास परत आला, व त्याच वर्षाच्या आगस्ट महिन्यांत त्यानें तिजशीं लग्न केलें.

ह्या लग्नापासून त्यास १८०० च्या आक्टोबर महिन्यांत जो पुत्र झाला तोच आमचा चरित्रनायक. त्याचें त्यानें टॉमस बाबिंग्टन मेकाले असें नांव ठेविलें. अगदीं लहानपणापासून ह्या मुलाच्या विलक्षण बुद्धिमत्तेचीं चिन्हें दिसूं लागलीं. तो तीन वर्षांचा झाला

तेव्हांपासूनच एकसारखें वाचीत बसावें, असा त्यास नाद लागला. हें कोणास खरें देखील वाटावयाचें नाहीं. पण जॉन स्टुअर्ट मिल्ल हा त्याच वयांत ग्रीक व ल्याटिन शिकावयास लागला होता, हें ध्यानांत आणिलें, ह्मणजे प्रस्तुत गोष्टीचें अमळ कमी आश्चर्य वाटेल; निदान प्रथमदर्शनीं भासणारा असंभाव्यपणा तरी कमी होईल. त्यानें जमिनीवर पुस्तक ठेवावें, व हातांत लोणी भाकर घेऊन शेकोटीसमोर कांबळ्यावर वाचीत पडावें! पुस्तक हातांत घेण्याची सोय नाहीं, कारण तें बहुधा त्याच्या वजनाचें असावयाचें !

त्याला खेळण्याची आवड मुळींच नसे. मात्र बाहेर फिरावयास जाण्याची हौस त्यास फार असे; व फिरावयास गेला ह्मणजे दाई किंवा आई जी कोणी बरोबर असेल तिला तो लांबलचक व्याख्यानें देत सुटत असे. तीं व्याख्यानें ह्मटलीं ह्मणजे कधीं न संपणाऱ्या स्वकपोलकल्पित गोष्टी असावयाच्या, किंवा त्यानें वाचिलें असेल त्याची त्याच्या वयास न शोभेल अशा प्रगल्भ भाषेंत पुनरुक्ति असावयाची. त्याची स्मरणशक्ति इतकी विलक्षण असे कीं जें पुस्तक त्यानें नुक्तेंच वाचिलें असेल त्यांतील शब्दयोजना त्याच्या सहज लक्ष्यांत राही, व तो ती आपल्या बोलण्यांत तशीच उठवी. ह्यावरून त्याची दाई असें ह्मणे कीं हा "निवळ छापील भाषा" बोलतो. असलें बोलणें अगदीं नाटकी दिसावें, व पुष्कळ वेळां हास्योत्पादक व्हावें, ह्यांत कांहीं नवल नाहीं. हन्ना मूर ही बाई तो चार वर्षांचा असतां एकदा त्याच्या घरीं गेली होती. तेव्हां आईबापें बाहेर गेलीं आहेत असें सांगून तो तीस ह्मणाला, "आपण मेहेरबानीनें घरांत याल तर आपणास 'जुन्या दारू' चें एक ग्लास देऊन मी आपला पाहुणचार करीन." बाईची धांव सौम्य मद्यांच्या पलीकडे कधीं गेलेली नसल्यामुळें हें ऐकून ती जरा

चकितच झाली, व तिनें ‘ जुनी दारू ’ ह्मणजे तूं काय समजतोस ह्मणून विचारिलें. तेव्हां रॉबिन्सन क्रूसो वरचेवर ती घेत असे ह्यापलीकडे त्यास कांहीं सांगतां आलें नाहीं. ह्याच वयाच्या सुमारास त्याच्या बापानें त्यास एका श्रीमंत बाईकडे नेलें असतां तेथील एका नोकरानें कांहीं गरम काफी त्याच्या पायावर सांडिली. घरधनिणीस अर्थात् फार वाईट वाटलें व ती त्याच्यापाशीं जाऊन मोठ्या कळवळ्यानें त्याला पुसूं लागली, बाळा, तुला कसें काय वाटतें ? तेव्हां ह्या छोटेखानी स्वारीनें मान वर करून तिजकडे पाहून ह्मटलें, “ बाईसाहेब, फार आभारी आहें, वेदना किंचित् शमली आहे !! ”

कोणास कदाचित् वाटेल कीं, हा लहान मलगा हें जें चमत्कारिक बोले, हा कदाचित् त्याच्या बढाईखोरपणाचा किंवा ढौलीपणाचा परिणाम असावा. पण तशी मुळींच गोष्ट नव्हती; कारण ह्याच्यापेक्षां अधिक सरळ किंवा आनंदी मूल कधींच कोणी पाहिलें नसेल, अशी सर्वांची साक्ष पटते.

तो अगदीं मूल असतानांच त्यास ग्रीव्हस् नांवाच्या कोणा एका पंतोजींच्या शाळेंत घालते वेळीं आई त्यास ह्मणाली, “ टाम, तुला आतां लोणी भाकर हातांत न घेतां अभ्यास करावयास शिकलें पाहिजे ” मुलगा उत्तर करितो, “ होय, आई, उद्योग ही माझी भाकरी व अवधान हें माझें लोणी असें मी समजेन ” पण वास्तविक रीत्या पहातां शाळेस जाण्यास ह्याच्याइतकें दुसरें कोणतेंच मूल कधींही कंटाळलें नसेल. मधल्या सुटींतलें जेवण झालें ह्मणजे मला आतां शाळेंत पाठवूं नको, अशी रोज त्यानें आईची केविलवाण्या शब्दांनीं विनवणी करावी. पण आईनें रोज

एकच उत्तर द्यावें, " छे, टाम, पाऊस जरी धो, धो, पडत असला, तरी देखील तुला मी घरीं ठेवून घेणार नाहीं. "

शाळेस जाण्यास तो इतका नाखुष असे, ह्याला एकच कारण नव्हतें. त्याचें शरीर शाळेंत गेलें तरी चित्त घरीं राही; शिवाय, शाळेंतले धडे करावयाचे ह्मणजे आपले जास्त आवडते व महत्वाचे उद्योग एकीकडे ठेवावयाचे, असें त्यास बहुधा वाटत असावें; कारण ह्या त्याच्या वयांत त्याचें इतर वाचनलेखन फारच सपाट्यानें चाललें असावें असें दिसतें. १८०८ सालीं त्याची आई लिहिते:—" माझ्या लाडक्या टामच्या विलक्षण बुद्धिमत्तेचीं चिन्हें पहिल्या सारखींच अद्यापि दिसतात. सर्व प्रकारच्या अभ्यासांत त्याची प्रगति विलक्षण रीतीनें चाललेली आहे; व त्याच्या वयास अद्यापि आठ वर्षें पुरीं झालीं नाहींत हें ध्यानांत आणिलें ह्मणजे त्याच्या वाचनाचा विस्तार, व त्यापासून त्यास प्राप्त झालेलें ज्ञान, हा खरोखरच आश्चर्यकारक भासतात. इतकें असूनही तो मांजराच्या पोराइतका खेलाडू आहे. त्याच्या मनाच्या तरतरीची कांहीं कल्पना तुह्मांस व्हावी एतदर्थ कांहीं उदाहरणें मी सांगतें. एका वर्षापूर्वी जगाच्या इतिहासाचें सार काढावयाचें असें वेड त्याच्या डोक्यांत शिरलें, व सृष्टि निर्माण झाल्यापासून तों आजतागायतच्या इतिहासांतील मुख्य मुख्य गोष्टींची बरीच हकीकत त्यानें तयार केली. त्याचे सरासरी चोवीस ताव भरले...त्यानें स्तोत्रें किती रचिलीं आहेत हें तर मला सांगतांच येत नाहीं...." त्यानें लहान वयांत शाळा साधून व पोरखेळ न दवडून जीं बाडेच्याबाडें खरडलीं त्यांत विशेष हें कीं, व्याकरण, स्पेलिंग ह्यासंबंधानें त्यांत चुका बिलकूल दिसत नाहींत, इतकेंच नव्हे, तर विरामचिन्हें जागच्या जागीं देणें, अर्थवैशद्य सांभाळणें, इत्यादि ज्या गोष्टी त्याच्या प्रौढ वयांतील लेखांत भरलेल्या आहेत, त्या देखील ह्या बाललेखांत दृग्गोचर होतात.

ह्या वयांत त्याच्या आईबापांचें त्याच्याशीं वर्तन फारच दूरदर्शित्वाचें असे. त्याचे लेख त्यांनीं कधींच मंडळीपुढें काढूं नयेत, किंवा आपल्या भाषणशैलीचा किंवा स्मरणशक्तीचा दिमाख लोकांपुढें करण्यास त्यास उत्तेजन कधींच देऊं नये. आपल्या सोबत्यापेक्षां आपण पुढें अधिक श्रीमंत होणार आहों हें आपल्या मुलांस समजूं नये, एतदर्थ एकादा शहाणा क्रोडोपति जितकी खबरदारी घेत असेल, तितकीच खबरदारी, मिस्तर व मिसेस मेकाले आपल्या मुलास त्याची विलक्षण बुद्धिमत्ता समजून येऊं नये, ह्मणून घेत असत. ह्या लहानपणाच्या कडकडीत शिक्षणाचा एक परिणाम असा झाला कीं, त्यास घमेंड किंवा पोकळ डौल ह्मणून कधीं झाला नाहीं. दुसरा परिणाम असा झाला कीं, सामान्यतः माणसास किती ज्ञान असावें ह्याजबद्दलचा त्याचा अंदाज नेहमीं चुकत असे, आपल्यावरून दुसऱ्यांचा अजमास तो करीत असे; ह्यामुळें त्यास मानव जातीला इतकें ज्ञान असावें ह्मणून वाटे कीं, तितकें ज्ञान प्रथम संपादन करण्याचें, किंवा पुढें कायम राखण्याचें, सामर्थ्य फारच थोडक्यांस असेल. त्याचा ज्ञानाचा मोठा सांठा व त्याच्या सोबत्यांच्या ज्ञानाच्या लहान लहान पुंज्या ह्यांमध्यें किती अंतर आहे, हें त्यास कळूं नये ह्मणून त्याच्या आईबापांनीं जर इतकी खबरदारी घेतली नसती, तर लॉर्ड मेकालेच्या लेखांत ‘ शाळेंतलें पोर ’ ह्या वचनाची इतकी रेलचेल बहुधा दृष्टीस पडली नसती.

अशा रीतीनें त्यास जसें घरीं कडकडीत शिक्षण मिळत असे, तसेंच तो हाना मूर हिच्या घरीं गेला ह्मणजे तेथेंही मिळत असे. ती बाई व त्या घरांतील इतर बाया ह्या त्यास फारच ममताळूपणानें व शहाणपणानें वागवीत; त्याच्या लिहिण्यावाचण्यास उत्तेजन देत; धनस्पतिशास्त्र शिकविण्यासाठीं ह्मणून त्यास बागेंत नेत, आणि

त्यानें वाचन सोडून अंग मेहनत करावी ह्मणून त्यास छप्परासभों-वतींच्या जाग्यांतून धांवावयास लावीत किंवा स्वयंपाक घरांत भातुकली तयार करावयास लावीत. त्यांचा चुलता जनरल मेकाले हा हिंदु-स्थानांतून १८१० त परत आला. तोही पुतण्या पुतणींस फार चांगल्या रीतीनें वागवी. तो हाताचा सढळ असे. त्यामुळें मुलांस एरवीं कोणी घेऊन देणार नाहीं अशीं पुस्तकें मिळत; व तो त्यांस बाहेर फिरावयास वगैरे नेत असल्यामुळें व खाऊच्या वगैरे भातु-कल्या त्यांजकरवीं करवीत असल्यामुळें, त्यांचें नेहमींचें जें एकतंत्री राहणें त्यांत जरा नवीनपणाची भर पडून त्यांस कर्मणूक होई, व अभ्यास करण्यास नवी नवी तरतरी येई.

या वेळीं झशारी मेकांलेला उत्पन्न चांगलें होतें, व दिवसें दिवस तें वाढत चाललें होतें; कांहीं दिवस तो सेरा लोन कंपनीचा सेक्रेटरी असून त्यास वर्षाचा ५०० पौंड पगार मिळत असे. पुढें तो व त्याचा मेहुणा बाबिंग्टन ह्या दोघांनीं मिळून भागीचा व्यापार सुरू केला. ही कंपनी आफ्रिकेंत माल पाठविणें व तेथून आणणें हा धंदा करीत असे. बापाची या वेळची मध्यमपणाची स्थिति मुलांच्या फार फायद्याची होती. कारण त्यांस सुखासमाधानास आवश्यक अशा सर्व गोष्टी मिळत होत्या, व चैनीच्या वस्तू ह्मणून मुळींच मिळत नसत. मोठा मुलगा १३ वर्षांचा होतो न होतो तों त्यास तीन भाऊ व पांच बहिणी इतकीं भावंडें झालीं होतीं. त्यामुळें काटकसर करणें, व साध्या रीतीनें राहणें, ह्या गोष्टी त्या कुटुंबास आवश्यकच झाल्या होत्या.

१८१२ सालीं असें स्पष्ट दिसूं लागलें कीं, मेकालेचें पुढचें शिकणें तो गांवांतल्या ज्या शाळेंत इतके दिवस जात असे, तेथें होण्याचा संभव नाहीं; तेव्हां त्याच्या शिकण्यासाठीं आपण सर्वांनींच

लंदन शहरीं रहावयास जावें व त्यास वेस्टमिन्स्टर येथील प्रसिद्ध अशा सार्वजनिक शाळेंत पाठवावें, असा त्याच्या बापानें मनांत विचार आणिला, पण तो न जमून शेवटीं त्यास कॅंब्रिज शहरानजीक शेल्फर्ड नामक गांवीं प्रेस्टन नामक पाद्याच्या हाताखालीं शिकावयास नेऊन ठेविलें. ह्या शिक्षकाचे विचार धर्मविषयक व इतर बाबतींत जरी जरा कोते असत, तरी तेथें गेल्यापासून मेकालेचा एकंदरींत फायदाच झाला. कारण आपल्या विद्यार्थ्यांना आपण शिकवावें केव्हां, व त्यांसच स्वतः शिकूं द्यावें केव्हां, ह्या गोष्टी त्या शिक्षकास चांगल्या समजत असत. शिवाय, कॅंब्रिज शहर नजीक असल्यामुळें तेथील रीतीभाती, शिकण्याच्या व्यवस्था, तेथील मुलांच्या विचारपद्धति, व मोठमोठाल्या परीक्षा देण्याच्या व बक्षीसें मिळविण्याच्या हांवी, ह्या सर्व गोष्टी मेकालेस व त्याच्या सहाध्यायांस कळून येण्याचे योग सहज येत असत.

ह्या ठिकाणीं तो सरासरी २ वर्षें राहिला. त्या मुदतींत त्याचीं जीं घरीं पत्रें येत त्यांवरून पहातां त्याचा अभ्यास चांगला चालला होता असें दिसतें. त्याचा शिक्षक त्यास आवडेल तें सांगत असे व आपल्याबरोबर बाहेर फिरावयास नेत असे. गुलामगिरीची चाल बंद करण्याच्या कामांतील प्रमुख खटपटी जो विल्यम विल्बरफोर्स त्याचा वडील पुत्र याचा सहाध्यायी होता. त्याची व ह्याची निकट मैत्री जमली. शिवाय, या पत्रांवरून असें दिसतें कीं, मेकाले आतां फ्रेंच भाषेंतील ग्रंथ वाचावयास लागला होता, व बापामुलाचे पत्रव्यवहार केवळ प्रगती विषयांवर, किंवा त्याच्या शिकण्याच्या व वर्तनाच्या वगैरे संबंधानेंच होत असत असें नाहीं, तर राजकीय प्रश्नांच्या संबंधानें देखील होत असत. उदाहरणार्थ, १८१३ सालीं ईस्ट इंडिया कंपनीस जेव्हां नवी सनद मिळाली, तेव्हां खिस्ती धर्माचा प्रसार

करण्याची मिशनरींस परवानगी मिळावी ह्मणन फार खटपट झाली, त्या गोष्टीचा उल्लेख ह्या पत्रांतून आढळतो.

१८१४साली प्रेस्टन साहेबानें आपली शाळा शेल्फर्ड येथून काढून हर्टफर्ड प्रांतीं असेंडेने येथें नेली. अर्थात् मेकालेही तेथें गेला. हें स्थळ अगदीं एकीकडे होतें; व नजीक कॅंब्रिजसारखें मोठें शहर किंवा विद्यालयस्थान मुळींच नव्हतें. येथें त्यानें चार वर्षे काढिलीं; त्या मुदतींत त्याचें निरनिराळ्या विषयांवर एकसारखें वाचन चाललेंच होतें. व तें केवळ जलदीनें नव्हे, तर घाईनें चाललें होतें. त्यानें जें इतकें विस्तृत ज्ञान संपादन केलें, त्याला साधनें ईश्वराच्या दोन देणग्या होत्या; अचूक स्मरणशक्ति, व एकदा नजर टाकून सगळ्या पानांतील मजकूर ध्यानांत आणण्याचें बिलक्षण सामर्थ्य. लहानपणीं ज्यावर ह्मणून त्याचें मन जाई, तें त्यास मेहनतीशिवाय सहज पाठ येत असे. एकदा बापाबरोबर कोणाकडे भेटण्यास गेला असतां टेबलावर स्कॉट कवीचें ' ले ऑव् धि लास्ट मिन्स्ट्रेल ' ( शेवटच्या कवीचें गाणें ) हें काव्य पडलें होतें. तें त्याच्या पाहण्यांत पूर्वीं कधीं आलेलें नव्हतें. ह्मणून बाप घरच्या यजमानाशीं बोलत असतां तें त्यानें मुकाट्यानें वाचून टाकिलें, आणि घरीं आल्यावर, आई आजारी होती तिच्या बिछान्यावर तिच्यानें ऐकवतील तेवढे त्यांतील सर्ग ह्मणून दाखविले. एका काळीं त्याला आपल्या स्मरणशक्तीचा इतका भरंवसा वाटत असे कीं, तो ह्मणे कीं कांहीं कारणानें मिल्टनचें ' पाराडाइस लॉस्ट ' व बनियनचें ' पिल्ग्रिम्स् प्रोग्रेस ' ह्या पुस्तकांच्या जर सर्व प्रती नाहींशा झाल्या, तर ते ग्रंथ जसेच्या तसे मी पुनः तयार करूं शकेन. ४० वर्षांपूर्वीं वर्तमानपत्रांत वाचलेलें एक पद्य त्यानें एकदां ह्मणून दाखविलें होतें !

पुढें तो जसा मोठा होत चालला, तशी ही त्याची शक्ति एवढ्याच मानानें कमी झाली कीं दुसऱ्याचे लेख त्याला आपोआप पाठ होत नाहींतसे झाले. पण एकदा नजर फेकून छापील पानाचें पान ध्यानांत उतरवून घेण्याचें जें त्याचें विलक्षण सामर्थ्य, तें शेवटपर्यंत कायमच राहिलें. अखेरपर्यंत, इतर लोकांस एकादें पुस्तक चाळण्यास जितका वेळ लागतो, त्यापेक्षां कमी वेळांत तो तें वाचूं शकत असे, व इतर लोकांस त्याचीं नुसतीं पानें उलटण्यास जितका वेळ लागेल, त्यापेक्षां कमी वेळांत तो तें चाळून टाकूं शके. बरें, इतक्या जलद रीतीनें तो पुस्तकें वाची ह्मणून त्यांतलें कधीं उतरून घेण्याचा प्रसंग आला, तर त्यांत चुका करील असें कधीं होत नसे. कारण त्याची अशी समजूत असे कीं, जें एकदां छापून निघालें, त्याच्या उताऱ्यांत चूक करणें ह्मणजे पापच करणें होय; मग तें मूळ उत्तम बुद्धीच्या माणसानें लिहिलेलें असो, किंवा कागद शाईचा अपव्यय करणारानें लिहिलेलें असो.

अशी बुद्धिमत्ता, व कधींही तृप्त न होणारी अशी जिज्ञासा, ह्या दोन गोष्टींचा संयोग त्याचे ठिकाणीं झाला असतां, वयाच्या चवदाव्या वर्षापासून वाङ्मयाच्या एकंदर विस्तीर्ण क्षेत्रावर बहुतेकांशीं केवळ स्वेच्छेनुरूप भटकण्याची त्यास परवानगी मिळाली. मग काय विचारतां ? तो एकसारखा वाचीत सुटला. ह्यावेळीं शाळेंतील निबंधलेखनापलीकडे ग्रंथरचनेचें काम तो बहुतेक मुळींच करीत नसे, व तें निबंधलेखनही त्यानें आळसानें करावें. ह्या वेळीं त्याची काव्यदेवी बहुतेक मुकीच झालेली होती; मात्र यूरोपांत एकादी मोठी गोष्ट कांहीं झाली तर त्या वेळीं तिला थोडासा शब्द फुटे. उदाहरणार्थ, नेपोलियन रशियांतून पळून आला, तेव्हां तिला एकदा वाचा फुटली होती, व पुढें जेव्हां नेपोलियननें राज्य सोडून

दिलें, व युरोपांतील सर्व राष्ट्रांचीं सैन्यें पारीसमध्यें शिरलीं, तेव्हां मास्तरापाशीं त्याबद्दल सुटी मागावयाची ती कवितारूपानें मागण्या- विषयीं त्याच्या सहाध्यायांनीं ह्यास आग्रह केल्यावरून तेव्हां एकदा ह्याच्या काव्यशक्तीस ‘ उल्लास ’ आलेला होता.

त्याच्या शाळासोबत्यांमध्यें तो अप्रिय नव्हता. उलटा, त्यांना त्याचा अभिमान वाटे, व ते त्यास फार वाखाणीत. मात्र त्यास कोण- ताही खेळ खेळतां येत नाहीं, ह्याबद्दल त्यांस त्याची कींव येई. पण ह्या वेळीं लोकमताची तो बिलकूल पर्वा करीत नसे. त्याच्या ह्या वेळच्या पत्रव्यवहारावरून तो केवळ पुस्तकांमध्येंच गर्क झालेला होता, असें दिसतें. इतके दिवस त्याचीं पत्रें स्वाभाविक व सुंदर अशीं असत; पण त्यांजवर आतां पुस्तकी ज्ञानाची छटा झळकूं लागली; व तीं वाचून पहिल्या इतका आनंद होत नाहीं.

असो; अशा रीतीनें प्रेस्टन पंतोजींच्या हाताखालीं १८१८ पर्यंत राहून त्या सालच्या आक्टोबर महिन्यांत मेकाले केंब्रिज येथील ट्रिनिटि कालेज नामक विद्यालयांत शिकण्यासाठीं गेला. येथें थार्न्टन नांवाचा एक सोबती त्यास भेटला, व कालेज सोडीपर्यंत ते संगतीनें राहिले. प्रथम ते एकाच बिऱ्हाडांत रहात असत, व एकाच शिक्षकाचे हाताखालीं शिकत असत. त्यामुळें दोघांना एकेका तासाचे पैसे पडून दोन तास शिकावयास सांपडे. पण पुढें ही व्यवस्था थार्न्टन ह्यास मोडणें भाग पडलें. सामान्यतः केंब्रिज युनि- व्हर्सिटीची प्रसिद्धि गणित विषयाविषयीं फार आहे, व आक्स्फर्डची भाषाविषयाविषयीं आहे, हें सर्वांस ठाऊकच आहे. त्याप्रमाणेंच थार्न्टनचा भर गणितविषयाकडे फार होता, व शाळेंत असतांना मेकालेलाही तो विषय आवडत असे. पण कालेजांत आल्यावर ही त्याची आवड हळूहळू जात चालली, व प्रत्येक गणिताच्या प्रश्ना-

बद्दल तो काथ्याकूट करूं लागला. अशा रीतीनें वेळ घालविल्यास विषय कधींच पुरा होणार नाहीं, असें समजून थार्न्टन स्वतंत्र रीतीनें शिकूं लागला; व त्यानें केलें तें बरेंच केलें; कारण पुढें योग्य वेळीं गणितपरीक्षेंत पहिला येऊन तो जो सीनियर रांग्लर बनला, तो मेकाले बरोबर डोकें घांसून बहुधा कधींच बनला नसता.

असो. हे दोघे गडी एकत्र राहत असतां पार्लमेंताच्या एका सभासदाची निवडणूक चालू होती, व त्या संबंधानें शेजारच्या गल्लींत दंगा चालला होता. मेकालेला राजकीय व्यवहारासंबंधीं गडबड कोठें असली कीं तेथें गेल्याशिवाय कधीं चैनच पडत नसे. ह्मणून तो तेथें थार्न्टनला ओढून घेऊन् गेला. तेथें विरुद्ध पक्षांच्या लोकांची दंगल चालली होती. ते ऐकमेकांवर कुसके बटाटे, फाटके बूट, नासकीं आंडीं, सांपडेल तें फेकीत होते. त्या तडाक्यांत एक मेलेलें मांजराचें पोर मेकालेच्या थोबाडावर येऊन पडलें, व तेणें-करून त्याचीही मजा पाहण्याची हौस चांगलीच जिरली. ज्यानें तें फेंकिलें होतें तो त्याजपाशीं येऊन ह्मणतोः—बुवा, माफ करा, तुमचें आमचें कांहीं वांकडें नाहीं. तें मांजर मि० आर्डीन ह्याच्या अंगावर फेकण्याचा माझा उद्देश होता. मेकाले उत्तर करितोः— तुह्मी जर तें माझ्या अंगावर ह्मणून फेंकिलें असतें, व मि० आर्डीन यांस लागलें असतें, तर फार बरें झालें असतें!

पुढें थोडक्याच दिवसांनीं गांवांतलें बिऱ्हाड सोडून स्वारी कालेजांतच राहावयास गेली. कालेजांत असा नियम असतो कीं, बाहेर जाणारांनीं अमुक वाजल्याच्या आंत परत आलेंच पाहिजे. त्याहांतर दिंडी दरवाजा बंद होतो, व बेताबाहेर भटकणारांस थंडींत कुडकुडावें लागतें. अलीकडे ह्या कालेजांत अशा रात्रिंचरांचा एका खोलीच्या खिडकींतून चोरून प्रवेश होत असतो. ही चोरवाट

मेकालेच्या वेळीं सांपडलेली असती तरी मेकालेस तिजपासून फायदा झाला असता असें नाहीं. कारण कालेजाच्या आंत वाचण्यास हवीं तितकीं पुस्तकें, व गप्पा सांगण्यास हवे तितके स्नेही असतां दरवाज्याबाहेर पडण्याची इच्छा त्यास कधींच होण्याचा संभव नव्हता. कालेजांत जें कांहीं मिळण्यासारखें होतें त्या पलीकडे त्याला कशाचीही जरूर नसल्यामुळें हवें तें वाचावयास, हवी तितकी फुरसत, आपल्या वेळाचें पाहिजे तें करण्याची बहुतेक पूर्ण मुभा, व पाहिजे तेव्हां पूर्ण आवडीच्या मंडळींत जाण्याची सोय, ह्या गोष्टींतच तो आनंद मानीत असे. कालेजांतील मंडळी त्यास फार आवडे. कारण ही मंडळी अशी असते कीं खरें असेल त्याची त्यांच्याशीं किंमत होते; पण कोणी फुकट भपका किंवा दिमाख करावयास लागला, तर ते तोंडावर स्पष्ट सांगावयाचे. पुन कालेजांत अशी सोय असते कीं, आपणास आवडेल त्यांच्याशीं स्नेह करावा; दुसऱ्यांकडे ढुंकूनही पहाण्याचें कारण नाहीं. बरें तेथें गरीब, श्रीमंत, बडा, छोटा, हा भेद कांहींच नसतो. आवडेल त्यानें आवडेल त्याच्याशीं सारख्या नात्यानें रहावें; ही स्थिति माणसाची रहाणी साधी व ससत्व होण्यास फारच उत्तम असते.

मेकालेची आपल्या घराव्यतिरिक्त जर कशावरही निष्ठा व प्रेम हीं कायम राहिलीं असतील, तर तीं ट्रिनिटि कालेजावर होतीं. जों-पर्यंत म्हणून तेथें राहण्याची त्याची सोय व अधिकार हीं होतीं तोंपर्यंत त्यानें तें स्थळ कधीं खुशीनें सोडिलें नाहीं, किंवा सोडल्यास तेथें परत जातांना त्यास आनंद झाल्याशिवाय कधीं राहिला नाहीं. त्याच्या एकंदर पुढील आयुष्यक्रमांत जर त्याला आपली दिशी चुकली असें एकाद्या बाबतींत वाटत असलें, तर आपण केंब्रिज सोडून लंदन शहरीं गेलों, येथें कदाचित् आपलें चुकलें, ह्या

बाबतींतच वाटत असे. मोठेपणीं त्याला जी हाव वाटत असे ती ही कीं आपणास कालेजांत बिनपगारी फेलोशिप मिळावी; असें कीं, तेणेंकरून आपणांस आपल्या खोलीच्या खिडकींतून हिरव्यागार आंगणाकडे पुनः पहावयास मिळावें, कारंज्याच्या आवाजाच्या आटोक्यांत निजावयास मिळावें, गवतावर बसून फराळ करावयास सांपडावा, कालेजच्या दिवाणखान्यांत बेकन व न्यूटन यांच्या तसबिरीखालीं बसून पुनः जेवण्याची संधी यावी, व चांदण्यारात्रीं आध्यात्मिक विषयांवर बोलत फिरण्यास सांपडावें ! बी. ए. ची परीक्षा पास झाल्यावर देखील, सुटीच्या लांब दिवसांत त्यानें तेथें जाऊन दररोज सकाळीं हातांत पुस्तक घेऊन मोठ्यानें वाचीत फिरावें; मग तें पुस्तक एकाद्या गहन तात्विक विषयावरील असो, किंवा एकादें फार उच्च जातीचें काव्य असो, किंवा एकादी अगदीं पुळपुळीत कादंबरी असो. पुढें प्रकृति अशक्त झाल्यावर पूर्वीच्या आठवणी ताज्या करण्यासाठीं, व पूर्वीची तरतरी पुनः आपल्यास आली तर पहावी ह्मणून, या ठिकाणीं तो मोठ्या आवडीनें येई. आणि अद्यापि त्याची कांहीं आप्त व मित्रमंडळी अशी आहे कीं, त्यांना तेथें गेलें ह्मणजे अशी कल्पना झाल्याशिवाय रहातच नाहीं कीं, मेकालेचा आत्मा जर कोठें रेंगाळत राहिला असेल, तर तो येथेंच राहिला असला पाहिजे.

त्याचे सहाध्यायीही त्याच्यासारखेच पुढें प्रसिद्धीस आले. त्याचे अत्यंत निकट स्नेही ह्मटले ह्मणजे दोघे कालरिज—डरवेंट, सॅम्युएल टेलर कालरिज जो प्रसिद्ध कवि त्याचा मुलगा, व हेन्री नेल्सन, त्याच कवीचा भावी जांवई; हाइड व्हिलियर्स, भावी लार्ड ग्रे, लार्ड रॉमिली व लार्ड बेल्फर; शिवाय, प्रीड, सिडनी वॉकर व चार्ल्स् आस्टिन्. पैकीं चार्ल्स् आस्टिन हा सर्वांत बुद्धीनें, ज्ञानानें, उत्साहानें, चतुराईनें व कल्पनाशक्तीनें, फार श्रेष्ठ होता, व त्याचाच

काय तो मेकालेवर पगडा चालत असे. ' युटिलिटेरियानिझम् ' नामक जें उपयुक्ततातत्त्व पुढें लवकरच उदयास आलें, त्याचा एक उत्पादक, अमेरिकेंतील राजकीय संस्थांचा स्तुतिपाठक, आणि धर्माध्यक्षांचीं उत्पन्नें व सरदारांचे आनुवंशिक हक्क यांजवर नेहमीं तुटून पडणारा, असा जो चार्लस आस्टिन त्याच्या तडाक्यांत जेव्हां तरुण मेकाले आला तेव्हां त्याचीं जीं घरगुती टोरी मतें होतीं, जीं त्याच्या कातडीच्या आंत कधींच भिनलेलीं नव्हतीं,—तीं झाडून निघून गेलीं, व तो पूर्वी कधीं नव्हता, व पुढेंही कधीं झाला नाहीं, अशाप्रकारचा राडिकल ( धांवरा सुधारक ) बनला. आणि मेकालेचें असें मतांतर झाल्याची बातमी जेव्हां घरीं जाऊन पोहोंचली, तेव्हां घरची मंडळी बरीच घाबरली.

अशा सोबत्यांबरोबर कालक्रमणा करावयास लागलेला जो मेकाले त्यास रात्र व दिवस पुरेनाशी होऊं लागलीं ह्यांत नवल तें कोणतें ? जोंपर्यंत ह्मणून कोणाच्याही खोलीचा दरवाजा उघडा असेल, किंवा कोणत्याही चौकांत .दिवा जळत असेल, तोंपर्यंत स्वारीची गप्पा गोष्टी करावयास जाण्याची नेहमीं तयारीच असे. प्रोफेसराचें लेक्चर किंवा पाद्रयाची प्रार्थना हीं कधीं न चुकवणारा, आणि कॉलेजचे नियम व कॉलेजची दीक्षा ह्यांचा भंग कधीं न करणारा, असा जो आमचा हा चरित्रनायक, त्याच्या वेळीं रात्रीं अमुक वाजतां सर्वांनीं दिवे मालविलेच पाहिजेत, अशी सूचना देणारी ' कर्फ्यू ' घंटा कॉलेजांत वाजत नसे, हें त्याचें नशीबच समजावयाचें !- अशी घंटा जर कदाचित् असती तर तिचें उल्लंघन न करणें हें मात्र बहुधा त्याच्या जिवावर आलें असतें ! कॉलेजांत असतां बारा बारा वाजतां ह्यानें रात्रीचें जेवावें, नंतर कांहीं तासांनीं पेलेच्या पेले चहा झोंकावा, आणि पहांटेस कोणी, लेही तांग्यांतून

निघावयाचा असल्यास तोंपर्यंत शेकोटीशीं बसून, खुशाल गोष्टी सांगत बसावें. उन्हाळ्याच्या सुटींत विद्यार्थ्यांस कालेजच्या बाहेर रात्रींचेंही उशीरांपर्यंत रहाण्याची परवानगी असते. अशा समयीं रात्रीचा एकादा भोजनसमारंभ बारा-एक वाजेपर्यंत झाला म्हणजे मग सगळ्या मंडळींनीं बाहेर पडावें, आणि ह्यांचें मोठमोठ्यानें बोलणें आणि पहांटेचे पक्ष्यांचे शब्द ह्या दोहोंचें संमिश्रण होई तोंपर्यंत मैलच्या मैल उघड्यावर फिरावें ! अशा वेळीं "अतिशय पुष्कळ लोकांचें अतिशय पुष्कळ सुख" हें जें उपयुक्ततावाद्यांचें मुख्य तत्व, त्याच्या संबंधानें चार्लस ऑस्टिनची एकसारखी मेकालेनें केलेली थट्टा ऐकण्यासाठीं, किंवा त्या वेळीं प्रसिद्धीस आलेला जो वर्डस्वर्थ कवि त्याच्या गुणदोषांबद्दल कधीं न संपणारे वादविवाद चाललेले ऐकण्याकरितां, झोंपेचा मोड करून देखील ह्या मंडळीबरोबर जाणें मोठ्याशा नुकसानीचें झालें असतें असें नाहीं. ह्या वर्डस्वर्थ कवीच्या संबंधानें दोषाविष्करण करण्यांत तो असा कांहीं पटाईत झाला होता कीं, त्या कवीचा पक्ष घेऊन भांडणाराचा त्याच्यापुढें टिकाव लागण्यास मोठी पंचाईत पडे. पुढें पुष्कळ वर्षांनीं जेव्हां ह्या कवीचें 'प्रिल्यूड' नामक काव्य नवीनच छापखान्यांतून निघालें, तेव्हां एकदा पुष्कळ मंडळीच्यासमोर तो विषय निघाला असतां हा असें प्रतिपादूं लागला कीं, तें काव्य वाचनीय नाहीं. मंडळींत त्या कवीचे चहाते पुष्कळ होते; ते हें ऐकून सगळे त्याच्यावर तुटून पडले, व उलट मताचें प्रतिपादन करूं लागले. तेव्हां निरुपाय होऊन तो अशा तोडीस कबूल झाला कीं, तें काव्य वाचनीय आहे किंवा नाहीं, ह्या प्रश्नाचा निकाल तें ज्यांनीं स्वतः वाचलें असेल, त्यांचींच मतें घेऊन त्याप्रमाणें करावा. पण मतें घेऊं लागले तों हजर मंडळीपैकीं तें काव्य सबंध वाचलेला मेकालेच काय तो एकटा निघाला!

हीं जीं ह्या मंडळीचीं अशीं संभाषणें चालत, तसलीं संभाषणें पुढें आपल्यास कधींही व अगदीं मोठ्या प्रसिद्ध मंडळींतही ऐकूं आलीं नाहींत, अशी साक्ष त्याचे केवळ सर्व सहाध्यायीच देतात असें नाहीं; अशा त्यांच्या साक्षींत पक्षपात असण्याचा संभव आहे; तर बाहेरच्या लोकांचीही अशीच साक्ष पडते, व तिनें तीस दुजोरा येतो. तेव्हांच्या लार्ड लांड्सडौनकडे आस्टिन व मेकाले हे दोघे एकदां भेटण्याकरितां गेले असतां, एके दिवशीं सकाळच्या न्याहा-रीच्या वेळीं ह्या दोघांमध्यें कांहीं कालज्ञांताल विषय निघून त्याजवर वादविवाद सुरू झाला. न्याहारी संपल्यावर ते दोघे खुर्च्या उचलून धुराड्याच्या दोन टोंकाला दोघे जाऊन बसले, आणि मध्यें इतकी मंडळी शेकोटीसमोर बसली असतां तेवढ्या अंतरावरून अशा थाटानें त्यांनीं आपलें बोलणें चालविलें कीं, जणू काय ते कालेजच्या एकीकडच्या एका खोलींत बसून एकटेच भवति न भवति करीत आहेत. त्या समाजांत बाया, चितारी, मुत्सदी, भाषणकुशल असल्यामुळें नेहमीं श्रीमंता-कडे जेवणाचीं आमंत्रणें येणारे, अशा विविध व्यक्ति जमलेल्या होत्या. पण ही सगळी मंडळी ह्या दोघां तरुण कॅंब्रिजियनांचें भाषण ऐकत चित्रासारखी तटस्थ बसली, आणि मधल्या लंच (अगदीं स्वल्प फराळ) साठीं जरा उठला तेवढा वळ वजा करतां, मख्य जेवणासाठीं (हें बहुधा संध्याकाळीं किंवा रात्रींही होत असतें) वस्त्रांतर करण्याची वेळ झाली, असें सुचविणारी घंटा वाजे-तोंपर्यंत तेथून हालली नाहीं !!

कॅंब्रिज येथें निरनिराळ्या कॉलेजांतील विद्यार्थ्यांची मिळून एक वादविवाद सभा आहे, तिला कॅंब्रिज यूनियन असें म्हणतात, हें सर्वांस माहीत आहेच. तिसऱ्या जार्जाच्या कारकीर्दीच्या शेवटच्या

वर्षांत भाषणस्वातंत्र्यावर जी सर्वत्रच गदा आली होती, तिच्या तडाक्यांतून ही सभा ह्या वेळीं (१८१८–२४) नुकतीच डोकें वर काढूं लागली होती. कॉलेजांतील तरुण विद्यार्थ्यांनीं राजकीय विषयांची चर्चा ह्या सभेंत पाहिजे तशी करावी, ही गोष्ट कॉलेजांतील तत्कालीन अधिकाऱ्यांस संमत नव्हती. शिवाय, ह्या वेळीं काल-महिम्याचें धोरण असें कांहीं होतें कीं, तेणेंकरून तरुण विद्यार्थ्यांस आपापल्या पक्षाचे अंध अभिमानी होण्याचा जबरदस्त मोह उत्पन्न होत असे. शेवटीं मोठ्या मारामारीनें व्हाइस चान्सलरपासून एवढी परवानगी मिळाली कीं, ह्या सभेला जर राजकीय विषयांची चर्चा करणें असेल तर चालू शतकाच्या पूर्वीच्या विषयांची करावी; चालू शतकांतील विषयांची करूं नये. ह्या वेळीं नवें शतक नुकतेंच सुरू झालें असल्यामुळें, रोमनक्याथलिक लोकांस पार्लमेंताचे सभासद होण्याची मोकळीक असावी, व्यापार अप्रतिबंध असावा, इत्यादि चालू प्रश्नांची चर्चा जुन्या शतकांतील प्रश्नांच्या मिषानें करणें फारसें अवघड होतें असें नाहीं. रोमनक्याथलिकांस ही मोकळीक १७९५ त द्यावयास पाहिजे होती, किंवा अप्रतिबंध व्यापार १८०० पूर्वीं सुरू व्हावयास पाहिजे होता, अशा अर्थाची एकादी सूचना पुढें आणिली ह्मणजे झालें; मग त्याच्या आधारावर सद्यः-प्रश्नांची पाहिजे तितकी व पाहिजे तशी भवति न भवति करावी. शिवाय, ह्या सभेला जोडूनच एक वाचनमंदिर होतें; तेथें अमुक वर्तमानपत्र घ्यावें किंवा घेऊं नये, अशा प्रकारची सूचना आणून तिच्या पुष्ट्यर्थ हवें तितकें राजकीय विषयांवर बोलतां येत असे. 'एक्झामिनर' नांवाचें एक पत्र होतें त्याच्या नांवावर अशीं किती तरी रणें माजलीं होतीं; आणि 'मार्निंग क्रॉनिकल' ह्मणून दुसरें एक पत्र होतें, तें तर एका बारमाहींत अर्धा डझन वेळां वाचनमंदिरांतून काढून लाविलें, व तितके वेळां पुनः घेऊं लागले!

मेकालेचा बराच वेळ ह्या असल्या इतर गोष्टींत जात असल्यामुळें त्याला युनिव्हर्सिटींतील फारशीं बक्षिसें मिळालीं नाहींत. मात्र इंग्लिश कविता चांगली रचल्याबद्दल दोनदां त्याला चान्सलरचें पदक मिळालें. इंग्लिश भाषेंत वक्तृत्त्वयुक्त भाषण करण्याबद्दल दरवर्षी रुप्याचे तीन पेले बक्षीस देत असतात, त्यांतील ह्याला एकही कसा मिळाला नाहीं, ह्याचें ट्रिनिटींतील लोकांस मोठें आश्चर्य वाटलें. कारण मेकालेच्या सर्व मित्रांना व शत्रूंना जर मेकालेचा एक गुण कबूल असेल, तर त्यास इंग्रजींत वक्तृत्व करतां येई, हा होता. स्वतः मेकाले, हें कसें झालें ह्याचें कारण असें सांगे.—हा समारंभ झाल्यावर, सीनीयर डीन, जो पहिलें बक्षीस मिळविणाराचा नातलग होता, तो मजकडे येऊन ह्मणाला, "कायरे मेकाले, ज्या अर्थी तुला पहिलें बक्षीस मिळालें नाहीं, त्या अर्थी दुसऱ्या दोहोंपैकीं एकादें मिळावें अशी इच्छा तुला मुळीं नसेलच !" तथापि त्याला ल्याटिन भाषेंतील वक्तृत्वाबद्दल बक्षीस मिळाल्यामुळें वरील निराशेबद्दल त्याचें कांहींसें सांत्वन झालें असलें पाहिजे. शिवाय, १८२१ सालीं त्याला क्रेव्हन नामक एक स्कॉलरशिप मिळाल्यामुळें, ल्याटिन व ग्रीक भाषेंतील विद्वान् अशी त्याची प्रसिद्धि झाली.

मेकालेस आपल्या कॉलेजचा फेलो होण्यास तीन वर्षें खटपट करावी लागली; ह्याला न निवडण्याबद्दल चमत्कारिक कारण असें सांगत कीं, ह्याचीं ग्रीक व ल्याटिन भाषांचीं इंग्रजी भाषान्तरें जरी चुकत नाहींत, तरी भाषान्तराची भाषा नीरस व निरलंकार असते. खरें कारण केंब्रिजचा जो मुख्य विषय (गणित) त्याचा तो अगदीं हेळसांड करी हें होय. कॉलेजांत गणितविषयाची तो टाळाटाळ करूं लागला, हें मागें सांगितलेंच आहे. पण ह्याबद्दल त्यास

निदान कॉलेजांत असतां तरी कधींच वाईट वाटलें नाहीं; उलट तो त्या विषयाची मनःपूत थट्टा करीत असे. त्याला मनापासून वाईट वाटे तें शास्त्रीयविषयांचा लहानपणीं कंटाळा केल्याबद्दल मात्र होय.

कॉलेजांत तो एकंदर सहा वर्षे (१८१८-१८२४) होता. त्या वर्षांतील त्याच्या आईबापाशीं होणाऱ्या पत्रव्यवहारावरून पाहतां त्यांत जसा खासगी वर्तनाचा उल्लेख सांपडतो तसा सार्वजनिक गोष्टींचाही सांपडतो. उदाहरणार्थ, तो कादंबऱ्या वाचण्यांत फार वेळ घालवितो अशी त्याच्यासंबंधानें काणी बापापाशीं कागाळी केलेली दृष्टीस पडते; व त्यावरून बापानें त्यास कानउघाडणीचें पत्र लिहिलेलें दिसतें. कारण बापास असें वाटत असे कीं, कादंबऱ्या वाचणें ह्मणजे काळाचा निवळ अपव्यय करणें होय. दुसरी एक त्याच्याविरुद्ध बापाची अशी तक्रार दिसते कीं, हा आपलें टोरीमत ( राजपक्षास अनुकूल असें मत ) सोडून डेमॉक्रेट ( लोकपक्षाभिमानी ) बनला आहे असें त्याला कोणीं सांगितलें. ह्याचा उल्लेख आधीं आलाच आहे. सार्वजनिक गोष्टींच्या संबंधानें पाहतां मांचेस्टर येथील दंगा ( १८१९ ), क्यारोलिन राणीचें आगमन, चवथ्या जार्जाचें आयर्लंदांत गमन, इत्यादि गोष्टींच्या संबंधाचे उल्लेख सांपडतात.

वर सांगितल्याप्रमाणें तीनदां परिक्षेस बसल्यावर शेवटीं १८२४ सालीं आक्टोबर महिन्यांत मेकाले फेलोशिपची परीक्षा पास झाला, व पुढच्या वर्षाच्या जुलई महिन्यांत त्याची एम्. ए. ची परीक्षा झाली. येणेंप्रमाणें त्याचें कॉलेजांतील शिक्षण पुरें झालें.

---

# प्रकरण दुसरें.

## वकिली व निबंधलेखन.

सन १८२६ सालीं मेकाले बारिस्टर झाला, व लॉड्स शहरीं नार्दन सरकिटला ( जज्जांच्या फिरतीला) जाऊन मिळाला. पण वकिलीचा धंदा त्यानें मन लावून कधींच केला नाहीं. त्या वेळीं अशी चाल असे कीं, बारिस्टरानें संध्याकाळीं आपल्या चेंबर्समध्यें परत यावें, पण हा कांहीं केल्या तसें करीत नसे. एक दोन वर्षें अशा प्रकारची बारिस्टरी केल्यावर त्यानें कायद्याचा अभ्यास करण्याचें नुसतें सोंग करण्याचें देखील सोडून दिलें; आणि कामन्स सभेच्या ग्यालरीमध्यें त्यानें त्या मुदतींत जितके तास घालविले असतील तितके कायद्याच्या सगळ्या कोर्टांतून कांहीं घालविले नसतील. ह्या वेळचा त्याचा कायद्याच्या अभ्यासाविषयींचा आळस, व पुढें जेव्हां त्यास हिंदुस्थानच्या गव्हर्नर जनरलच्या कौन्सिलचा लॉ मेंबर ( कायदेप्रधान ) नेमिलें तेव्हां त्या शास्त्राच्या ढोबळ तत्त्वांचें व बारीकसारीक गोष्टींचें दोन्हींचें अध्ययन करण्याची हौस, ह्या दोन गोष्टींवरून मेकालेच्या एकंदर स्वभावाचें विशिष्ट धोरण जितकें चांगलें व्यक्त होतें, तितकें दुसऱ्या कशावरूनच होत नसेल.

तो लंदनमध्यें असो किंवा सर्किटवर असो, त्याच्याकडे सांगण्यासारखें काम कधींच आलें नाहीं. त्याच्या बापाला व्यवहारज्ञान जरी बेताचेंच होतें, तरी त्यानें आपल्या मुलास काम मिळावें ह्मणून सालिसिटर लोकांशीं संधानें बांधण्याची होईल तितकी खटपट केली

पण फुकट. शेवटीं, एका वर्तमानपत्रानें त्याची नालस्ती केली होती ह्मणून त्याच्यावर त्यानें फिर्याद करण्याचें मनांत आणिलें होतें; आणि तें काम त्यानें मुलास घेण्याविषयीं सांगितलें. पण असें करणें शोभणार नाहीं, अशा कारणानें तेंही त्यानें पत्करिलें नाहीं.

१८२४ सालीं एडिंबरो रिव्ह्यूशीं ह्याचा प्रथम संबंध जडला. तें त्रैमासिक सुरू होऊन २३ वर्षें झालीं होतीं. त्यांत लिबरल पक्षाच्या मतांचें मंडन होत असे; व त्या पक्षाबरोबरच त्याचीही भरभराट होत जाऊन हल्लीं त्याचें वजन इतकें वाढलें होतें कीं, तितकें पूर्वीं किंवा नंतर त्यास कधींच आलें नाहीं. तेव्हां त्या त्रैमासिकांत लेख ल्याहावयास सांपडणें ह्मणजे आपल्या मतांचा प्रसार करण्याचें उत्तम साधन प्राप्त करून घेणें, व आपली प्रसिद्धि करून घेण्याचा व आपलें वजन वाढविण्याचा अगदीं सुलभ मार्ग शोधून काढणें, असें होतें. ह्या वेळीं त्याचा संपादक जेफ्री हा होता. तो फार चाणाक्ष असल्यामुळें त्याच्या तेव्हांच लक्षांत आलें कीं, आपल्या त्रैमासिकाची भरभराट व वजन हीं जर कायम राखावयाचीं असतील, तर हल्लींच्या वृद्ध लेखकांच्या समुदायांत कांहीं तरतरीत तरुण बांडांची भेसळ करून दिली पाहिजे. ह्या दृष्टीनें तो चवकशी करीत होता, तों मेकाले त्यास आयताच सांपडला; आणि त्याचें याचें जमून त्याचा पहिला निबंध (हा मिल्टनविषयक होता) ह्या वर्षाच्या आगस्टच्या अंकांत प्रसिद्ध झाला.

ह्या लेखाचा लेखकाच्या कीर्तीवर ताबडतोब विलक्षण परिणाम झाला. पूर्वीं जसें बायरन कवीचें झालें होतें, तसें आतां ह्याचें झालें. एका सकाळीं उठून पाहतो तों आपली कीर्ति सर्वत्र पसरलेली! ह्या त्याच्या लेखांत जीं सौंदर्यस्थानें होतीं, तीं अशीं होतीं कीं, तीं सहज प्रत्येकाच्या नजरेंत भरावीं; आणि त्यांत जीं

दोषस्थळें होतीं, तीं देखील लोकांना प्रिय झालीं. ह्याचें मुख्य कारण असें होतें कीं, जौन्सननें मिल्टनचें जें चरित्र लिहिलें होतें, त्यांत त्याचें दोषाविष्करण फाजील झालें असल्यामुळें तें लोकांना पसंत पडलेलें नव्हतें. मेकालेचा लेख ह्याच्या अगदीं उलट होता, व त्यांत मिल्टनची प्रशंसा यथेष्ट केलेली होती; ह्मणून तो लोकांना एकदम पसंत पडला. मग काय विचारतां? मेकाले साहेबांस लंदनच्या प्रत्येक भागांतून भोजनाच्या निमंत्रणपत्रिका येऊं लागल्या; आणि मुलगा आतां पूर्वीपेक्षांही आपल्या धंद्याची जास्त हयगय करणार, हा विचार उत्पन्न होऊन बाप मनांतल्या मनांत कुरकुरूं लागला. ह्या निबंधांत मिल्टन व इटालियन कवि डान्टे ह्यांच्यामध्यें तुलना केलेली होती. ती बरोबर आहे किंवा नाहीं, हें पहाण्याकरितां त्या वेळचा प्रसिद्ध पण वृद्ध धर्मोपदेशक जो रॉबर्ट हॉल तो त्या भाषेचें व्याकरण व शब्दकोश उशावर घेऊन ती भाषा शिकूं लागला. ही गोष्ट जेव्हां मेकालेस समजली, तेव्हां अर्थातच त्यास धन्यता वाटली, ह्यांत नवल तें कोणतें? पण सर्वांत जी स्तुति त्यास फार आवडली, ती एडिंबरो रिव्ह्यूचा संपादक जो जेफ्री त्यानें केलेली होय. लेख आपणांस पोहोंचला ह्मणून कळवितेवेळीं पत्रांत त्यानें असें वाक्य घातलें होतें. "मी तुमच्या लेखाचा जसजसा जास्त विचार करितों, तसतसें ही लेखनशैली तुह्मांस कोठें सांपडली असेल ह्याचें मला जास्तच गूढ पडतें." ह्या लेखन-शैलींत काय विशेष आहे, हें त्याचा एकही लेख ज्यानें वाचला असेल त्याच्या सहज लक्ष्यांत येणारें आहे. आंखूड आंखूड वाक्यें, लहान लहान शब्द, विरामांची रेलचेल, अशी त्या शैलीचीं विशिष्ट अंगें आहेत. व त्यामुळें वाचकाची समजूत सहज पडून तो तेव्हांच खुलून जातो.

ह्या ठिकाणीं मेकालेचें स्वभाववर्णन व स्वरूपवर्णन केल्यास अप्रासंगिक होणार नाहीं. तो ठेंगणा व लठ्ठ असे; त्याचें डोकें मोठें व भरगच्च असे; त्याचे नाक. कान, गाल जाड असून खडबडीत असत; सारांश, त्याचा चेहरा सुरूप ह्मणण्यापेक्षां सामान्यच होता, असें ह्मटलें पाहिजे; तथापि त्यावर आनंदाच्या व उमेदीपणाच्या प्रत्येक मनोवृत्तीची लकेर नेहेमींच असल्यामुळें ही उणीव भरून येत असे. त्याचा पोषाक जरी गरीबीचा नसे, तरी त्यांत हलगर्जी-पणा विशेष असे. त्याच्या कपाटांत कपड्यांची रेलचेल असे, व पुढें पुढें तर फीत लावलेलीं बासकुटें घालावयास तो लागला होता. तीं त्याच्याजवळ किती असत ह्याचा पत्ताच नसे. बाहेर उघड्यावर गेला ह्मणजे कोरे करकरीत काळे भोर हातमोजे तो नेहमीं घाली, पण ते इतके निष्काळजीपणानें कीं, हातमोजांच्या बोटांत ह्याची बोटें अर्ध्यावर कधीं गेलेलीं नसावयाचीं! तो हिंदुस्थानांत निघून गेल्यावर घरीं त्याची खोली चाळून पाहिली, तर त्याच्यांत वस्त्रे पाजळण्याच्या पन्नास साठ चामड्याच्या वाद्या सांपडल्या; त्यांचे फाटून व तुटून तुकडे तुकडे झालेले होते; व वस्त्रे सांपडले त्यांना शेंडे ना बुडखे. ह्याच वेळाच्या सुमारास स्वतःची दाढी करतां करतां स्वारीनें एकदां हातासच जखम करून घेतली, व ह्मणूनच न्हाव्यास बोलावणें भाग पडलें. वपनक्रिया पुरी झाल्यावर काय देऊं ह्मणून न्हाव्यानें पुसलें. न्हाव्यानें भावडेपणानें ह्मटलें, तुमची हजामत करितो त्यास जें तुह्मी देत असाल तेंच मला द्या." मेकाले ह्मणतो, "असें का! तर मग तुझ्या प्रत्येक गालावर मला एक एक वार केला पाहिजे!"

शारीरिक खेळांकडे इंग्लंदांत पहिल्यापासूनच मुलांचा कल फार आहे; व हल्लीं तर हें वेड लहानांत व मोठ्यांत इतकें शिरलें आहे

कीं, क्रिकेट वगैरे खेळ हे केवळ प्रकृति सदृढ राखण्याचें एक साधन आहे असें न समजतां, ती केवळ आयुष्याचीच इतिकर्तव्यता आहे असें बरेच लोक समजूं लागले आहेत. आपल्याकडेही मोठाल्या शहरांतून कांहीं अंशीं अशीच स्थिति व्हावयास लागली आहे. अशा वेळीं, मेकालेस ह्या खेळांपैकीं एकही येत नव्हता, व ह्याबद्दल त्याला बिलकुल वाईट वाटत नसे, असें सांगण्यास जरा शंकाच वाटते. त्याला पोहतां येत नसे, किंवा वल्हावतां येत नसे. गाडी हाकतां येत नसे, बर्फावर घसरतां किंवा बंदूक मारता यत नसे. त्यानें रिकिबींत क्वचित्‌च पाय टाकला असेल, व खुषीनें तर कधींच नाहीं. प्रधान झाल्यावर जेव्हां तो विंडसर किल्ल्यांत राणीस भेटण्याकरितां गेला, तेव्हां त्यास तेथील नोकरांनीं सांगितलें कीं आपणास पाहिजे तर फिरावयास जाण्यास घोडा तयार आहे." मेकाले उत्तर करितो, "मला आरोहण केलेला पाहवा अशी जर राणीसाहेबांची इच्छा असेल, तर माझ्यासाठीं हत्तीची सिद्धता केली पाहिजे !" त्याला जो एक व्यायाम करण्याचा प्रकार उत्तम येत होता, तो हा कीं, हातांत पुस्तक घ्यावें, व त्याजवर सारखे डोळे लवून रस्त्याच्या गर्दीतून मार्ग काढीत जावें. आक्सफर्ड स्ट्रीट, चीप साईड, अशासारख्या लंदनच्या गर्दीच्या भागांतून इतर लोकांप्रमाणें जलद चालतांना, व त्याच्यापेक्षांहि जलद वाचतांना, तो बरचेवर दृष्टीस पडे. खरोखरच, चालण्याच्या कामांत त्याचा नंबर बराच वर लागेल. पन्नाशी उलटून जाई तोंपर्यंत दहा पंधरा मैल पायीं जाणें ह्याचें त्यास कांहींच वाटत नसे, आणि जोंपर्यंत त्याची भर उमेद होती, तोंपर्यंत, घरांत काय व बाहेर काय, तो नेहमीं उभा असे. घरांत कोणाशीं बोलत असला तरी एरझारा करीत बोलावयाचें, अशी त्याला सवय असे; त्यामुळें व्यायाम सहज होई.

त्याच्या अंगीं जे दोष होते ते अशा प्रकारचे होतें कीं त्यांबद्दल त्याच्या इष्ट आप्तांस काळजी वाटण्यापेक्षां, तो ज्यांस आवडत नसेल त्यांस मात्र त्यांपासून त्रास व्हावा. आवेश, स्वतःविषयीं वाजवीपेक्षां जास्त खात्री, कोणत्याही प्रश्नास दोन बाजू असतात, किंवा कोणत्याही वादविवादांत दोन माणसें असतात हें ध्यानांत ठेवण्याची अक्षमता, हीं जीं व्यंगें आहेत तीं कदाचित् त्याच्या सारखे गुण ज्यांच्या अंगीं असतील त्यांच्या ठिकाणीं नेहमींच दिसत असतील. केंब्रिज येथें असतां तो आपल्याबद्दल असें ह्मणे कीं कोणीही कोणताही सिद्धान्त आपल्यापुढें ठोकिला ह्मणजे त्याज-वरचे सर्व आपेक्ष आपल्या डोक्यांत एकदम घुसून येतात; व इतर त्याजबद्दल असें ह्मणत कीं याचें राजकीय विषयावर स्वतःच मत कांहींच नसावयाचें, तर हा ज्याच्याशीं बोलत असेल त्याचें जें मत असेल त्याच्या मात्र नेहमीं उलटें असावयाचें. हा शेवटचा आरोप मात्र त्यानें लवकरच आपल्या अंगावरून काढिला, त्यानें जें कालेज सोडिलें, तें पक्का व आवेशी व्हिग ह्मणून सोडिलें; व व्हिग पक्षाच्या मतांव्यतिरिक्त इतर सर्व मतें अगदीं निराधार होत, असें सर्वांशीं सर्वकाळीं प्रतिपादन करण्यास तो मोठा उत्सुक असे. त्याचा मामेभाऊ जार्ज बाबिंग्टन हा शस्त्रवैद्य असून त्याच्याशीं ह्याचें फारच सख्य असे. तो नेहमीं ह्याच्याशीं टोरीपक्ष घेऊन भांड-ण्यास तयार असे. ह्या दोघा मित्रांनीं "तासच्या तास खोलीमध्यें एरझारा घालीत भांडत असावें, एकदम मोठ्या मोठ्यानें बोलून एकमेकांचे कानठाळें बसवावे व शेवटीं साधकबाधक प्रमाणांचा जोर व फुप्पुसांची शक्ति ह्या दुजोऱ्यापुढें जार्जनें हार खावी, असें होत असे. त्यांनीं चिडूं ह्मणून कधीं नये; तर त्यांचें हें वाग्युद्ध विनो-दानें चालावें; मात्र त्यांची युद्धपद्धति फारशी सभ्यपणाची नसे."

तो जेव्हां अगदीं तरुण होता तेव्हां देखील त्याची भाषणशैली इतकी मनोहर असे कीं, दहांपैकीं नऊजणांस त्याचें भाषण ऐकण्यापेक्षां दुसरी कोणतीच गोष्ट ज्यास्त आवडूं नये. हें त्याचें मोठेंच दैव समजावयाचें; कारण लहानपणीं कोणाशीं कोणत्या विषयावर बोलावें, किती बोलावें, त्याचा अजमास त्याला मुळींच नसे. परंतु त्याचा स्वभाव उत्तम असल्यामुळें आणि पोकळ अहंकाराचा त्याच्या ठायीं अगदीं अभाव असल्यामुळें, महत्वाच्या बाबतींत, व तसेंच लहान सहान गोष्टींत, इतरांचें धोरण कसें संभाळावें हें तो लवकरच शिकला. लंदनमध्यें त्याचें बरेंच जमून येतें न येतें त्या मुदतींत तो मंडळींत ज्याप्रमाणें जोरदाररीतीनें व दुसऱ्यास करमणूक होईल अशा तऱ्हेनें बोलावयास शिकला, तद्वत्च दुसऱ्यांस रुचेल अशा रीतीनेंही बोलावयास शिकला. ह्याबद्दल पुष्कळ लोकांची साक्ष पडते.

मेकालेचा स्वभाव इतका सत्यनिष्ठ व प्रामाणिक असे कीं जे लोक त्याला आवडत नसतील किंवा ज्यांबद्दल त्यास पूज्यबुद्धि वाटत नसेल त्यांच्याशीं बाह्यतः देखील स्नेहभावानें राहण्याची त्याची खुशी नसे; आणि जोंपावेतों सभ्यपणाचें उल्लंघन होणार नाहीं, तोंपावेतों, असे लोक त्याच्याशीं स्नेह करावयास आल्यास, किंवा त्यांनीं यास आपल्या घरीं पाहुणचारास बोलाविल्यास, तो त्यांची टाळाटाळ करीत असे. तो असें ह्मणे कीं ज्या माणसाबद्दल मला सर्व प्रकारच्या मंडळींत बरें बोलतां येत नाहीं, अशा माणसाचें निमक खाणें मला आवडत नाहीं. पण ज्याबद्दल त्यास एकदा पूज्यबुद्धि किंवा प्रेम उत्पन्न झालें असेल, त्यांच्यांशीं तो नेहमीं शुद्ध अंतःकरणानें व निःसीमपणानें वागे. आपल्या मित्राकरितां आपलें द्रव्य, आपलें वजन, व आपली कर्तबगारी,

हीं खर्च करणें त्यास फार आवडे; आणि तो ज्याला ह्मणून मित्र हें नांव देईल, त्याला तो पुष्कळ गोष्टी माफ करी, व होतां होईतों त्याजवर आपला विश्वास कमी करीत नसे. आपण एकाद्यावर विश्वास ठेविला व त्यानें आपला गैरविश्वास केला, असें जर त्याच्या प्रत्ययास आलें तर तो त्या माणसाची कानउघाडणी करण्याच्या किंवा त्याच्याशीं भांडत बसण्याच्या भानगडींत पडत नसे. त्याचा तो केवळ नाद सोडी. तो एकाद्या घरगुती कलहांत किंवा कोणत्याही प्रकारच्या खाजगी बखेड्यांत पडलेला ऐकून माहीत नाहीं. अशा रीतीनें तो वागे ह्यास कारण असल्यास गोष्टींचें त्यास कांहींच वाटत नसे, हें नव्हे, तर त्याचें आत्मसंयमन हें होय. त्याची बहीण मार्गारेट ह्मणे, "तो फार नाजूक आहे. त्याचा जर कोणी थोडाही अपमान केला तर त्याबद्दल त्यास फार वाईट वाटतें, व तो तो पुष्कळ दिवस ध्यानांत ठेवितो." फार कशाला ! त्याचे कालेजांतलेच स्नेही त्यास सांगत कीं "औदार्य व सूड उगविण्याची बुद्धि" हे तुझ्या स्वभावांतील मुख्य विशेष आहेत. धैर्याची वाण त्याच्या ठिकाणीं खचीतच नव्हती. त्याच्या अंगांत जोंपर्यंत पाणी फार खेळत होतें, व त्याची लेखणी जोंपर्यंत फार मर्मभेदक होती, आणि जोंपर्यंत समाजाच्या रीतीभाती हल्लींच्या रीतीभातींहून* भिन्न होत्या, तोंपर्यंत त्यास असे प्रतिवादी एकापेक्षां अधिक भेटले कीं ज्यांची इच्छा ह्याच्याशीं कागदलेखणीच्या समरंगणांत नव्हे, तर इतरत्र लढण्याची होती. अशा प्रसंगीं जरी तो आपल्या सामनेवाल्यास तुझें हें ह्मणणें हलक्या स्वभावाचें दर्शक होय ह्मणून सांगत नसे, तरी आपल्याला काय करणें शोभेल व काय शोभणार नाहीं, हें अशा शांत पण निखालस रीतीनें त्याच्या लक्षांत आणून देई कीं, तें त्यास व त्याच्या भागीदारांस लक्ष्यांत घेणें भाग पडे.

अशा रीतीनें, ज्यांचे परिणाम पूर्वी भयंकर झाले असते, असे बरेच प्रसंग त्यानें इभ्रतपूर्वक व समाधानकारक रीतीनें पार पाडिले होते.

पण एकाद्या सार्वजनिक मुद्यावर जर तो एकाद्या भांडणांत शिरला, तर तेथें मात्र त्याची संग्रामेच्छा पूर्णपणें दिसून येई; अशा प्रसंगीं सर्व जगास तिऱ्हाईत करून तो अखेरपर्यंत प्रतिपक्ष्याशीं लढत असे. लहान असतां, गुणदोषविवेचन आणि वादविवाद ह्या दोन समरांगणांत मात्र डाक्टर जानसन पक्या द्वेष्ट्याच्या ज्या गुणांबद्दल प्रशंसा करितो, ते गुण त्याच्या अंगीं कधीं कधीं दृष्टोत्पत्तीस येत. वाईट लेखकांची, व विशेषतः वाईट कवींची त्याच्यापाशीं कधीं क्षमा नसे; त्यांना जर पैशाची जरूर असली, तर मात्र गोष्ट निराळी; मग तो त्यांना शक्यनुसार चांगली मदत करी. धर्माच्या व व्यवहाराच्या बाबतींत इतरांस (विशेषतः रोमन क्याथलिक वगैरे लोकांस) नेहमीं पंक्तिबाह्य ठेवावें, त्यांस राजकीय हक्क देऊं नयेत, अशी ज्यांची इच्छा असे, त्यांचें डोकें व अंतःकरण दोन्ही ठिकाणावर नाहींत, असें मानण्याचा त्यास बळकट मोह होई. स्वच्छंदानुरोधी, स्पष्टवक्ता, आणि बहुतेक दोषास्पद होईल अशा तऱ्हेचा स्वाभिमानी, असा तो असल्यामुळें, स्वार्थसाधू, वारा वाहील त्याप्रमाणें वागणारे, इतरांवर चरणारे, चहाडखोर, आणि परप्रत्ययनेयबुद्धि तरवारबहादुर, कलमबहादुर, व तोंडबहादुर, ह्या सर्वांचा त्यास अत्यन्त तिटकारा असे. बॉसवेलकृत जॉनसनचें चरित्र ह्याचा एक टीकाकार व संपादक जो क्रोकर, ह्याच्या संबंधानें त्यास अशा प्रकारचा तिटकारा उत्पन्न झालेला होता; व त्याचा त्यानें आपल्या एका निबंधांत कसा खरपूस समाचार घेतला आहे हें सुप्रसिद्धच आहे.

प्रतिपक्षी ह्या नात्यानें मेकाले फारच भयंकर माणूस असे, ह्याचें

दुसरें एक कारण असें असे कीं, तो जरी रागावला तरी आपला मुद्दा कधीं सोडीत नसे. त्याची पहिली टक्कर मोठी कठीण असे; पण संग्रामाला जरी ऊत आलेला असला, तरी तो थांबावयाचा केव्हां हें तो कधीं विसरत नसे. मायकेल टॉमस सॅड्लर नांवाच्या एका पार्लमेंताच्या सभासदानें त्यास, व 'प्रजावृद्धि' ह्या प्रसिद्ध लेखाचा कर्ता जो माल्थस त्यास, अशा दोघांस शिव्या दिल्या होत्या. तेव्हां दोन लहानशा चुरचुरीत अशा निबंधांमध्यें दोघांबदलही त्यानें त्याचा पुरेसा समाचार घेतला. खरोखर पुसाल तर, प्रतिपक्ष्यावर दुसऱ्यांदा हात उगरण्याचा प्रसंग त्यास फारच क्वचित् येई. एकदा जेथें त्याची चपराक बसली, तेथला वळ पुनः जिवंत करण्याची कधीं जरूरीच पडत नसे.

मेकाले जेव्हां प्रथम कालेजांत गेला, तेव्हां आपल्याला पोटासाठीं ह्मणून कांहीं धंदा करावयास नको. असें जें त्यास वाटत होतें, तें गैर वाजवी होतें असें नाहीं. त्याच्या बापाला आपल्यापाशीं सध्या निदान एक लक्षाची मत्ता आहे असें त्या वेळीं वाटत असून, त्यानें मुलास असें स्पष्टपणें सुचविलें होते कीं, माझ्या मनांत माझ्या सामर्थ्यानुरूप तुझी वडील मुलाप्रमाणें ( इंग्लंदांत वडील मुलास बापाची सर्व स्थावर मिळकत मिळत असते ) व्यवस्था करून ठेवावयाची आहे; आणि त्यानें त्यास असेंही सांगून ठेविलें होतें कीं, तूं जर कालेजांत नीट अभ्यास करशील, तर मी तुला पुढें पाहिजे तो व्यवसाय करण्याची परवानगी देईन. १८१८ सालीं झशारी मेकाले आपलीं मुलें माणसें घेऊन लंदन शहरीं गेला, व तेथें तें कुटुंब "कॅडोगन प्लेस" ह्या स्थळीं आपल्या सुधारलेल्या द्रव्यस्थितीस अनुरूप अशा धर्तीवर राहूं लागलें. पण मागें सांगितलेल्या 'मेकाले व बाबिंग्टन' ह्या कंपनीची भरभराट

फार दिवस टिकली नाहीं. ह्याचें एक कारण असें कीं, त्या कंपनीचा वडील भागीदार ( झशारी मेकाले ) ह्यांचें सगळें अंतःकरण व वेळाचा पांच षष्ठांश हिस्सा हीं ज्या कामाला ( गुलामगिरी मोडून टाकण्याच्या खटपटीला ) त्यानें वाहिलीं होतीं, त्याचा त्याच्या धंद्याशीं कांहींच संबंध नव्हता. आणि दुसरें कारण, त्यानें जे भागीदार ( बाबिंग्टन ) घेतला होता, त्याच्या अंगीं ह्याची ही लंगडी बाजू भरून काढतील असे गुण कांहीं नव्हते. पुढें ओढवणाऱ्या संकटाचीं चिन्हें १८१९ च्या बापलेकांच्या पत्रव्यवहारांत प्रथम दिसूं लागलीं. कारण फेलोशिप मिळविण्याची तयारी चालली असतां मेकालेनें वर्षास १०० गिनींची शिकवणी आनंदानें पत्करिली. आणि पुढें जसजसा ज्यास्त काळ लोटत चालला तसतसी एक गोष्ट ज्यास्त ज्यास्त व्यक्त होत चालली; ती ही कीं, त्याला जो वडील मुलाचा हक्क मिळणार तो हा कीं पुढें जीं अडचणींचीं व विपत्तीचीं वर्षें येणार त्या सर्व वर्षांत त्याच्या बहीणभावंडाच्या सुखासमाधानाचें, शिक्षणाचें, व उदरनिर्वाहाचें सर्व ओझें मुख्यत्वें करून त्याच्यावर पडणार. पण हें ओझें त्यानें आनंदानें, ममतापूर्वक, आणि खरोखरच, बहुतेकांशीं सहजगत्याच, आपल्या शिरावर घेतलें. जें अवश्यभावी असेल त्याजबद्दल काळजी करीत बसणें, किंवा जें बरोबर असेल तें केल्याबद्दल फुशारकी मारणें, हें त्याच्या पिंडींच नव्हतें. त्याच्या बापास जें ओझें सोसेनासें झालें तें त्यानें मुकाट्यानें आपल्या खांद्यावर घेतलें; आणि फार वर्षें लोटण्याच्या अगोदरच ज्यांच्या सुस्थितीबद्दल तो काळजी वाहत होता, तीं सर्व चांगल्या स्थितींत जाऊन पडलीं. ही गोष्ट साध्य करून घेण्याप्रीत्यर्थ त्यानें जे प्रयत्न केले, त्यांच्या भरंत सुख साधेल अशा रीतीनें आपण आपल्या आयुष्यक्रमाची योजना करावी, ही कल्पनादेखील तो विसरून

गेला; आणि त्याचा उच्च व सरल स्वभाव असा कांहीं होता कीं, सर्वांशीं इतरांसाठीं खपणें ह्यांत कांहीं स्वार्थत्याग आहे, ही कल्पनाही त्याच्या मनांत कधीं आली असेल कीं काय, ह्याबद्दल देखील शंका वाटते.

कॅडोगन प्लेस ह्या ठिकाणीं तो आपल्या बापाच्या घरीं रहात असे; आणि द्रव्याची टंचाई पडूं लागल्यामुळें बाप जेव्हां लंदनच्या कमी भपकेदार भागांत रहावयास गेला, तेव्हां तोहि त्याजबरोबर तेथें गेला. १८२३ सालीं हें कुटुंब "ग्रेट ऑर्मंड स्ट्रीट, घर नं. ५० " या स्थळीं जाऊन राहिलें; व ह्या ठिकाणीं तें १८३१ पर्यंत होतें. ह्या स्थळीं त्यांचें आयुष्यक्रमण कसें चाललेलें असे, ह्याविषयीं त्याची बहीण लेडी ट्रेव्हेल्यन आपल्या मुलास असें लिहिते "हीं वर्षें मला अत्यंत सुखाचीं गेलीं. पैशाच्या संबंधानें अडचणी असतील, पण आह्मांला त्यांपासून कधींच त्रास झाला नाहीं.

" सकाळीं आह्मी उद्योगाचें व अभ्यासाचें थोडेंसें ढोंग करीत असूं. तिसऱ्या प्रहरीं तुझा मामा मार्गारेटला व मला नेहमीं लांब फिरावयास नेत असे. आह्मी शहराचे सगळे भाग धुंडाळीत असूं, व संध्याकाळीं सहाच्या जेवणाला अगदीं बेळेवर परत येत असूं. प्रत्येक रस्ता, प्रत्येक चौक, प्रत्येक आंगण, आणि प्रत्येक गल्ली, ह्यांजबद्दल कितीतरी गोष्टी त्यानें आह्मांस सांगाव्या!...... नंतर जेवण झालें ह्मणजे चहाची वेळ होई तोंपर्यंत त्यानें आह्मा दोघींस गप्पा सांगत दिवाणखान्यांत सारखें फिरावें. मग काय? आह्मी खदखदां हसत असावें, व त्यानें आपल्या भिकार श्लेषांचें माप आमच्या पदरांत घालीत असावें! काय ते श्लेष! मिनिटाला इतके! तासाला इतके! नंतर आह्मी गावयास लागावें; आमच्या-

पैकीं गळा कोणास नसे, आणि त्याला तर मुळींच नसे; तथापि जुनीं बाळपणांतील गाणीं आह्मी तालसुरावर बसवावीं, आणि गावीं, माझा बाप आपल्या टेबलाशीं बसलेला असावा, त्यानें केव्हां केव्हां वर पहावें, आपला चष्मा मागें सारावा, आणि, मला खचीत वाटतें, आह्मी आपल्या कालाचा असा अपव्यय करितों तरी कसा, ह्याबद्दल मनांत आश्चर्य करित रहावें. चहा घेतला ह्मणजे ज्या पुस्तकाचें वाचन चाललेलें असेल तें काढावें. अशावेळीं तुझा मामा स्वतः फारच क्वचित् वाचीत असे; तर त्याचा उद्योग असा चालवयाचा कीं, दुसरें कोणी वाचील तें ऐकत, आणि त्यावर टीका करीत, आणि पाणी पीत, एकसारखें एरधारा घालीत त्यानें रहावें.

" कांहीं अंशीं रविवार त्याला कठीण जात असत. माझ्या बापाची चाल अशी होती कीं, त्या दिवशीं तिसऱ्या प्रहरीं आह्मां सर्वांस एक लांबलचक धर्मव्याख्यान त्यानें वाचून दाखवावें, आणि संध्याकाळीं देवळांतून परत आल्यावर घरच्या प्रार्थनेच्या वेळीं नोकर लोकांना दुसरें एक लांब व्याख्यान वाचून दाखवावें. नातेवाईकांच्या किंवा स्नेह्यांच्या मुलांना त्या दिवशीं आमचा दरवाजा खुला असे; आणि जे कोणी आप्त वैद्यक शिकणारे विद्यार्थी असत, किंवा व्यापाऱ्यांच्या दुकानावर कारकून असत, ते आमचीं रविवारचीं भोजनें व धर्म व्याख्यानें ह्यांचा आस्वाद घेण्यास नियमानें येत. केवळ व्यायामासाठीं ह्मणून आदित्यवारीं बाहेर जाण्याची आह्मांस कधींच परवानगी नसे, आणि दूरच्या देवळांत प्रार्थनेस जाणें देखील माझ्या बापास आवडत नसे.... तुझा मामा सकाळीं बहुधा आमच्या बरोबर देवळांत येत असे, पण पुढें पुढें त्यानें असा क्रम सुरू केला कीं दोन प्रहरानंतर एकट्यानेंच किंवा एखाद्या मित्राला बरोबर घेऊन शहराबाहेर फिरावयास

जावें. माझा बाप ह्याबद्दल त्याला बोलल्याचें मीं कधीं ऐकिलें नाहीं; आणि खरोखरच, घरांतल्याघरांत आपला मुलगा कसा वागतो, व काय बोलतो, ह्याबद्दल त्यास आळाबंदा घालण्याचा यत्न त्यानें कधींच केला नाहीं. ”

मेकालेचें आपल्या अगदीं जवळच्या सर्वच नातेवाईकांवर जरी फार प्रेम होतें, तरी त्याचा अत्यन्त निकट व अत्यन्त वरचेवर जो समागम होत असे, तो त्याच्या बहिणी हाना व मार्गारेट ह्यांच्याशीं होय. त्या त्याजपेक्षां अनुक्रमें दहा व बारा वर्षांनीं लहान होत्या. ह्या दोघींविषयीं त्याचें प्रेम जरी खोल व बळकट असें होतें, तरी त्यामध्यें अंधत्वाचा किंवा वेडेपणाचा भाग मुळींच नव्हता. अगदीं खाजगी अशा आपल्या दिनचर्यापुस्तकांत किंवा अगदीं खाजगी पत्रव्यवहारांतहि तो लडिवाळपणानें त्यांच्या गुणांची अतिशयोक्ति कधीं करीत नसे. पुढें दिसूनच येईल कीं, मार्गारेट तरुणवयांतच निवर्तली. ती रुपानें सुंदर असून, गुणांनींहि फार मनोहर व श्रेष्ठ अशी होती. दुसरी चांगला संसार करून मुलें बाळें होऊन मग निवर्तली. तिजवर मेकालेचें अंतःकरण किती होतें, व त्याला ती कशी पात्र होती, हें पुढें दिसूनच येईल.

मेकालेच्या कुटुंबांत शिक्षण कोणत्याहि विशिष्टपद्धतीवर ह्मणून चाललेलें नसे. गाणें, नाचणें, वाजवणें, चित्रें काढणें, इत्यादि ज्या गुणांस स्त्रियांचे शोभादायक गुण ह्मणून सामान्यतः समजतात, त्यांपैकीं मुलींच्या अंगीं थोडेच होते; व त्यांच्यापैकीं जी हाना तिच्या अंगीं तर फारच थोडे होते. पण तिला लहानपणापासून वाचावयास चांगलीं चांगलीं पुस्तकें मिळत असत; व तीं तिला तिच्या सवडीप्रमाणें व आवडीप्रमाणें वाचण्याची परवानगी असे. तिच्या स्वभावांत असे दोन विशिष्ट गुण होते कीं, ते एकाच ठिकाणीं

फारच क्वचित् आढळतात: सभोंवतालच्या वास्तविक व्यवहारांत पूर्ण मन, व त्याबरोबरच वाटेल तेव्हां वाङ्मय व कादंबरीमय ह्यांच्या सृष्टींत निघून जाण्याची व तन्मय होण्याची शक्ति, पुस्तकांविषयीं मेकाले व त्याची बहीण ह्यांचा जो मनोभाव असे, त्याचें इतरांच्या मनोभावाहून केवळ प्रमाण भिन्न होतें असें नाहीं, तर त्याचा प्रकारच भिन्न होता. इतिहासावरील किंवा चरित्रावरील एखाद्या ग्रंथाविषयीं त्यांचें दोघांचें जेव्हां संभाषण चाले, तेव्हां बाजूस उभें राहिलेल्या माणसास असें वाटावें कीं, ग्रंथकार ज्या काळाला अनुलक्षून लिहीत आहे, त्या काळांतलींच हीं जणूं काय दोघें आहेत, आणि त्याच्या ग्रंथांत ज्या पात्रांचें वर्णन केलेलें असेल, त्यांचीं यांची जणूं काय प्रत्यक्षच ओळख झालेली आहे. इतरांस आपल्या वेळच्या मोठमोठ्या लोकांबद्दल जशा प्रकारचें बोलण्याची व जितकी हौस वाटते, तितकी पेपिस ( याच्या दुसऱ्या चार्लसच्या वेळची डायरी–दिनचर्यावृत्त–प्रसिद्ध आहे ), आडिसन, होरेस वाल्पोल, डा. जानसन, इत्यादि माणसें, आणि ज्या समाजांतून तीं राहिलीं ते समाज, ह्यांच्याबद्दल तशाप्रकारचें व तितकें बोलण्यास त्यांस हौस वाटत असे. भूतकालीन गोष्टी त्यांस वर्तमानकालीनशा वाटत, व कल्पनासृष्टींतील गोष्टी प्रत्यक्षशा वाटत. ज्या कादंबऱ्यांचा लहानपणीं त्यांनीं वाचून फडशा उडविला होता, त्या कादंबऱ्या त्यांच्या मनांत इतक्या भिनून गेल्या होत्या कीं, प्रस्तुत कल्पना व हातांतील कामें देखील, ह्यांजविषयीं बोलत असतां, कादंबऱ्यांतील संभाषणांतील वाक्यांची तीं दोघें योजना करीत असत.

ह्याचा परिणाम कधीं कधीं दुसरें अगदीं गोंधळांत पडून जावें, अशा प्रकारचा होत असे. हाना हिचे पुढें लग्न होऊन ती जेव्हां लेडी ट्रेव्हेल्यन बनली, तेव्हां तिच्या नवऱ्याला प्रथम प्रथम

कांहीं दिवस असें आश्चर्य वाटे कीं, आपली बायको व मेव्हणा ह्यांना कोणत्या तरी विलक्षण माणसांचा सहवास होता! अशा प्रकारचे विचार व अशा प्रकारचीं बोलणीं हीं लहान मुलांना फारच चित्ताकर्षक वाटत व त्याचा परिणाम त्यांच्या मनावर वाईट होत असे, असेंही नाहीं. असो.

तीं जेव्हां लंदनांत ग्रेट आर्मंड स्ट्रीटमध्यें रहात असत, तेव्हां जो विनोद चालत असे, तो नेहमीं आनंदमय असे, व कधीं कधीं त्यास मोठ्याच गलब्याचें स्वरूप येई. जेव्हां घरीं कोणी पाव्हणे बलाविलेले नसत, तर तें कुटुंब एकटेंच असे, तेव्हां देखील मुलांची शिकण्याची खोली व दिवाणखाना हीं मुलांमुलींनीं गजबजून गेलेलीं असत. आणि ह्या ठिकाणीं नेहमीं अशी गम्मत चाललेली असते, हें जाणून मित्र आणि नातेवाईक धांवून येत. शाळांना मोठी सुटी झाली ह्मणजे त्या महिन्यांत असे कांहीं दिवसच्या दिवस जात कीं, ज्यांमध्यें गलबा आणि खेळ सकाळपासून तों रात्रीपर्यंत सारखा चालावयाचा; आणि मेकाले, जो ह्मातारपणापर्यंत पोरांशीं खेळण्यांत खरोखरीच सगळेच्या सगळे दिवस घालवूं शकत असे, तो मुलांच्या ह्या सर्व खेळांमध्यें होरक्या असावयाचा. आंधळ्या कोशिंबिरीचे खेळ तासच्या तास चालावयाचे, त्यावेळीं जिन्यांतून वर, व खालीं, आणि प्रत्येक खोलींतून, ओरडा आणि शिंगें फुकणें हें चालावयाचें; व मध्यें मध्यें, ह्मणतां ह्मणतां त्यानें रचलेलीं पदें चालावयाचीं. आणि ध्रुपदाला तेवढा बाकीच्या सर्वांनीं सूर ओढावयाचा. मागें सांगितलेंच आहे कीं, गाणें ह्मणजे काय, याची त्याला मुळींच कल्पना नसे, पण ताल त्याला अगदीं बराबर समजे. जेव्हांच्या तेव्हां कविता करण्याची जी हतोटी त्याला साधलेली होती, तिचा उपयोग तो मनसुराद करीत असे. अशा रीतीनें ज्या कविता तो रची,

व ज्या तो 'विचारी कवि' अशा टोपण नांवाच्या कवीच्या ह्मणून नेहमीं ह्मणे, त्या केवळ घरगुती मंडळीसाठींच असत.

तो शब्दांवर श्लेष करी ह्मणून मागें सांगितलें, पण ही त्याला कांहीं खोड नव्हती; तद्वत्च बोलण्यामध्यें ओढून ताणून कांहीं विनोद करावयाचा, अशीही त्याला संवय नसे. त्याच्या अलंकारिक बोलण्याप्रमाणें त्याचें विनोदी बोलणेंही जोरदार व अर्थप्रचुर असे, आणि चालल्लेल्या भाषणाच्या अनुरोधानें, व त्या त्या प्रसंगाच्या ओघानें सुचणारें असेंच असे. लंदनमध्यें असतांना बहिणींना घेऊन फिरावयास गेला ह्मणजे रस्त्यांतील प्रत्येक दुकानदाराच्या नांवावर, आणि आगगाडींतून जात असला, ह्मणजे प्रत्येक स्टेशनाच्या नांवावर, कांहीं तरी हास्योत्पादक विनोद ह्याचा असावयाचाच. घरीं असला ह्मणजे यूरोपखंडांतील सर्व देश, अमेरिकेंतील सर्व संस्थानें, हिंदुस्थानांतील मुख्य शहरें, फ्रान्स देशांतील प्रांत, इंग्लंदचे आजपर्यंतचे मुख्य प्रधान, किंवा कोणत्या तरी एकाद्या शतकांतले मुख्य मुख्य ग्रंथकार व चितारी, ह्यांचीं नांवें त्यानें पटापट एका मागून एक घ्यावीं, आणि प्रत्येक नांवांतून कांहीं तरी श्लेष काढीत सुटावें; ते श्लेष छानदार असावयाचे, नेहमीं ध्यानांत राहतील असे असावयाचे, किंवा अति कुत्सित असावयाचे, पण ते एरवी कसेही असोत, ते ऐकून हंसें कोसळावयाचेंच. आणि गारगोटींतून जसे ठिणग्यांचे वर्षाव पडतात, तसा त्यांचा वर्षाव त्याच्या तोंडांतून होत असावयाचा. कवितांच्या भंड्या करणें हा जो खेळ आहे, त्याचा तर त्याला कधींच कंटाळा येत नसे. ह्या कामांत ती सगळींच भावंडें हुशार असत, पण याची स्मरण शक्ति विलक्षण असल्यामुळें, त्याचा नंबर पहिला लागे. ह्या भंड्या रात्रीं मुलांच्या खोलींत चालावयाच्या; तेव्हां आपल्या चेंबर्समध्यें निजावयास जाव-

याची त्याची वेळ झाली ह्मणजे त्यानें पुष्कळ वेळ आठवीत बसलेली एखादी कविता ह्मणावी व खोलींतून एकदम निसटावें, इतक्यांत त्याच्याशीं जुळणारी कविता दुसऱ्या कोणास आठवली ह्मणजे त्या माणसानें त्याच्या मागोमाग ती ह्मणत जिन्यापर्यंत जावें, अशा साठीं कीं, आपणास हार देऊन त्यानें निघून जाऊं नये. पण त्यानें काय करावें कीं खालच्या दिवाणखान्याचा दरवाजा हातानें उघडा करून धरावा, व तेथूनच मागच्या कवितेला जुळणारी अशी दुसरी एक कविता मोठ्यानें ह्मणावी, आणि अशा रीतीनें अखेरीस विजयी होऊन चालतें व्हावें.

ह्यांपैकीं कोणत्याही गोष्टीचा मागमोस १८३० पूर्वींच्या त्याच्या पत्रांत सांपडत नाहीं. तेथपर्यंत तो बापाखेरीज कोणाशींच नियमितपणें पत्रव्यवहार करीत नसे; आणि त्या दोघांमध्यें जरी परस्परांविषयीं पुष्कळ प्रेम वास करीत होतें, तरी त्यांच्या उद्योगामध्यें किंवा मनोभावामध्यें परस्पर साम्य फारच थोडें होतें. त्याच्या स्वभावाचें विनोदी अंग जें कागदावर दिसूं लागलें, तें पुढें तो वयानें व अभिरुचीनें त्याच्याशीं अधिक निकट अशा माणसांशीं (त्याच्या बहिणींशीं) जेव्हां तो बहुतेक दररोज पत्रव्यवहार करूं लागला, व त्यांच्यापुढें आपलें सगळें मन जेव्हां ओतूं लागला, तेव्हां दिसूं लागलें. त्यानें केंब्रिज सोडिलें, तेव्हांपासून तों तो पार्लमेंतांत शिरे तोंपर्यंत (१८२४ ते १८३०) त्यानें जीं आपल्या आईबापांस पत्रें पाठविलीं आहेत, त्यांतील बहुतेक कर्तव्य ह्मणून पाठविलेलीं पत्रें ह्या सदराखालीं मोडतात. त्यांमध्यें राजकीय विषय, कोर्टांतील गप्पा, स्वतः कोठें गेला व काय केलें त्याच्या हकीकती आणि घरगुती विशेष गोष्टी, एवढ्यांचाच उल्लेख असावयाचा; त्यांत कांहीं गोष्टींबद्दल अगदीं मौन असावयाचें; पण मनाचा उमाळा किंवा वाचेचें सौलभ्य ह्यांचा बहुतेक अभावच.

एथवर याच्याविषयीं आह्मी ह्या ज्यागोष्टी सांगितल्या, त्यांवरून अशी जर कोणाची समजूत झाली असेल कीं, या वेळीं तो अस-ल्याच हलक्या गोष्टींत आपला सर्व वेळ घालवीत असे, व महत्वाचा असा दुसरा उद्योग कांहीं करीत नसे, तर ती त्याची मोठी चूक होय. एडिंबरो रिव्ह्यूमध्यें त्यानें लिहिलेल्या ज्या निबं-धांस आधींच उल्लेख आलेला आहे, त्याव्यतिरिक्त ह्या मुदतींत त्यानें इटालियन चाणक्य माकियाव्हेली आणि हालामचा इंग्लंदच्या राज्यपद्धतीचा इतिहास, ह्या दोन विषयांवर तर उत्तमच निबंध लिहून शिवाय हलके सलकेहि दुसरे पुष्कळ लेख लिहिले. एडिंबरो रिव्ह्यूशीं पहिल्या पांच वर्षांच्या त्याच्या संबधांत त्याचें फार मोठें साहस ह्मटलें ह्मणजे जेम्स मिल्ल ( जान स्टुअर्टचा बाप ), जेरेमी-बेंथाम, इत्यादि उपयुक्तता तत्वाच्या उत्पादकांशीं व त्यांच्या तरुण व कमी प्रसिद्ध अशा चेल्यांशीं याचे जेदोन हात झाले, ते होत. खरोखरी पहातां, ह्या पंथाचे जे हे अग्रणी होते, त्यांना जरी तो फारच चाहात असे, तरी त्यांच्या शिष्यांविषयीं ह्याचा ग्रह फार वाईट असे. कारण त्यांपैकीं पुष्कळांविषयीं त्याचें असें मत झालेलें होतें कीं, हे फारसा विचार न करितां किंवा फारसें न वाचतां, गुरूपासून चार पांच ठरीव वचनें पाठ करून तत्ववेत्ते बनलेले आहेत. आणि मेकालेचे ह्या लोकांवरचे हे हल्ले गैरवाजवी नव्हते, असें जान स्टुअर्ट मिल्ल ह्यानें देखील मोठ्या औदार्यानें पुढें प्रसंगानुसार कबूल केलें आहे.

त्यानें बॅरिस्टर ह्या नात्यानें ज्या चेंबर्स घेतल्या होत्या व ज्यां-मध्यें त्यानें दिवस घालवावयास पाहिजे होते, पण केवळ रात्री घाल-वीत असे, ( १८२९ ते १८३४ ) त्या ग्रेट आर्मंड स्ट्रीटमधील घरापासून ५ मिनिटाच्या रस्त्यावर होत्या. त्याला जी कॉलेजांत

फेलोशिप मिळाली होती ह्मणून मागें सांगितलें, तिचे त्याला वर्षाचे तीनशें पौंड मिळत, आणि एडिंबरो रिव्ह्यूमध्यें तो जें लिही त्याबद्दल त्यास वर्षाचे सरासरी तितकेच पैसे मिळत. इ. स. १८२८ च्या जानेवारींत लार्ड गॉडरिश ह्यानें मुख्य प्रधानकीचीं वस्त्रें काढून टाकिलीं व पुढें ड्यूक आव् वेलिंग्टननें तीं परिधान केलीं, त्या मधल्या मुदतींत लार्ड लिंडर्स्ट ह्यानें त्यास कमिशनर आव् बँक्रप्टसी ह्या हुद्यावर नेमिलें. ह्या हुद्यावर तो पुढें तीन चार वर्षें होता; त्या मुदतींत त्याचें वर्षाचें एकंदर उत्पन्न सरासरी हजार पौंड असे. त्याच्या गरजांच्या मानानें हें उत्पन्न पुरून उरण्यासारखें होतें, पण त्याच्या मनांत जी राजकीय विषयक महत्वाकांक्षा आतां उत्पन्न होऊं लागली होती, ती पुरी होण्यास हें उत्पन्न फारच थोडें व फारच अनिश्चित असें होतें. त्याची बहीण लेडी ट्रेव्हेल्यन ह्यासंबंधानें असें ह्मणते:—सार्वजनिक कृत्यांत त्याचें मन आतां फारच जाऊं लागलें होतें. क्यानिंगचें मुख्य प्रधान होणें, नंतर लवकरच त्याचा मृत्यु, नंतर टेस्ट आक्टाचें रद्द होणें, नंतर रोमन क्याथलिक लोकांस पार्लमेंतांत बसण्या विषयीं परवानगी मिळणें, ह्या ज्या अनेक गोष्टी ह्या वेळीं एका मागून एक अशा रीतीनें बनून आल्या, त्यांत त्याचें मन गर्क होऊन गेलेलें होतें. पार्लमेंतांत आपला शिरकाव केव्हां होईल, असें त्यास आतां झालें होतें; पण तेथें प्रवेश होण्याची आशा मात्र ह्यावेळीं त्यास फारच अल्प होती.

ह्या चार पांच वर्षांतील त्याच्या पत्रव्यवहारावरून पुढील गोष्टी व्यक्त होतात. १८२६ सालीं यॉर्क शहरीं तो फिरतीवर असतां एका सालिसिटरची ओळख करून देण्याकरितां त्याच्या बापानें त्यास पत्र दिलें होतें, पण अशीं पत्रें त्या लोकांकडे घेऊन जाणें बारिस्टरच्या ब्रीदाविरुद्ध आहे, असें त्याचें मत असल्यामुळें तें त्यानें

तसेंच ठेवून दिलें. त्याच सालीं प्रसिद्ध विनोदी धर्मोपदेशक सिडने स्मिथ त्याची कीर्ति ऐकून त्यास मुद्दाम भेटावयास आला, व त्यानें त्यास अत्यन्त आग्रहपूर्वक पाहुणचाराचें आमंत्रण केल्यावरून तो त्याजकडे चार दिवस रहावयास गेला. ह्या भेटीचें फारच मनोहर व मजेदार वर्णन त्यानें आपल्या बापास लिहून पाठविलें आहे. त्याची चातुर्यपूर्ण, विनोदी, व कावेबाजाची जी भाषणशैली, तीस उल्लेख करून मेकाले ह्मणतो; " ह्या आपलें विनोदी संभाषण विशेष प्रसंगासाठीं ह्मणून राखून ठेवीत नाहीं; त्याचा प्रवाह सारखा सुरू असतो, आपल्या बायकोस व मुलीस दोन तीन तास सारखें हंसवीत ठेवणें, ह्यांतच त्यास अत्यन्त सुख वाटतें; कायदा, सरकार, व्यापार, इत्यादि गोष्टींविषयींचीं त्याचीं मतें फारच विशद व योग्य अशीं आहेत; इ०

इ. १८२७–२८ च्या सुमारास, आह्मांस पार्लमेंतांत बसूं द्या हें जें क्याथलिकाचें मागणें तें पार्लमेंतानें कबूल करूं नये, अशा अर्थाचा अर्ज पाठविण्याचें केंब्रिज युनिव्हर्सिटीच्या सेनटनें बहुमतानें ह्मणून ठरविलें. कमी मतवाल्यांनीं दोन्ही बाजूंच्या मतांची प्रत्यक्ष मोजणी मागितली, आणि लंदन मधील आपल्या मित्रांस त्या प्रसंगीं हजर रहाण्याविषयीं इशारा केला. तो येऊन पोहोंचतांच मेकालेनें एक दोन मित्रांच्या सहाय्यानें लंदनमधील बारिस्टरांच्या सर्व खोल्या धुंडाळल्या, एक तांगा तयार केला, त्याच्या आंत व बाहेर व्हिग पक्षाचे तरुण एम. ए. कोंबून भरले आणि कमी मताचें बहुमत करण्यासाठीं अगदीं वेळेवर मतदानस्थळीं जाऊन पोंहोंचला. नंतर सगळी मंडळी आनंदानें कालेजांत जेवली, आणि त्याच संध्याकाळीं लंदनास परत आली. " धर्म नाहीं व धंदा नाहीं अशा तांगाभर बारिस्टरांनीं " युनिव्हर्सिटीचें विचारपूर्वक झालेलें मत उलट्याचें पालथें केलें हें पाहून टोरी वर्तमानपत्र कर्त्यांचें पित्त खवळलें, व त्यांनीं यांजवर खूप पुष्पवृष्टि केली. दुसरें काय करितील बिचारे !

१८२८ सालीं मेकाले एडिंबरो शहरीं रिव्ह्यूचा संपादक जो जेफ्री त्याजकडे भेटावयास गेला. त्याचेंही त्यानें फार हुबेहुब वर्णन केलें आहे. तो ह्मणतो, जेफ्री वीस प्रकारचीं तोंडें करितो, व सगळीं एकमेकांपासून अगदीं निराळीं; तो बोलतांना आवाजही तसेच निराळे काढितो; दुसऱ्याची बतावणीही चांगली करितो, आणि गोष्ट सांगावयास लागला कीं कितीतरी निरनिराळ्या तऱ्हांनीं बोलतो; त्याचें संभाषणही त्याच्या चेहऱ्यास व आवाजास शोभेल अशाच नमुन्याचें असतें; त्याची मुलगी व बायको त्याचा अगदीं देव करितात; इ.

१८३० सालीं मेकालेचे मिल्लवरील लेख पाहून लॉर्ड लॅण्ड्स्डौन फारच खुष झाला, आणि "कान" या गांवच्या पार्लमेंतीय सभासदाची जागा रिकामी पडली होती, ती त्याच्या ताब्यांतील असल्यामुळें तो ती मेकालेस राजकीय कारणांत पुढें आणण्यासाठीं देण्यास तयार झाला. त्यानें त्याबद्दल यास जें पत्र लिहिलें त्यांत असें स्पष्ट ह्मटलें होतें कीं, तुझी खाजगी व नैतिक वर्तणूक पाहून मी खुष झालों आहे, व ह्मणूनच ही जागा मी तुला देऊं करित आहे; तूं पार्लमेंताचा सभासद झालास, ह्मणजे त्वांअमुक एक प्रकारचें मत दिलेंच पाहिजे वगैरे माझी कांहींएक अट नाहीं; त्या कामांत तुझ्या मनोदेवतेच्या सांगण्याप्रमाणें वागण्यास तुला पूर्ण मुभा आहे; इ. इ.

ह्या देणगीचा मेकालेनें आनंदानें स्वीकार केला; व तदनुरूप १८३० सालीं वयाच्या ३० व्या वर्षीं तो पार्लमेंताचा सभासद झाला. त्यावेळीं त्याच्या बापाचें उत्पन्न कमी झालें होतें, हें मागें सांगितलेंच आहे. ह्मणून आपल्या नवीन कर्तव्यास आपलें तन, मन, धन, सर्व अर्पण करावें, अशी जरी त्याची फार इच्छा होती, तरी गृहस्थिति लक्ष्यांत आणून त्यानें आपला बारिस्टरीचा धंदा एकदम सोडिला नाहीं; बाकी, त्यांत त्यास किफायत बेताचीच होत असे, ह्याचें दिग्दर्शन अगोदर केलेंच आहे.

# प्रकरण तिसरें.

## पार्लमेंतांत प्रवेश.

मेकाले ज्या वेळीं पार्लमेंताचा सभासद झाला त्यावेळची इंग्लंदची व पार्लमेंताची एकंदर स्थिति फारच चमत्कारिक झालेली होती. ज्याच्या अंगीं धमक असेल, ज्याला लोकांवर होत असलेल्या अन्यायांची चीड असेल, आणि लढाईसाठीं ह्मणूनच लढण्याची हौस असेल, त्यास आपल्या जन्माचें सार्थक्य करण्यास व मेहनतीचें चीज करून घेण्यास, ही संधि फार उत्तम होती.

१७८९ सालीं फ्रान्स देशीं जी मोठी राज्यक्रान्ति झाली, व जिचें वावटळ इंग्लंद देशावर अप्रत्यक्ष रीतीनें येऊन, पार्लमेंतीय, व्यापारविषक, व इतर सर्व सुधारणांवर जें पुरें विरजण पडलें, तेव्हांपासून ह्या काळपर्यंत बहुतेक टोरी पक्षाचें व टोरी पक्षाचें ह्मणजे सुधारणाविरुद्ध मतांचें, सारखें प्राबल्य झालेलें होतें. अलीकडे जसें कांहीं दिवस कान्सर्व्हेटिव्ह पक्षाचें वर्चस्व तर कांहीं दिवस लिबरल पक्षाचें पक्षाचें वर्चस्व, अशी स्थिति असते, तशी स्थिति त्यावेळीं बहुतेक मुळींच नसे. आपली मतें लिबरलपक्षीय आहेत असें उघड ह्मणणें ह्मणजे सर्व प्रकारचे मान, सर्व प्रकारच्या लहान मोठ्या पगाराच्या जागा, सर्व प्रकारचा धंदा, आणि सर्व प्रकारचे सामाजिक आदरसत्कार, ह्या सर्वांवर पाणी सोडणें, असें असे. कधींही राजकीय कामांत न पडणारे लहान सहान व्यापारी, ह्यांनीं केव्हां असें ह्मटलें कीं पुरे, कीं फ्रान्स देशांतील जे क्रान्ति करणारे आहेत त्यांच्या ह्मणण्यांत कांहीं तथ्य आहे; झालाच त्यांचा उदीम बंद; लागलाच त्यांना व्हावयाला त्रास; मग त्या विचाऱ्यांस असें

व्हावयाचें कीं अशा स्थितींत राहण्यापेक्षां आपल्या टोपल्या उचलून, बिन्हाड बाजलें डोकीवर घेऊन, आपणामध्यें व आपल्या टोरी पक्षीय शेजाऱ्यांपाजाऱ्यांमध्यें आटलांटिक महासागर घालणें फार बरें. बर्कनें आपल्या " फ्रेंच रेव्होल्यूशन " ( फ्रान्सांतील क्रान्ति ) वगैरे पुस्तकांतून जें लिहिलें आहे तें म्याकिंटॉश ह्यानें " व्हिंडिसिइ ग्यालिसिइ " ( फ्रेंच लोकांच्या कृतीचें मंडण ) ह्या आपल्या पुस्तकांत चांगलें खोडून टाकिलें आहे, असें कोणी धर्मोपदेशकानें ह्मटल्याचा संशय आला, कीं निघालीच त्याची नास्तिक ह्मणून कालेजांतील फेलोशिप, किंवा काढलीच त्याची र्‍याडिकल ह्मणून धर्मोपदेशकाची जागा. राजकीय द्वेष आणि राजकीय लाडकेपणा ह्यांचा आजपर्यंत व्यवहारांतील ज्या बाबींतून शिरकाव झालेला नव्हता त्यांना देखील त्यांचा संस्पर्श यावेळीं होऊं लागला. व्हिग व्यापारी असला कीं त्याला सरकारी प्रॉमिसरी नोटीचे पैसे मिळ-ण्याची देखील मारामारी पडावी, आणि व्हिग ब्यारिस्टर असला कीं, आपलें ह्मणणें जज्ज आणि ज्यूरी ह्यांजकरवीं ऐकून घेववण्याची देखील त्यास पंचाईत पडावी. बरें, जे व्हिग मुत्सदी असत, त्यांचें जीवित व स्वातंत्र्य ह्यांस जरी त्यांच्या मोठेपणामुळें ह्या कालांत कधीं धक्का लागत नसे, तरी कामन्स सभेंत त्यांच्या हातीं कधीं सत्ता नसे, आणि लार्डांच्या सभेंत त्यांची कधीं शिवाशिव कोणी घेत नसे. अशा आणीबाणीच्या प्रसंगीं मूठभर जरठ व्हिग मुत्सदी जे आपल्या सुधारणारूपी निशाणास चिकटून राहिले, ते आपल्या मतांपासून जरी आपणास काडीचा फायदा नसला, तरी तीं खरीं आहेत अशी त्यांची पक्की खात्री असल्यामुळेंच राहिले. ह्यावेळची इंग्लंदांतील राज्यपद्धति ह्मणजे निवळ पार्लमेंतांतील बहुमत मुठींत धरणारांचा अनिर्बंध अधिकार, अशी स्थिति असल्यामुळें, विचार व

वक्तृत्व ह्या दोहोंचेंही पार्लमेंतांत कांहीं चालत नसे. पार्लमेंतांत बसण्यास इंग्लंडांतील कौंटीचे सभासद निवडण्याची जी पद्धत होती ती अगदीं जगाविरुद्ध होती, आणि शहरांचे प्रतिनिधी निवडण्याची जी चाल होती ती बहुतेक लाजिरवाणी होती. स्काटलंदांतील निवडणुकीचीं सगळीं स्थळें, इस्त इंडिया कंपनीच्या कारभारावर देखरेख ठेवणाऱ्या बोर्ड आव् कंट्रोलचा अध्यक्ष जो लार्ड डंडस् त्याच्या खिशांत जाऊन पडलेलीं होतीं. शिवाय, मतदारांची एकंदर संख्या ह्या वेळेस फारच थोडी होती; आणि हिंदुस्थानांतील लहान मोठ्या जागा देण्याचा त्याच्या हातीं इतका अधिकार. मग काय विचारतां! दौन कौन्सिलमध्यें नेमणूक आहे, किंवा तालुक्यामध्यें वजन आहे, सारांश, थोडे फार मतदार मुठींत आहेत इतके जे दैवशाली होते, त्यांचे मुलगे आणि पुतण्ये ह्याचा तिन्ही इलाख्यांवर पूर येऊन गेला. नशीब हिंदुस्थानचें व ब्रिटिश बादशाहीचें, कीं हे जे तरुण सिव्हिल सर्व्हंट होऊन इकडे अशा रीतीनें आले त्यांनीं आपली जबाबदारी ओळखून, केवळ आपल्या पक्षाच्या अभिमानासच चिकटून न राहतां, आपली दृष्टि जरा दूरवर पोंचाविली.

अशा रीतीनें लोकमताचा एकीकडे पार्लमेंतांत पक्षघात करून टाकला असतां दुसरीकडे पार्लमेंताबाहेरही त्याचा उद्गार पडूं नये अशी खबरदारी घेतली होती. इंग्लदांत वर्तमानपत्रांच्या तोंडांत बोळा कोंबला होता, व स्काटलंडांत वर्तमानपत्रांचे गळे दाबून टाकिले होते. [illegible]स कसें तरी मारून मुटकून सरासरी राजद्रोहासारख्या अपराधाचें रूप देतां येईल असें एकादें भाषण कोणी केलें, किंवा धर्मव्याख्यान दिलें, किंवा चोपडें काढिलें कीं पडलाच तो तुरुंगांत किंवा मानखोड्यांत. ज्या ज्या चार असामी एकत्र जमण्याच्या ठिकाणीं ह्मणून अधिकाऱ्यांस चोरून बातमी देणाराचा प्रवेश

असेल, तेथें तेथें आपल्या मनांतले विचार स्पष्ट बोलून दाखवा-वयाचे, ह्मणजे भिकेस लावील अशा दंडास, किंवा लवकर संपणार नाहीं अशा कैदेस, आपणास पात्र करून घ्यावयाचें, अशी स्थिति झाली होती. भारलेल्या जुऱ्या आणि भेदरलेले माजिस्ट्रेट, ह्यांच्य जुलमांतून सुटका करून घेण्यासाठीं पार्लमेंताकडे धांव घ्यावी, सर अगदीं फुकट. हॅबिएॅस कॉर्पस आक्ट (व्यक्तिस्वातंत्र्यरक्षणाचा १६७३ त पास झालेला कायदा) ह्याचा फायदा आपल्या देश-बांधवांचा कायम रहावा ह्मणून शेरिडन ह्या प्रसिद्ध नाटककारानें व वक्त्यानें पार्लमेंतांत खटपट केली; पण त्याच्या ह्या सूचनेस मोठ्या मारामारीनें काय तीं ४१ मतें मिळालीं. प्रसिद्ध राजकारणी पुरुष चार्ल्स् जेम्स फॉक्स ह्याच्याही दुसऱ्या एका खटपटीस इत-केंच यश आलें. प्रधानांनीं एक सूचना पार्लमेंतापुढें आणली होती; तिचा परिणाम असा व्हावयाचा होता कीं, पार्लमेंताची सुधारणा ह्या विषयाचा विचार करण्यासाठीं भरलेल्या सार्वजनिक सभेस कोणी गेलें असतां तें जाणें, रात्रीचें एकाद्याच्या रानांत चोरण्यास जाण्या-इतकें, आणि जकात चुकवून माल आणण्यापेक्षां फारच जास्त भयंकर, व्हावें. ह्या सूचनेस हाणून पाडावी असा फॉक्सचा उद्देश होता; त्याचीही वाट वर सांगितल्याप्रमाणेंच लागली. ह्याच्यापेक्षांही लोकांच्या स्वतंत्रेंत ज्यास्त हात घालणारा, व आज्ञाभंग करणारास ह्याच्यापेक्षांही ज्यास्त निर्घृण शिक्षेस पात्र करणारा, असा एका कायद्याचा मसुदा पुढें आला होता; तो पार्लमेंतानें पास करूं नये ह्मणून खटपट केली; तीस वरच्या पेक्षां कायते १० ज्यास्त मतें देणारे मिळाले. ह्याच कायद्याच्या संबंधानें बिशप हॉर्स्ले हा लार्डांच्या सभेंत ह्मणाला कीं " कायदे मुकाट्यानें पाळणें ह्या पली-कडे कोणत्याही देशांतील बहुजनांचा त्यांच्याशीं संबंध काय पोहों-चतो हें मला समजत नाहीं. "

ज्या लोकांनीं स्वतंत्रतेचा उपभोग पूर्वी घेतलेला होता, व तिचा उपभोग घेण्यास जे अद्यापि पात्र होते, अशा लोकांमध्यें अशा प्रकारची स्थिति नेहमी राहणें शक्य नव्हतें. नेपोलियनचा पाडाव करण्याचा कामीं जो निश्चय, जो जोर, व जो दीर्घोद्योग त्यांनीं व्यक्त केला होता, त्यामुळें मिळालेल्या पूर्ण जयानें गर्विष्ठ होत्साते तिसऱ्या जार्जाचे टोरी प्रधान असें मानू लागले कीं, हा आमच्याच पक्षास जय मिळाला आहे, आणि त्याचा परिणाम राज्याचीं सूत्रें आमच्याच हातीं कायमचीं रहावीं हाच होणार आहे. पण १८१५ च्या जून महिन्याच्या १८ व्या तारखेस ( वाटर्लू येथें ) तोफेंतून जो शेवटचा गोळा सुटला, त्याचा आवाज ह्मणजे वास्तविकरीत्या पाहतां टोरी पक्षाचें जें आजपर्यंतचें सुवर्णयुग तें संपलें, असें सुचविणारा तो यमघंटारवच होता. लढाईच्या वेळीं उत्पन्न झालेला क्षोभ व रग हीं जाऊन त्या ऐवजीं व्यापाराचें इतकीं वर्षे मांतेरें झालें असल्यामुळें जेव्हां राष्ट्रांत असंतोष वृद्धिंगत झाला, तेव्हां सुधारणाशत्रूंच्या असें ध्यानांत येऊं लागलें कीं, ह्यापुढें आपल्यास केवळ लहानशा व निरुत्साह झालेल्या व्हिगमंडळापुढेंच तगाव काढावा लागणार आहे असें नाहीं, तर ज्याचे धुरीण फारच सुसंस्कृत व फारच मोठे आहेत अशा राष्ट्रांतील निःसंशय बहुपक्षाशीं आपणास टक्कर मारावी लागणार. एकाद्या राष्ट्रानें कोणतेंही एकादें कृत्य मनापासून करावयाचें आरंभिलें ह्मणजे लुंगेसुंगे चळवळ्ये व केवळ आगलाव्ये असे जे असतात ते मागें सरावयाचेच, तसे ते ह्या वेळींहि सरले; आणि ज्यापाशीं गमावण्यासारखें अब्रू, जीवित व धन पुष्कळ होतें, व तें धोक्यांत घालण्यास जे सिद्ध होते, असे मुत्सद्दी पुढें सरसावले. लोकप्रियतेच्या अभावानें कटु झालेल्या अधिकारपदापासून दूर रहाणें ज्या पुरुषांनीं आजपर्यंत सहन केलें होतें, ते पुरुष व त्यांचे

मुल्गे ह्यांना शेवटीं त्यांच्या तपश्चर्येचें फल प्राप्त झालें. ज्याला चाळीस वर्षांपूर्वी नार्थ शील्डस् या शहरच्या रस्त्यांतून 'पोपचा सुळसुळाट आह्मास नको' पोपचा सुळसुळाट आह्मास नको,' असें ओरडत लोकांनीं धुडकून लाविलें होतें, तो अर्ल ग्रे सगळ्या इंग्लंदांत आपलें नांव अत्यन्त सन्मान्य करून घेण्यास जगला, आणि १७९१ सालीं जीं मतें प्रदर्शित करण्याबद्दल बर्मिंघामच्या लोकांनीं डा० प्रीस्टलेचें घर त्याच्या देखत जाळलें होतें, त्याच्यापासून फारशीं भिन्न ज्याचीं मतें नव्हतीं तो लार्ड ब्रूम लोकांचा अनुपमेय व अप्रतिस्पर्ध्य असा देव बनून [illegible].

लोकांचें असें ऐकमत्य झालें आहे, व त्यांस इतके योग्य व इतके गुणी अग्रणी मिळाले आहेत हें पाहून प्रधानमंडळाचें धाबें दणाणून गेलें; आणि प्रजेचा विश्वास ज्यांवरचा उडून गेला आहे अशा राज्यकर्त्यांच्या शिरतीस अनुसरून ते प्रथम चुका करूं लागले, व नंतर आपापसांत भांडूं लागले. मेकाले ऐन तारुण्याच्या भरांत असतां टोरी पक्षाचें इतके दिवस घट्ट बसलेलें लोणी भराभर वितळावयास लागलें होतें. सन १८२९ सालीं क्याथलिक लोकांस जेव्हां पार्लमेंतास बसावयाचा हक्क मिळाला, तेव्हां टोरी पक्षाच्या अंतःकरणास असा बळकट धक्का बसला कीं, शेवटीं जुन्या सर्व व्यवस्था पूर्णपणें नाहींतशा होत तोंपर्यंत त्या धक्यांतून तो पक्ष वर उठला नाहीं. ह्या संबंधानें मेकालेस लार्ड क्लारेंडननें दिलेलें एक उत्तर तो वरचेवर सांगत असे. ड्यूक आफ् वेलिंग्टन ह्या वेळीं मुख्य प्रधान असून तो ह्या प्रश्नाविरुद्ध पहिल्यापासून होता. परंतु ह्या प्रसं[illegible] एरवीं ऐर्लंदांत बंड होणार असें पाहून तो ह्या प्रश्नास निरुपायानें अनुकूल झाला. ह्या गोष्टीच्या संबंधानें ह्या दोन तरुणांचें बोलणें चाललें असतां मेकालेनें मोठ्या जिज्ञासेनें क्लारेंदनास विचा-

रिलें, "काय रे, लार्डस् सभेला ह्या बिलास अनुकूल मत देण्यास ड्यूक आफ् वेलिंग्टन कसें सांगेल रे? दुसरा उत्तर करितो, "अः त्यांत काय कठीण आहे? तो ह्मणेलः—सभासद हो! अटेन्शन्! रैट अॅबाउट फेस! मार्च! (लक्ष्य द्या! तोंडें मागें फिरवा! चला!) ड्यूक आफ् वेलिंग्टन पूर्वी शिपाई असून आतां मुत्सद्दी झाला होता, व लॉर्डांना आपलीं पूर्वीचीं सर्व मतें एकीकडे गुंडाळून ठेवून आतां उलट मत द्यावयाचें होतें, ह्या दोन गोष्टी लक्ष्यांत आणिल्या ह्मणजे ह्या उत्तराची समर्पकता पूर्णपणें कळून येते.

सारांश व्हिग पक्षाचे कष्टाचे व मारामारीचे दिवस निघून जाऊन ते अधिकारापन्न होण्याचे दिवस नजीक आले होते; आणि अशा समयास मेकालेचा पार्लमेंतांत प्रवेश झाला, ह्यावरून तो मोठा भाग्यशाली ह्मणून समजला पाहिजे.

ज्या कायद्यानें १८२९ सालीं रोमन क्याथलिक लोकांस पार्लमेंतांत बसण्याची परवानगी मिळाली, त्याच कायद्यांत अशी एक अट चुकून पडली कीं, तिचा परिणाम ज्यू लोकांस पार्लमेंतचे सभासद होण्याची पाळी येऊं नये असा झाला. तेव्हां तो हक्क त्यांस प्राप्त व्हावा एतदर्थ राबर्ट ग्रांट ह्यानें १८३०च्या एप्रिलांत सूचना आणिली होती. त्या बिलाच्या दुसऱ्या वाचनाच्या वेळीं मेकालेनें पार्लमेंतात पहिलें भाषण केलें. तें फार चांगलें वठलें. आपल्या इकडे जी मारवाड्यांची तीच तिकडे ज्यू लोकांची स्थिति आहे. ते जसे श्रीमंत तसेंच सामान्यजनतिरस्कृत आहेत. तेव्हां मेकालेनें त्यांच्यासंबंधानें पार्लमेंतास असें विचारिलें कीं, चाकरावर यजमानाचा, कुळावर जमीनदाराचा, कारकुनावर पेढीवाल्याचा, जो अधिकार आहे तो सर्व ज्यू लोकांस तुह्मी चालवूं देतां; तद्वत्च ईस्त इंदिया कंपनीचे डिरेक्टर नेमणें, ह्या किंवा त्या पक्षास वर किंवा खालीं

करणें, फार तर काय, पण पार्लमेंताचे सभासद करणें, ह्या सर्व गोष्टी द्रव्यसाध्य असल्यामुळें ज्यू लोकांना साध्य आहेत. असें असतांना एवढाच अधिकार त्यांला द्यावयास तुह्मी कांकूं करतां ह्यास काय ह्मणावें? मेकालेनें दाखविलेल्या ह्या सर्व गोष्टी जरी उघड होत्या, तरी ज्यू लोकांस तो अधिकार असावा अशी लार्डांची खात्री होण्यास आणखीं २६ वर्षे लोटावीं लागलीं!

मेकालेनें ह्या सेशनांत (वर्षांतून पार्लमेंताचें बहुधा एकच सेशन बसतें, व तें बहुधा जानेवारी किंवा फेब्रुवारींत भरून जुलई—आगष्टांत खलास होतें.) आणखीं एकच कायतें भाषण केलें; व हें त्याचें प्रारंभींचें मौनच पुढें त्याचें त्या सभेंत वजन बसण्यास कारणीभूत झालें. कारण आतां अशीच वेळ येऊन ठेपत होती कीं ज्याच्या अंगीं वक्तृत्वशक्ति असून आत्मसंयमनाच्या योगानें ज्यानें पार्लमेंताची अशी खात्री केली आहे कीं हा उगीच बोलावें ह्मणूनच बोलत नाहीं, असा माणूस एका दिवसांत मोठ्या अधिकारास चढून जावा. ह्या वेळीं सर्व इंग्लंदावर ड्यूक आफ् वेलिंग्टनचा एकट्याचा अधिकार चाललेला होता; कारण त्यानें हळूहळू आपल्या प्रधानमंडळांतून, सगळे व्हिग प्रधानच केवळ नव्हत, तर ज्यांस स्वतांचें मत ह्मणून आहे असें सगळे टोरी प्रधानही काढून टाकिले होते; व शेवटीं त्याच्या क्याबिनेटांत (मुख्य प्रधानमंडळांत) सर्व बावलीं राहिल्यामुळें राज्याचा कारभार इतका पूर्णपणें एकछत्री बनला होता कीं लोकांना असा संशय उत्पन्न होऊं लागला कीं, फ्रान्सच्या राजाचा प्रधान जो पॉलिंयाक् त्याच्याशीं ह्याचें जितकें दळणवळण असेल, तितकें देखील इतर प्रधानांशीं आहे किंवा नाहीं. लार्डांच्या सभेंत तर तो करील ती पूर्व दिशा अशी स्थिति होती; आणि कामन्स सभेंत जरी शुद्ध अशीच स्थिति नव्हती, तरी

आपल्याला इष्ट वाटतील ते कायदे पसार करण्याचें, किंवा निदान त्यांच्या संबंधानें आपली मतसंख्या वाढविण्याचें देखील, व्हिग पक्षामध्यें सामर्थ्य राहिलें नव्हतें, सारांश, १८२१ त चवथा जॉर्ज जेव्हां गादीवर बसला, तेव्हां सुधारक पक्षाची पार्लमेंतांत जी स्थिति होती, तिच्यांत १८३० त तो जेव्हां मरावयास टेकला, तेव्हां कांहीं सुधारणा झालेलीच नव्हती; आणि फ्रेंच रेव्होल्यूशन होण्याच्या वेळीं धाकटा पिट ह्यानें पार्लमेंतीय सुधारणेच्या प्रश्नास जेव्हां झुगारून दिलें, तेव्हांपासून त्या प्रश्नाचें पाऊल पुढें पडल्याचें चिन्ह पार्लमेंतांत तरी कांहीं एक दिसत नव्हतें.

पण बाह्यतः अशी स्थिति दिसत होती, तरी अंतःस्थिति फार निराळी होती. एकीकडे लोकमताच्या अग्रणींचे सुधारणाविषयक प्रयत्न जरी वर सांगितल्याप्रमाणें ज्यास्त ज्यास्त निष्फळ ह्मणून भासत होते, पार्लमेंतात प्रत्येक प्रश्नासंबंधानें जरी त्यांचें न्यूनमत होत होतें, आणि त्यांनीं रीतीच्या राज्यकारभाराची कवळ मूलतत्त्वेंही शांतपणानें व मर्यादेनें जरी निरूपिलीं तरी देखील हे अराजकाचे उपदेष्टे होत अशीं जरी त्यांस विशेषणें मिळत होतीं,—तरी दुसरीकडे त्यांच्या देशबांधवांच्या मनांत एक मोठीच क्रांति हळूहळू परंतु निश्चयानें बनून येत चालली होती. १८३० चें इंग्लंड १७९० च्या इंग्लंडापासून किती भिन्न आहे हें स्पष्टपणें दाखविणाऱ्या गोष्टी घडावयाच्या बेतांत आल्या होत्या. चवथा चार्ज निवर्तला, जुलैच्या २४ वीस पार्लमेंत बरखास्त झालें (एक राजा मरून दुसरा गादीवर बसला ह्मणजे असें नेहमींच होत असे) आणि निवडणुकीचा पहिला मलचला चालला आहे, व उमेदवार अद्यापि मार्गांतच आहेत, व सभासद निवडण्याच्या लेखी राजाज्ञा पोष्टाच्या पिशव्यांतच आहेत, इतक्यांत अशी

बातमी येऊन थडकली कीं पारिस पुनः सशस्त्र होऊन उठलें. १८१५ त जे बोर्बन राजे पुनः तेथें सिंहासनारूढ झाले होते, त्याच्या विरुद्ध हें बंड होतें. ह्या प्रसंगीं राजाच्या वतीनें व राष्ट्रीय निशाणाच्या विरुद्ध शिपाई जितके चांगले लढण्याचा संभव आहे तितके जरी फ्रेंच शिपाई लढले, तरी ता. २९ च्या संध्याकाळला बोर्बन वंशाच्या राजकीय सत्तेचें सर्व गाणें आटोपलें. ज्या फ्रेंच प्रधानाच्या स्नेहामुळें इंग्लंदचा मुख्य प्रधान लोकांचा इतका नावडतां झाला होता तो त्या लोकांच्या अत्यन्त द्वेषाच्या भाराखालीं चिरडून गेला; पण त्याचा बळी पडूनही तेवढ्यानें बोर्बन घराण्याचा बचाव झाला नाहीं. फ्रान्साचा व इंग्लंदाचा पूर्वापार इतका स्नेह आहे कीं फ्रान्सांत जें जें होईल तें सगळें इंग्लंदीयांस तिरस्करणीय वाटावयाचेंच; पण ह्या वेळीं अशी स्थिति झाली नाहीं; तर फ्रेंचांचें हें करणें इंग्रजांस पसंत पडलें. फ्रान्सांतील एका राज्यक्रांती मुळें इंग्लंदांतील सुधारणा पक्षास ४० वर्षें परवशता भोगावी लागली होती; पण ह्या दुसऱ्या क्रांतीचा त्याच लिबरल पक्षास असा शुभ शकुन झाला कीं, पुढें ते तितकींच वर्षें श्रेष्ठाधिकार उपभोगित राहिले. पालिङ्यांकची जी वाट लागली तीच वेलिंग्टनची आतां होणार असें बहुतेक जण ह्मणूं लागले, व सर्वांसच वाटूं लागलें. आणि लोकांच्या मनाची स्थिति अशी कांहीं झालेली होती कीं, ज्यानें राष्ट्राच्या मनांत पुष्कळ आशा उत्पन्न केल्या आहेत, व राष्ट्राचें प्रेम आपल्याकडे आकर्षून घेतलें आहे, व त्या वेळच्या अग्रगण्य मुत्सद्यांच्या संबंधानें लोकांच्या ज्या आवडी नावडी त्याच ज्याच्या आहेत, असा राजा चवथा विलियम् ह्या वेळीं इंग्लंदच्या तक्तावर बसला होता, ह्मणूनच निभावलें; नाहींतर हा प्रसंग त्या तक्ताच्या सुस्थितीस फार जड गेला असता.

पृथ्वीच्या पाठीवर कोठेंही राजकीय गडबड उडाली ह्मणजे तिचा एक परिणाम असा होतो कीं, ती जेथें उडाली असेल तेथें पार्लमेंताचे तरुण सभासद धांव घेत असतात; स्वारी करणाऱ्या सैन्याच्या मागून जसे यहुदी दलाल जावयाचे, तसे हे सभासद यूरोपांत होणाऱ्या राज्यक्रांत्यांमागून चालले्च. कॉन येथें आपली पुनः निवडणूक व्हावयाचीच अशी मेकालेची साहजिक खात्री असल्यामुळें तो आगस्ट अखेर पारिस येथें जावयास निघाला, आणि डीप व रोआंग ह्या शहरावरून जाऊन यूरोपांत प्रवास करण्याची मजा काय आहे तिचा पहिला आस्वाद त्यानें मोठ्या उत्कंठेनें घेतला. ह्या प्रवासांत त्यानें जीं पत्रें लिहिलीं तीं, आगगाड्यांच्या पूर्वीच्या युगांत, पूर्वी कधीं बाहेर न गेलेले भाऊ, ज्यांना बाहेर जाण्याची आशा मुळींच नाहीं अशा बहिणींच्या मनावर प्रकाश पडण्यासाठीं जशा प्रकारचीं लिहीत, तशा प्रकारचींच होतीं. त्यानें तेथील रीतीभातींचें व संस्थांचें फारच बारीक रीतीनें त्या पत्रांतून वर्णन केलें आहे. जी जी गोष्ट त्यानें पाहिली, ऐकली, खाल्ली, प्याली, दिली किंवा घेतली त्या प्रत्येकीचें त्यानें आपल्या त्या उल्लासपूर्ण अशा लेखनशैलींत वर्णन करावें, अशासाठीं कीं ग्रेट आर्मंड स्ट्रीटमधील न्याहारीच्या टेबलावर तें मोठ्यानें वाचविलें जावें व त्यावर टीका व्हावी.

त्या उन्हाळाच्या महिन्यांमध्यें फ्रान्सांत राज्यक्रांतीरूप मोठ्या नाटकाचे जे अखेरचे अंक चालले्ले होते ते चालले असतां पडद्याच्या मागें जाऊन पाहण्याची संधि मेकालेस उत्तम मिळाली. त्या वेळचा तेथील मुख्य प्रधान जो ड्यूक डी ब्रोग्ली त्यानें ह्या इंग्लिशमन ह्मणून व झशारी मेकालेचा मुलगा ह्मणून त्याचा विशेष आदरसत्कार केला. डेप्युटींच्या चेंबरमध्यें ( फ्रान्सांतील प्रतिनिधिसभेंत )

भाषणानें ८४ चा ८० वर घसरला होता, तो दीड तासाच्या आंत ७७ वर येऊन थडकला. जव्हेऱ्ये व सोनार ह्यांनीं आपला माल पेढ्यांवरून काढून पाठवून दिला. व्यापाऱ्यांनीं आपल्या कारकुनांच्या हातांत शस्त्रें दिलीं, आणि आपल्या मालाच्या वखारीभोंवतीं मेंढेकोट उभारिले. आणि, पुढें जेव्हां लोकांची ही घबराई कमी झाली, तेव्हां इंग्लदचा मुख्य माजिस्ट्रेट (राजा) लंदनच्या मुख्य माजिस्ट्रेटाकडे प्रसिद्धपणें जेवावयास जाण्यास कां भ्याला, ह्या प्रश्नाची सर्व युरोपभर चर्चा चालली आहे हें पाहून त्या राजनिष्ठ लोकांचीं मनें लज्जा आणि चीड यांनीं भरून गेलीं. जो प्रधान अंगांत धमक असतां, सात दिवसांत सरकारी नोटींची किंमत शेकडा सात कमी करवितो, अशा विलक्षण मूर्तीस कोणतेंच राष्ट्र स्वस्थानीं ठरूं देणार नाहीं; ब्रूम ह्यानें आपल्या पक्षाच्या संमतीनें पार्लमेंताच्या सुधारणेसाठीं एक सूचना १५ नवंबरला कामन्सपुढें आणण्याचें ठरविलें होतें; तें ऐकून प्रधान मंडळ घाबरून गेलें. ह्मणून त्या सूचनेवर वादविवाद सुरू होण्याच्या एक दिवस अगोदरच एका सामान्य प्रश्नावर पार्लमेंतांत आपला पराजय झालेला ऐकून, धोतर झाडण्यास ही आपणास चांगली संधि मिळाली असें जाणून प्रधानांस जो संतोष झाला, तो अशा प्रधानांची ब्याद एकदांची निघून गेली, बरें झालें, असा विचार मनांत येऊन लोकांस जितका संतोष वाटला, तेवढा तरी खचीत होता.

अर्ल ग्रे अधिकारारूढ झाला व तसें करतांना असें ह्मणाला कीं, 'चुकांची दुरुस्ती, काटकसरीकडे जास्त लक्ष आणि राष्ट्राच्या इभ्रतीस धक्का न पोंहोंचेल अशा रीतीनें शांतता कायम राखण्याची खटपट' ह्या तीन तत्त्वांच्या आधारावर मी राज्यकारभार चालविणार आहें. ह्या वेळीं ब्रूम, लार्ड जॉन रसेल, इत्यादि मुत्सदी नाताळच्या सुटी नंतर पार्लमेंत जेव्हां पुनः भरलें, तेव्हां लार्ड जॉन

रसेल ह्यानें पार्लमेंतीय सुधारणेचें बिल कामन्ससभेपुढें आणिलें. (ता. १ मार्च १८३१) तेव्हां सभा अगदीं गूप कीं चूप बसली होती. पण पुढें जव्हां ज्या ११० बरोंचा पार्लमेंताचे सभासद निवडण्याचा हक्क पुर्तपणीं किंवा अर्धवट रीतीनें काढून घ्यावयाचा होता त्या बरोंचीं नावें त्यानें वाचिवलीं ह्यांपैकीं पुष्कळ बरो लहान असून त्यांत लोक संख्या अगदीं बेताची होती ), तेव्हां मात्र विरुद्ध मंडळी ( टोरीपक्षाचे सभासद ) तिरस्कारदर्शनार्थ खदखदा हंसली. सर राबर्ट इंग्लिस ह्यानें त्या बिलावर विरुद्धपक्षाकडून हल्ला सुरू केला, आणि ह्मणाला, हें बिल ह्मणजे कायद्याच्या सोंगानें राज्यक्रांति बनवून आणण्याचा यत्न होय. ह्याच दिवशीं मेकालेनें ह्या बिलाच्या संबंधानें पहिलें भाषण केलें. तो जेव्हां खालीं बसला तेव्हां स्पीकरानें (कामन्सच्या सभेच्या अध्यक्षानें ) त्यास बोलावून नेलें व सांगितलें कीं माझ्या इतक्या वर्षांच्या अनुभवांत आजच्या सारखी एकाद्याच्या भाषणानें चळवळ उडालेली मीं कधीं पाहिली नव्हती. सर रॉबर्ट डेन्मन , सर रॉबर्ट पील, ह्यांनींही मेकालेची खूप प्रशंसा केली; आणि फाक्स, बर्क आणि क्यानिंग ह्या वक्त्यांची त्या वेळीं पुष्कळांना आठवण झाली.

मेकालेची जी पहिल्या भाषणानें इतकी कीर्ति झाली त्यामुळें खुश होऊन पुढील तीन वर्षें त्यानें आपलें पार्लमेंतांतील काम इतकें चोख केलें कीं, वादविवादांत स्टान्ले ह्यास ( ह्याच पुढें अर्ल आव् डार्बी ह्मणून प्रसिद्ध होऊन एकदां इंग्लंदचा मुख्य प्रधान झाला ) व नियमानें हजर राहण्याच्या कामीं जोसेफ ह्यूम ह्यास त्यानें मागें टाकिलें. कामन्स सभेंत जी स्वतंत्रता, व जो निःसीम स्नेह, भोगावयास सांपडतो त्याचा पूर्ण उपभोग मेकालेनें कसा घेतला, आणि त्या सभेंत संपत्ति, पदवी, किंवा इतरत्र मिळविलेली कीर्ति

ह्या गोष्टी लक्ष्यांत न आणतां सगळे सभासद सारख्या नात्यानें वागतात, व प्रत्येक माणसाच्या शब्दाची किंमत व इतरांवर छाप पाडण्याची शक्ति, ह्यांच्या अनुरोधानेंच त्यास कमी जास्त महत्वाचा ह्मणून मानतात ह्या गोष्टी त्यास किती पसंत पडल्या हें त्याच्या ह्या मुदतींतील पत्रव्यवहारावरून स्पष्ट दिसून येतें.

मेकालेच्या त्या वेळच्या पत्रव्यवहारावरून आणखी एक गोष्ट व्यक्त होते, ती सध्याच्या दृष्टीनें त्यास जरा कमी पणा आणणारी आहे. हल्लीं अशी चाल आहे कीं आपल्या विरुद्धपक्षाचा जरी माणूस असला तरी त्याजविषयीं बोलतांना सन्मानपूर्वक बोलण्याच्या चाली रीती आहेत, त्यांचें उल्लंघन कधीं करावयाचें नाहीं. पण ही सुधारणा अलीकडेच घडून आलेली आहे. मेकालेच्या वेळेस ती नव्हती. त्याच्यांत मेकाले तरुण बांड पार्लमेंतात शिरलेला, व पहिल्या रिफार्म बिलाच्या वेळचा तो गडबडीचा प्रसंग. मग काय विचारतां! मेकालेचें त्या वेळचें प्रतिपक्ष्यांच्या संबंधानें वर्तन, पण केलेल्या व कडकडीत अशा पक्षांध माणसाचें जसें असावें तसें असे.

एकसारखें गडबडींत निमग्न असणें ह्मणजेच जर सुखानें राहणें असेल, तर ह्या धामधुमींच्या वेळीं मेकालेची स्थिति दुसऱ्याच्या तोंडास पाणी सुटण्यासारखी होती असें ह्मटलें पाहिजे; आणि हलक्या पिशवीचीं सुखें जीं कवि वर्णितात तीं जर खरीं असतील, तर मेकालेला सुखाचें तें अंग ह्या वेळीं पूर्णपणें प्राप्त झालेलें होतें असेंहि ह्मटलें पाहिजे. नव्या प्रधानांनीं अंगदीं प्रथम जी खर्चाची काटकसर केली त्या छाटाछुटींत मेकालेची बँक्रप्टसी कमिशनरशिप निघून गेली. हा जेव्हां उत्पन्नाचा झरा सुकला तेव्हां कांहीं काळ पावेतों मेकालेस गरिबींतच दिवस काढावे लागले. कारण पार्लमेंताच्या ज्या

सभासदास आपणाव्यतिरिक्त इतरांस पोसावयाचें असेल, व ज्याची प्राप्ति म्हटली म्हणजे आपल्या लेखणीच्या जोरावर तिमाहीचे कायते ६० किंवा ७० पौंड मिळतील ते, व थोडक्याच महिन्यांच्या आंत खलास होणारी फेलोशिप, त्यास श्रीमंत म्हणून खचीत म्हणतां येत नाहीं. तेव्हां त्याची पार्लमेंतीय कीर्ति अत्यन्त उज्वलित झाली होती तेव्हां त्याची द्रव्याच्या संबंधानें हल्यकी इतकी उडाली कीं, केंब्रीज येथें मिळविलेलीं पदकें त्यास बाजारांत नेण्याचा प्रसंग आला. असें जरी झालें तरी तो कर्जांत नव्हता; व पैसे मिळविण्यासाठीं म्हणून हलकें सलकें त्यानें कधीं लिहिलें नाहीं; तर राजकीय कामांत जीं त्याचीं कायमचीं मतें होतीं त्यांच्या स्फूर्तिनुरूप, व त्याची वाङ्विषयक जी विलक्षण उपजतबुद्धि होती तिला स्मरून, जें सुचेल तेंच त्याच्या लेखणींतून नेहमीं कागदावर उतरत असे. ह्या जो त्याच्या अगदीं गरिबीचा काळ त्याजविषयीं पुढें तो ज्या आठवणा काढी त्यामध्यें कडुपणाचा अंश मुळींच नसे. तर बारा बारा तास पंधरा पंधरा तासपर्यंत पार्लमेंतीय वादांस हातभार लावून व उत्तेजन देऊन, फटफटीत उजाडल्यावर आपण आपल्या चेंबर्स मध्यें पादचारी होऊन कसे येत असूं, व आपल्या मतदारांपैकीं एकाकडून भेट म्हणून आलेल्या चीसच्या एका तुकड्यावर संध्याकाळचा (!) फराळ कसा करीत असूं, व युनिव्हर्सिटींतून तयार होणाऱ्या आडिट एल नामक दारूचा एक पेला कसा झोंकीत असूं, ह्या गोष्टी पुढें तो मोठ्या कौतुकानें सांगत असे.

पार्लमेंतांत जसें ह्याचें वजन वाढत चाललें, तसें समाजामध्येंहि ह्याचें प्रस्थ माजूं लागलें. त्या वेळची लंदनमधील समाजस्थिति संक्रमणावस्थेंत होती. पूर्वीं असें असे कीं श्रीमंत व उच्च कुलांतील लोकांनीं आपापसांत जेवावयास वगैरे एकमेकांस बोलवावें, व पुढें कांहीं

काळानें अशी झाली स्थिति कीं भपक्याच्या लोकांनीं भपक्याच्या लोकांशींच अशा प्रकारचा समागम करावा. मेकालेच्या वेळेस पहिली स्थिति निघून जात होती, व दुसरीची स्थापना अजून झालेली नव्हती. ह्मणून, वाङ्मय, कायदेशास्त्र, पार्लमेन्त, ह्यांमध्यें जर कोणी नांव मिळविलें असेल, तर त्याचा प्रवेश उच्च व श्रेष्ठांच्या समाजांत होत असे. एडिंबरो रिव्ह्यूंतील टीकाकार त्या नात्यानें लोकांस मेकाले आधींच पसंत पडलेला होता; ह्मणून पार्लमेंतांत त्याचें पहिलें दणक्याचें संभाषण झाल्यावरोबर लंदनांत जीं जीं घरें जाण्यास योग्य अशीं होतीं, त्या सर्व घरांचे दरवाजे मेकालेस एकदम खुले झाले. आजपर्यंत तो अगदीं नियमानें व साध्या रीतीनें राहणाऱ्या अशा कुटुंबांत वाढलेला असल्यामुळें, मोठ्या नामांकित लोकांकडून व मोठ्या जाड्या धेंडांकडून जेव्हां यास भोजनाचीं निमंत्रणें येऊं लागलीं, तेव्हां याच्या मनाच्या बळाची परीक्षाच होण्याची वेळ आली. इंग्लंदांतील त्या वेळचा प्रसिद्ध श्रीमान् सरदार जो लार्ड हालंद, ज्याची असे पाहुणचार करण्याच्या संबंधानें फारच प्रसिद्धि असे, त्याची बायको लेडी हालंद ( लार्ड हालंद हा संधि वायूनें ग्रस्त असल्यामुळें पाहुणचाराचें मुख्य ओझें त्याच्या लेडीवरच पडत असे; व ही बाई पाहुणचार करण्यास फार उत्सुक पण आपल्या श्रीमतीची व ज्ञानाची व अकलेची फार घमेंड बाळगणारी, अशी होती ) ही इतरांशीं कशीहि वागली तरी ह्याचें बोलणें मानपुरःसर ऐकत असे, व ते पाहून लोकांस चमत्कार वाटे; आणि तिनें जरा एकादेवेळीं त्याला बोल लाविला, तरी तो इतका संभाळून लावीत असे कीं ह्या बाई कडून असा बोल लावून घेणें ह्मणजे तो एक सन्मानच समजावयाचा. इंग्लिश कवि सॅम्युएल रोजर्स त्याजविषयीं इतरांशीं स्नेहपूर्वक बोलत असे व खुद्द त्याच्याशीं तर अगदीं प्रेम-

पूर्वकच बोलत असे. आणि त्याला हा आवडत असे, व ज्याला तो चहात असे ह्या बद्दलची त्यानें खास उत्तमें खूण दिली ती ही कीं, तो ह्मणाला, 'तूं पाहिजे त्या दिवशीं मजकडे न्याहारीस ये.' शार्प नांवाचा एक हुशार व योग्य माणूस होता, त्याची त्याच्या मागें पुष्कळ दिवसपर्यंत संभाषण्या शार्प ह्मणून कीर्ति राहिलेली असे, तो तर ह्याला केवळ आपल्या मुलाप्रमाणें वागवीत असे. अशा प्रकारचा जो सन्मानाचा त्याजवर वर्षाव होऊं लागला तो पाहून त्यानें आपलें डोकें फिरूं दिलें नाहीं; तर ज्याला समाजाची अभिरुचि असते, पण ज्याची महत्वाकांक्षा निराळ्याच ठिकाणीं मोठेपणा मिळवण्याची असते, अशा माणसाप्रमाणें तो ह्या सन्मानांस लेखीत असे. पार्लमेंत जेव्हां भरतें अशा तीन सहा महीनत तो बहुतेक प्रत्येक रात्रीं लोकांकडे जेवावयास जात असे, आणि रविवारचा दिवस लंदनच्या आसपासच्या वाड्यांतून घालवीत असे. त्या वाड्यांतून मंडळी व रहाणी हीं सर्व लंदनांतील असावयाचीं; सारांश, ह्या वाड्या ह्मणजे जणु काय लंदनचेच तुकडे कापून ज्यास्त शुद्ध हवेंत उचलून नेलेले असत.

असें होतें तरी फार दिवस झाले नाहींतोच त्याला घराची आठवण पडूं लागली; इतकेंच्रस काय पण अगदीं एकीकडे कोठें तरी जाऊन रहावें, असें त्यास वाटूं लागलें. पुढें देखील वरचेवर त्यास असेंच होई. त्यास वाटे कीं बड्यामंडळीचे हे वाडे सोडावे आणि आपल्या साध्या पण आनंदी व सुशिक्षित अशा झोपड्यांत जाऊन रहावें; किंवा आपल्या जिवलग मित्राकडे जाऊन त्याजबरोबर गुजगोष्टी करीत बसावें. तो मित्र ह्मटला ह्मणजे टॉमस फ्लावर एलीस हा होय; ज्यानें किंग्स् बेंच ह्या कोर्टांतील खटल्यांचे रिपोर्ट तयार करण्याचें काम एका पिढीपेक्षां ज्यास्त वर्षें इतक्या नामी

रीतीनें केलें कीं, तेणें करून उद्योगी व मार्मिक कायदेपंडित अशी त्याची कीर्ति झाली, व अद्यापि कायम आहे. ते मेकालेपेक्षां चार वर्षांनीं वडील होता. ते दोघे जरी एकाच कालेजचे फेलो होते तरी युनिव्हर्सिटींत त्यांची चुकामुक पडली होती; आणि पुढें १८२७ त जेव्हां नार्दन सरकिटवर त्यांची गांठ पडली तेव्हांच त्यांची प्रथम ओळख झाली. त्याविषयीं एलिस ह्मणतो, "मेकाले आह्मास येऊन मिळाला आहे. तो गमत्या माणूस आहे; त्याचे बोलणें चालणें जरा पोरकट आहे, पण फारच विलक्षण." ह्या तरुण बारिस्टरांच्या अंगीं एक गुण साधारण होता; तो हा कीं ल्याटिन व ग्रीक ह्या ग्रंथांची अत्यन्त आवड; आणि त्यांचे स्वभाव जरी वरवर पाहणारास दिसत नसत, तरी अंतर्यामी परस्पर सदृश असल्यामुळें, लवकरच त्यांचा इतका निकट स्नेह जमला कीं तो मरेपर्यंत कायम राहिला. एलिस ह्यानें लहानपणींच लग्न केलें होतें; पण १८३९ त त्याची बायको वारली, आणि ह्या महद्दुःखाच्या प्रसंगीं मेकालेस जें त्याबद्दल मनापासून वाईट वाटलें, व त्यानें जें त्यास त्याचा विसर पडेल असें त्याचें समाधान केलें, तेणेंकरून तर त्यांचें परस्पर प्रेम ज्यास्तच घट्ट झालें. त्या दोघांमध्यें स्वभाव साम्य कोणत्या बाबतींत होतें, व शेवटपर्यंत कोणत्या रीतीनें एक-मेकाशीं ते वागले, हें त्यांच्या पत्रव्यवहारावरून चांगलें व्यक्त होतें. एलिस आपल्या मित्राच्या मागें काय तो एकच वर्ष होता; तेव्हां तो रडत किंवा शोक करीत राहिला नाहीं; तर ज्याच्या मनांतून आनंद निघून गेला आहे अशा माणसाप्रमाणें त्यानें ते दिवस घालविले.

* पिट व हॅम्प्डेन ( पहिल्या चार्लस राजाच्या वेळचे लोक पक्षाचे अभिमानी ) ह्यांच्या वेळा नंतर ( लांग पार्लमेंता नंतर, १६४०

–१६६० ). इतकें अमालू पार्लमेंत कधीं बसलें नव्हतें; ह्मणून ह्या वेळीं सभासदांना मधल्या सुट्या थोड्या व विरळच मिळत असत. १८३१ च्या पावसाळ्याच्या अखेरीस लार्डांच्या सभेंत रिफार्म बिलाचा पराजय झाल्यामुळें देशांत चळवळ, राग आणि भीती, ह्यांची धुमाकुळी उडाली होती. व त्यामुळें जे प्रधान नव्हते, किंवा माजिस्ट्रेट नव्हते, किंवा योमनरी ( शेतकरी शिपाई, ह्यांचें काम लहान सहान दंग्याचा बंदोबस्त करण्याचें असतें,) ह्या फौजेंत अंमलदार नव्हते, तेवढ्यांना थोडीशी सुटी मिळाली होती. अर्थात् मेकालेला सुटी होतीच. ह्मणून तो मार्गारेट व हाना ह्या दोघी बहिणींस घेऊन केंब्रिज येथे गेला, आणि ज्या आपल्या कालेज बंधूबद्दल तरुण इसम. एनां अभिमान वाटत असल त्याच्या बहिणीचा ज्या रीतीनें आदर-सत्कार ते करितात, त्या रीतीनें त्यांनीं ह्यांचा मोठ्या आनंदानें केला.

लेडी ट्रेव्हेल्यन ह्मणते: "ज्या संध्याकाळीं आह्मी तेथें जाऊन पोहोंचलों त्या संध्याकाळी आह्मी व्हेवेल ( न्याय व नीति ह्यांचा पंडित ), सेजविक ( नीतिशास्त्रावरील प्रसिद्ध ग्रंथकार ), एरी ( प्रसिद्ध ज्योतिर्विद ), व थर्वाल ( बिशप व इतिहासकार ), ह्यांच्या मंडळींत जेवलों; आणि त्यांनीं कितीतरी करमणूक केली, आणि आह्मां मुलींचें किती तरी कौतुक केलें ! आह्माला तेथें किती तरी सुख झालं! तेथे पाहण्याचा, ऐकण्याचा, व वाखणण्याचा, आह्माला कधींच कंटाळा आला नाहीं. आम्हीं तेथें होतों त्या मुदतींत ह्या मंडळीं पैकीं कोणातरी एकाशीं जेवीत असूं, फराळ करीत असूं किंवा न्याहारीस जात असूं, आणि सगळ्या घोळक्यासहित सगळ्या कालेजांतून सगळा दिवस फिरत असूं. व्हेवेल ह्या वेळीं शिक्षक होता; पुढें पेक्षां ह्या वेळीं तो जरा जास्त दणकट होता, पण कमी

भपकेदार, व ज्यास्त आनंददायक असा होता. तरी तुझा मामा त्याला मनापासून ह्मणून कधीं आवडला असेल असें मला वाटत नाहीं. नंतर आम्ही येथून निघून आक्सफर्ड येथें गेलो; तेथें आमची कोणाशीं ओळख नसल्यामुळें केंब्रिजच्या मानानें आह्मांस तें किती तरी नीरस वाटलें, व ट्रिनिटी कालेजाच्या आह्मी किती तरी आठवणा काढिल्या. तें ऐकून आमच्या बंधुरायास फार आनंद झाला."

आपल्या आयुष्याच्या पहिल्या अर्धांत मेकाले वर्षांतून कांहीं महिने आपला मामा बाबिंग्टन ह्याच्या घरीं घालवित असे; त्या मामाचें घर त्याच्या भाच्यांस सर्व उन्हाळा व पावसाळाभर खुलें असे. राथ्ले टेंपल ह्मणून ज्या ठिकाणीं तो रहात असे तें लीस्टर-शहरच्या आसपास एका दरींत असून जुन्या इंग्लिश घरांचा नमुना ह्या दृष्टीनें मोठें पाहण्यासारखें असें. तेथले ते उंच वृक्ष, त्याच्या सभोंवतालची ती विस्तीर्ण जागा, अर्धें कुरण व अर्धें रान; घराच्या खिडक्यांपर्यंत चरत येणारी ती गुरें; दगडी गच्ची केलेली, व सभोंवतालच्या जमिनीपेक्षां जरा उंच असावयाचा तो जरा सखलच असा दिवाणखाना व त्यांतलीं तीं ओबड धोबड व गंजलेलीं हत्यारें, तीं सखल छतें; निजावयाची खोली व गलेरी ह्यांच्या भिंतीवर सर्वत्र बसवलेल्या जुन्या काळच्या नमुन्यावर कोरीव काम केलेल्या त्या पातळ फळ्या; स्पेनच्या आरमारानें स्वारी केली तेव्हांपासून (राणी इलिझाबेथ हिच्या कारकीर्दीपासून) डागडुज पुनः झाली नाहीं अशा प्रकारचा तो एकंदर घराचा आंतला देखावा;—ह्या सर्व जुन्या गोष्टी आणि नेहमीं, गच्च भरलेल्या पण सुखी अशा त्या वाड्याच्या प्रत्येक कोपऱ्याला शोभा देणारी ती तरुण व आनंदी मंडळी, ह्यांच्यामध्यें चमत्कारिक पण सुरेखसें वैसदृश्य दिसत असे. पावसाळ्याच्या दिवसांत तेथें एक आनंदी घोळका नेहमी जिन्यावर

बसलेला असावयाचा किंवा ग्यालरींत हिंडत असावयाचा; आणि जेथें जेथें गडबड व थट्टा ह्यांची रेलचेल असेल, जेथें जेथें हंसणें फारच मोठ्यानें चालत असेल व ओरडणें फारच जोरानें होत असेल, तेथें तेथें मेकाले मध्यें बसलेला, व इतर बालगोपाल मंडळी त्याच्या सभोंवती कोंडाळें करून बसलेली, व त्याच्याशीं पास्कल, रासीन, कार्नेली, मोलीरी, बोलो, इत्यादि इंग्लिश, फ्रेंच, वगैरे ग्रंथकारांच्या कमजास्त मोठेपणाबद्दल त्याच्याशीं भांडत बसलेली, किंवा आपलें नांव टामस ठेविलें हें दाखविण्यासाठीं इतिहासांतील सर्व प्रसिद्ध टामसांची यादी तो देत असतां व त्यांचीं शतकृत्यें वर्णीत असतां त्यास अडवणारी, अशी सांपडावयाची.

त्याची बहीण मार्गारेट हिनें मध्यें मध्यें आपली दिनचर्या लिहून ठेविली आहे; तिजवरून १८३१-३२ सालीं त्याची घरांतील रहाणी कशी होती हें स्पष्ट दिसतें; व त्यास व्हिग् प्रधानमंडळ आपल्यांत घेईल किंवा नाहीं असा जेव्हां प्रश्न उत्पन्न झाला, तेव्हां ह्या बहिणींच्या मनांत ज्या आशा व ज्या भीत्या एकामागून एक उत्पन्न झाल्या, त्यांचें चित्र चांगलें डोळ्यांपुढें उभें रहातें.

१८३० ते १८३२ ह्या मुदतींत त्याचा बाप, त्याच्या बहिणी, मि. एलिस, व एडिंबरोरिव्ह्यूचा नवीन संपादक मि. नेपियर, ह्यांच्याशीं त्याचा जो पत्रव्यवहार झाला त्यावरून पुढील गोष्टी व्यक्त होतात. तो फ्रान्स देशांत राज्यक्रान्तीच्या वेळीं गेला होता म्हणून सांगितलें, तेथून परत आल्यावर त्याच्या मनांत फ्रान्साची सद्यःस्थिति वर्णनात्मक एक निबंध एडिंबरोरिव्ह्यूंत द्यावयाचा होता, व तो त्यानें अर्धा मुर्धा तयार देखील केला होता. पण त्याचा प्रतिस्पर्धि जो ब्रूम त्यानें ह्याच विषयावर लिहिण्याचें मनांत

लेरवास निरोप मिळाला. हें पाहून त्यास अर्थात् फार राग आला. त्यानें नेपियरास एक चुरचुरीत पत्र लिहिलें, व तो रिव्ह्यूशीं आपला संबंध कायमचा तोडण्याच्या बेतांत आला; पुढें हें प्रकरण मोठ्या मारामारीनें मिटलें, व मेकालेचा राग निवाला. तो निवण्यास नेपियरच्या गोड भाषणाशिवाय दुसरें एक कारण असें झालें कीं ह्यावेळीं (सपटंबर १८३०) त्याची बहीण जेन एकाएकीं वारली. ह्या दुःखाचा धक्का त्याच्या आईच्या मनावर एवढा बसला कीं तीही पुढें एका वर्षाच्या आंत, पण मेकालेनें पार्लमेंतांत पहिल्या भाषणानें नांव मिळविलेलें ऐकून मग निवर्तली.

सुधारणेचें पहिलें बिल १ मार्च १८३१ रोजीं पार्लमेंतापुढें आलें ह्मणून मागें सांगितलेंच आहे. त्याच्या पहिल्या वाचनाच्या वेळींच मोठ्या कडाक्याचा वादविवाद झाला; व तो बरेच दिवस चालल्यावर शेवटीं मतें घेतलीं. त्या महत्वाच्या प्रसंगीं सहाशेंवर सभासद कामन्स सभेंत हजर होते. तेव्हां सुधारणापक्षास काय तें एकच मत ज्यास्त मिळून त्याचें मताधिक्य झालें; ह्मणजे ह्यांस ३०२ वे त्यांस ३०१ अशीं मतें मिळालीं. त्या आणिबाणीच्या प्रसंगाचें फारच हुबेहुब वर्णन मेकालेनें एलिस यास लिहून पाठविलें आहे. तो ह्मणतो, गेल्या मंगळवारीं मतें घेण्याच्या वेळीं जसा देखावा झाला तसा मीं पूर्वीं कधीं पाहिला नव्हता, व पुढें कधीं तसा माझ्या दृष्टीस पडेलसें मला वाटत नाहीं. आणखी पन्नास वर्षें जरी मी जगलों, तरी देखील त्याची आठवण माझ्या मनांत इतकी ताजी व इतकी बरोबर राहील कीं जणू काय तो नुक्ताच घडून आला आहे. तो देखावा पाहणें ह्मणजे सीनेट हौसमध्यें सीझरच्या उरांत खंजीर खुपसला, तो देखावा पाहण्यासारखें किंवा आलिव्हर क्रॉमवेलनें कामन्स सभेंतील टेबलावरचा राजवेत्रदंड काढून

घेतला, तो पाहण्यासारखें होतें; सारांश, असे देखावे ह्मणजे जन्मांतून एकदाच दृष्टीस पडावयाचे, व पुनः कधीं विसरावयाचे नाहींत. सभागृहाच्या प्रत्येक भागांत गर्दीला जणू काय पूर आला होता. जेव्हां प्रेक्षकांना बाहेर घालविलें, व दरवाज्यांस कुलपें घातलीं, तेव्हां ६०८ सभासद एकंदर हजर होते; ह्मणजे, पूर्वीच्या कोणत्याहि मतगणनाच्या प्रसंगापेक्षां ५५ ज्यास्त होते. होकार पक्षीय व नकारपक्षीय सभासद ह्मणजे जणू काय समरांगणांतील समोरासमोरच्या या जुंकडून होणारी तोफांच्या आवाजांची वृष्टीच होती. जेव्हां विरुद्ध पक्षाचे लोक लॉबीमध्ये ( कामन्स सभागृहाचा बाहेरचा दिवाणखाना ) शिरले—याच कृत्यास २० किंवा २० हून ज्यास्त मिनिटें लागलीं—तेव्हां आह्मी सभागृहांतील दोन्ही बाजूंच्या बांकांवर पसरलों; कारण आमच्यापैकीं पुष्कळांना त्या रात्रीं बसावयास जागा मिळालेली नव्हती. ( इतकी इतिहास प्रसिद्ध जी इंग्लंदची कामन्स सभा—जिला असल्या सर्व इतर राष्ट्रीय सभांची जननी ह्मणून ह्मणतात, तिचें सभागृह इतकें लहान आहे कीं सभेचे जे सरासरी ६७० घटक त्यांपैकीं ४०० ना देखील तेथें बसावयास जागा मिळत नाहीं. नेहमीं, सामान्य काम चाललें असतां २००।३०० वर सभासद हजर असतात ह्मणून सर्वांस बसावयास बांकांवर जागा मिळते; पण महत्वाच्या प्रसंगीं जेव्हां बहुतेक सभासद हजर असतात, तेव्हां उशीरां येणारांस तासच्या तास खेंचाखेचीनें उभें रहावें लागतें ). दरवाजे बंद केले तेव्हां आमची संख्या किती बरें असेल ह्याविषयीं आह्मी तर्क करूं लागलों. प्रत्येक जण निराशेचे उद्गार काढीत होता.

"आमचा पराजय होणार. आह्मी फार फार तर २८० कायते भरूं. मला नाहीं वाटत आंह्मी २५० जण आहों..तें ३०० आहेत.

आल्डरमन टॉमसन ह्यानें त्यांस मोजिलें आहे. तो ह्मणतो ते २९९ आहेत." अशीं आमच्या बाकांवरून बोलणीं चाललीं होतीं. पार्लमेंतांत ज्यांनीं पुष्कळ वर्षें घालविलीं आहेत असे वृद्ध कपि सहज नजर फेकून संख्येचा ह्यापेक्षां अधिक बरोबर अंदाज करण्याची कला कशी शिकत नाहींत ह्याचें मला आश्चर्य वाटतें. जेव्हां होकार पक्षाचे सभासद सभागृहांत राहिले तेव्हां तें मला बरेंच भरलेलें दिसलें. बऱ्याच महत्वाच्या वादविवादाच्या वेळीं देखील जितकें तें भरलेलें दिसतें, त्यापेक्षां बरेंच ज्यास्त भरलेलें भासलें. तथापि मला ३०० ची आशा नव्हती. आमच्या डाव्या बाजूला अगदीं खालच्या रांगेच्या बाजूनें जेव्हां मतगणक मोजति चालले तेव्हां सर्वांच्या मनांत जी कळकळ उत्पन्न झाली ती असह्य होती,—दोनशें एक्याणव,–दोनशें ब्याणव,—ह्या वेळीं आह्मी सर्व उभे राहिले होतों, व पुढें वांकून गणकांबरोबर मोजीत होतों; तीनशें ह्मटल्या बरोबर आनंदाचा एक लहानसा ओरडा झाला,—तीनशें दोहोंवर आणखी एक झाला, पण तो आनंद एका क्षणांत बंद पडला. कारण शत्रूंची संख्या किती असेल हें अद्यापि आह्मांस कळलें नव्हतें. तथापि आह्मांला इतकें समजलें कीं आमचा पराजय—झाला तरी दांडगा व्हावयाचा नाहीं. दरवाजे खाडकन उघडले, व आंत ते शिरले. त्यांच्या पैकीं प्रत्येकजण आंत येई त्यानें त्यांच्या संख्येबद्दल निराळीच बातमी आणावी. लॉबीमध्यें त्यांची गर्दी झालेली असल्यामुळें त्यांच्या संख्येबद्दल यथार्थ अंदाज करणें अशक्य होतें, हें तुझ्या सहज लक्ष्यांत येईलच. प्रथम आमच्या कानीं आलें कीं ते तीनशें तीन आहेत; नंतर ती संख्या वाढून ३१० झाली; नंतर पुन: उतरून ३०७ वर आली. आलेक्झांडर बारी मला ह्मणाला, मी त्यांस मोजिलें, ते तीनशें चार आहेत. काळजीनें आह्मी सर्व नि:-

श्वास झालें होतें, इतक्यांत चार्लस वूड, जो दरवाज्याजवळ उभा होता, तो एका बांकावर उडी मारून ओरडला, " ते फक्त तीनशें एक आहेत. " आह्मी आपल्या टोप्या फिरवीत, जमिनीवर पाय आपटीत, व टाळ्या वाजवीत, अशी कांहीं आरोळी ठोकिली कीं, ती तुला चेरिंग क्रास येथें ऐकूं आली असती. ह्या गर्दीतून गणकांना पुढें येण्यास मारामार पडली. कारण सभागृह टेबलापर्यंत गच्च भरून गेलें होतें, आणि नाटकगृहाच्या पिटमध्यें जशी निघते तशी बाहेरून आरोळी निघाली. वेटिंग रूम्सनां जाणारे सर्व रस्ते व जिने लोकांनीं भरले होते; आतां पहांटेचे चार वाजले होते; पण मत गणनाचा निकाल काय होतो, तें पाहण्यासाठीं ते इतका वेळ तिष्ठत राहिले होते. त्यांच्या दोहोंबाजूच्या दाट गर्दीतून लहानसा मार्ग काढून आह्मी निघून गेलों; पण आह्मी उघड्या हवेंत येई तोंपर्यंत ते एकसारखे आरोळ्या ठोकीत होते, व आपल्या टोप्या हुलवीत होते. मी एक बगी बोलाविली, आणि बगीवाल्यानें मला पहिला प्रश्न विचारिला, तो हा कीं, "बिल पास झालें काय ?" " होय एका मतानें. " " परमेश्वराचे उपकार झाले, महाराज. " आणि आह्मी निघालों. इ.

दुसऱ्या एका पत्रांत तो हॉलंड हौसमधील पहिल्या मेजवानीचें वर्णन करितो. त्यांत लेडी-हालंडचें फार मजेदार वर्णन केलें आहे. ती आपल्या पाहुण्यांना कशी कह्यांत ठेविते ह्याचें पुढील उदाहरण दिलें आहे. एकाला ह्मणते " जा, " आणि तो जातो; दुसऱ्याला ह्मणते " कर हें, " आणि तो करितो. "वाजव घंटा, मि. मेकाले." " ठेव तो पडदा खालीं, लार्ड रसेल; तो तूं मळवशील. " " मिं. आलेन, घे ती मेणबत्ती आणि दाखव मि. क्राडॉकला ती बोनापार्टीची तसबीर." इ. इ. ह्याच पत्रांत लार्ड हालंडचें चित्र फार चांगलें का-

दिलें आहे. तो फार दयाळू, साधा, व सोल्लास असे; तो वाङ्मय व राजकीय विषय ह्या दोहोंवर चांगलें बोले; इ. इ. दुसऱ्या एका पत्रांत तेथल्या दुसऱ्या एका भेटीचें वर्णन करून शेवटीं तात्पर्य असें काढिलें आहे कीं " असल्या सुंदर सुंदर ठिकाणीं जाण्याच्या मोठा उपयोग हा कीं, असल्या घरांवाचून सुखी असणें शक्य कसें आहे, हें त्या पासून शिकावयाचें. "

पार्लमेंतीय सुधारणेच्या बिलास मागें सांगितल्याप्रमाणें पहिल्या वाचनाचे वेळींच जेव्हां काय तें एक मत ज्यास्त मिळालें, तेव्हां तें पुढें निभावणें अशक्य असें जाणून सध्याच्या पार्लमेंतास रजा देऊन नवें पार्लमेंत बोलवावें, म्हणजे आमचें बहुमत हल्लींपेक्षां ज्यास्त बळकट होऊन बिलाचीं तिन्ही वाचनें पार पडण्यास ठीक पडेल, अशी मुख्य प्रधान लार्ड ग्रे ह्यानें राजास मसलत दिली. त्याप्रमाणें नव्या निवडणुकी होऊन सुधारणावाद्यांची फारच मोठी संख्या निवडून आली; आणि लार्ड जान रसेल ह्यानें दुसरें बिल कामन्स पुढें जून १८३१ मध्यें आणिलें. त्याच्या पहिल्या वाचनाच्या वेळीं वादविवाद न होतां दुसऱ्या वाचनाच्या वेळीं झाला. त्या वेळीं मेकालेनें जें भाषण केलें तेंही फार उत्तम वठलें. त्याचीही लार्ड आल्थार्प, रसेल, स्टान्ले, व प्रसिद्ध ऐरिश प्रसिद्ध वक्ता ओकॉनेल ह्यांनीं फार स्तुति केली.

ह्या इतक्या मुदतींत त्यानें मूरकृत लार्ड बायरनचें चरित्र, बासवेलकृत जॉनसनच्या चरित्राची क्रोकरची आवृत्ति, प्रसिद्ध स्वदेशभक्त जॉन हम्पडेन ह्याचें चरित्र, व इलिझाबेथचा प्रसिद्ध मुत्सद्दी लार्ड बर्ले ह्याचें चरित्र, इतक्यांवर टीकात्मक निबंध एडिंबरो रिव्ह्यूमध्यें लिहिले असें त्याच्या पत्रांवरून दिसतें.

# प्रकरण ४ थें.

---:o:---

## सभासदी व नोकरी.

१८३२ च्या पहिल्या अर्धांत सुधारणेचें तारूं गटांकळ्या खातच होतें; पण त्याच्यावर आदळणाऱ्या मोठमोठ्या लाटांतून तें बाहेर पडण्याच्या पूर्वीच त्यांतून येणाऱ्या खजिन्यांची किंमत लोक करावयास लागले होते. सुधारलेल्या पार्लमेंत निवडण्याची संधि राष्ट्राला प्राप्त होईल अशी वेळ नजीक येऊन ठेपत होती. वेस्टमिन्स्टरमध्यें (पार्लमेंतगृहांत) जो देखावा चालला होता त्यानें राजकीय चळवळीविषयींची भूक जणूं काय न निवून, ज्यांस प्रतिनिधि निवडण्याचा हक प्रस्तुत बिलानें नव्यानें प्राप्त होणार होता, त्या लोकांस निवडणुकीच्या मारामारीच्या कल्पित मजांचा अगोदरच आस्वाद घेण्याचा जबरदस्त मोह होऊं लागला. आपले भावी हक चालविण्याविषयीं सोत्कंठ होत्साते आम्हीं जसे चांगले प्रतिनिधि नेमतों तसे ह्या नवीन मतदारांस निवडतां यावयाचे नाहींत, अशा जे जुन्या निर्जन बरोंचे मालक रोज वढाया मारीत होते, त्यांची आपल्या अकलेविषयीं खात्री करण्यासाठीं, मोठमोठ्या शहरांतील मतदारांची, प्रसंगास योग्य व आपणाला शोभतील असे प्रतिनिधि शोधून काढण्यांच्या कामीं एकमेकाशीं जणूं काय स्पर्धा लागली होती. लीड्स शहरचे व्हिगपक्षीय मतदारांना मार्शल्सच्या बड्या घराण्यापैकीं एक उमेदवार अगोदर सांपडलाच होता; तेव्हां आपल्या पक्षापैकीं प्रसिद्ध माणसांतून दुसरा उमेदवार कोण हुडकावा ह्या विचारांत ते होते. तों मेकाले त्यांस आयताच सांपडला. १८३१ च्या आक्टोबरांतच त्याला त्या शहरांतून आग्रहाचें निमंत्रण आलें, व तुम्हास निवडणु-

कीचा हक मिळाल्याबरोबर मी तुमचा उमेदवार होऊन येतों, असें त्यानें त्यांस वचन दिलें होतें. इकडे त्या शहरांतील टोरी मतदारांनीं मायकेल सॅडलर ह्मणून एका माणसास आपल्या बाजूनें उमेदवार ह्मणून पुढें आणिलें होतें. त्यासच एका खिशांतल्या बरोबद्दल निवडण्याची खटपट न्यूआर्क येथें न्यूकासलच्या ड्यूकानें गत निवडणुकीच्या वेळीं केली होती, पण ती फुकट गेली होती. सॅड्लर ह्यास मेकालेच्या हातून एडिंबरो रिव्ह्यूमध्यें एक चांगला चाबुक मिळाल्यामुळें तो ह्याच्यावर दांत ओंठ खातच होता; ह्मणून त्यानें तन मन धन खर्च करून स्वत: निवडून येण्याची, व मकालेस हुसकून लावण्याची, खटपट आरंभिली. त्यास दुसरा कांहीं उद्योग नव्हता, व मेकाले तर पार्लमेंतांत व रिफॉर्म बिलांत गुंतलेलाच होता. इतके गैर फायदे असतां व सहज निवडणूक होईल अशा दुसऱ्या ठिकाणीं याचा लाग साधण्यासारखा असतां, एकदा काम अंगावर घेतलें तें पार पाडावयाचें, त्यांतून माघें घ्यावयाचें नाहीं, असा मेकालेनें निश्चय करून मोठ्या जोरानें व उत्साहानें ती लढाई चालविली.

पार्लमेंतीय निवडणुकीची जुनी वहिवाट मारून टाकण्यास फार मुष्कील पडली. तिचा कांहीं केल्या प्राण जाईना; पण तिला शेवटची कळ १८३२ च्या मे महिन्यांत आली. रिफार्म बिल कॉमन्स सभेंत पास झालें होतें, आणि लार्डांच्या सभेंत त्याचीं दोन वाचनें होऊन गेलीं होतीं. पण दुसऱ्या वाचनानंतर बिलाचा कलमवार विचार करण्याकरितां जी कमिटी बसत असते तेथें असल्या महत्वाच्या बिलास विद्रूप करण्यास व तें रेंगाळणीवर टाकण्यास पुष्कळ संधि असते; तिचा ते आतां फायदा घेण्यांत गुंतले होते. इंग्लंदांत राजा, लार्डांची सभा व कामन्स सभा अशा कायदेकानूमंडळाच्या तीन शाखा आहेत. ह्यांचें कोणत्याही बिलाच्या संबंधानें मतैक्य झालें

ह्मणजे कांहीं पंचाईत पडतच नाहीं. पण तसें जर न जमलें, तर तो जम घडवून आणण्याचे कांहीं मार्ग आहेत. पहिल्या चार्लस राजाचा शिरच्छेद ( १६४९ ) व दुसऱ्या जेम्साची पदच्युति ( १६८९ ) हीं झाल्यापासून, पार्लमेंताच्या दोनही शाखांचें जर मतैक्य असेल, तर त्याजविरुद्ध राजा जावयाचा नाहीं असें साधारण ठरूनच गेल्यासारखें झालें आहे. पण ह्या दोन शाखांचाच मतभेद झाला तर काय करावयाचें असा प्रश्न उभा राहतो. पण ह्या प्रश्नाचाहि उलगडा आन राणीच्या वेळीं ( १७१२ ) झालेला आहे. तो असा कीं कामन्स सभाविरुद्ध लार्डांतील एकादा पक्ष जात असल्यास, त्याचा पाडाव करून लार्डांच्या सभेंतील बहुमत कामन्स सभेंतील बहुमताशीं सादृश्य करण्यासाठीं विरुद्ध मताचे नवे लार्ड राजानें बनवणें.

पण ह्या प्रसंगीं ह्या विलक्षण तोडीची योजना करण्याकडे राजाचें मन घेईना. त्याला अशी निष्कारण भीति पडली कीं अशा रीतीनें जर मी कामन्स सभेचा हट्ट पुरवूं लागलों, तर फ्रान्सांत सोळाव्या लुईची ( ह्याच्याच वेळीं १७८९ त फ्रान्सची मोठी राज्यक्रांति झाली, व ह्यास १७९२ त राणीसह फांशीं जावें लागलें ) जी वाट झाली तीच माझी होईल. ह्मणून त्यानें असा निश्चय केला कीं झालें इतकें पुरे, एथेंच थांबावयाचें, ह्या पुढें ह्या कामांत प्रधानांचा सल्ला ( नवीन व्हिग लार्ड बनवण्याचा ) ऐकावयाचा नाहीं. सारांश, ह्या वेळीं ही सुधारणा घडवून आणाल तर फ्रान्सांतील राज्यक्रान्तीनें सुचविलेला धडा विसराल व फ्रान्सासारखे गोत्यांत पडाल, अशी जी टोरी पक्षाच्या लहान मोठ्या वक्त्यांनीं पहिल्यापासून सारखी ओरड चालविली होती, तिचा राजाच्या मनावर परिणाम झालेला दिसला. तेव्हां अर्थात् अर्ल ग्रेनें राजीनामा दिला, आणि वेलिंग्टन मोठ्या राजनिष्ठेनें ह्या वादळास तोंड देण्यासाठीं पुढें आला.

पण वादळाचा जोर इतका होता कीं, त्याच्या धैर्याचा व निष्ठेचा त्यापुढें टिकाव निघेना. त्याला क्याबिनेटांत हात देण्यास जोडीदार मिळेनात, पार्लमेंतांत अनुकूल मत देण्यास पाठिंबे मिळेनात, व रस्त्यांतून त्याच्या साठीं लढण्यास शिपाई मिळेनात; आणि थोडक्याच दिवसाच्या आंत असें स्पष्ट दिसूं लागलें कीं, त्याला आपला अधिकार कायम ठेवण्यास लढाईच केली पाहिजे.

सारांश, इंग्लंदांत राज्यक्रांतीला खरोखरच सुरवात झाली होती. बर्मिंघाम येथें सगळ्या राजकीय समाजांची सभा भरून तेथें एक लाख लोकांनीं असें प्रसिद्ध केलें होतें कीं आम्हीं जे आपले हक्क मागूं ते तरवारीच्या जोरावर नव्हे, तर कायदा, न्याय, विचार, एकी, ह्यांच्याच जोरावर मागूं; पण तेच लोक आतां अशा शपथा घेऊं लागले होते कीं हें बिल जर पास झालें नाहीं, तर आह्मी कर मुळींच देणार नाहीं; आणि कर वसूल करणारांनीं जर कोणाची मालमत्ता विकावयास काढिली तर ती आह्मी विकत घेणार नाहीं. नागरिकाचें जें पहिलें कर्तव्य त्याचा ह्या प्रमाणें निषेध करणें ह्मणजे वस्तुतः तरवार उपसण्या सारखेंच होतें; आणि ती जर त्यानीं म्यानांतच ठेविली असती तर त्यांस भितरे ह्मटलें असतें. ह्या धिट्टाईच्या निश्चयाप्रमाणें प्रत्यक्ष वागवून दाखवून लार्ड मिल्टन ह्यानें त्याच्या ऐतिहासिक घराण्याचा राष्ट्राच्या कृतज्ञतेवर जो हक्क तो वाढवून घेतला. ( कवि मिल्टन हा पहिल्या चार्लसच्या शिरच्छेदानंतर इंग्लंदांत जे लोकसत्ताक राज्य स्थापिलें त्याचा लातिन सेक्रेटरी होता). कर वसूल करणारा जेव्हां त्याजकडे आला तेव्हां पुनः ये ह्मणून त्यानें त्यास सांगितलें; आणि अशा सौम्य, पण इंग्लिशमनच्या ब्रीदास अगदीं अनुरूप ( इंग्रेजी पार्लमेंतीय राज्यपद्धतीचें एक महातत्त्व असे आहे कीं राजानें गाऱ्हाणें ऐकिल्याशिवाय त्यास पैसा द्यावयाचा नाहीं. )

अशा कृतीनें १६४२ च्या महाबंडापेक्षा ज्यास्त इष्टहेतुसाधक महा-बंड त्यानें सुरू केलें; हें बंड इतकें अल्पकालिक व इतकें रक्तस्राव विहीन होतें की इतिहास त्यास बंड ह्मणून मुळीं ओळखीतच नाहीं. ही आणीबाणीची वेळ अगदीं बरोबर एक आठवडाभर राहिली. जिकडे तिकडे दंगेधोपे व्हावे व त्यांचे परिणाम भलतेच व्हावे अशी ड्यूकाची इच्छा नव्हती; ह्मणून त्यानें राजास आपले पूर्वीचे प्रधान बोलविण्याविषयीं सल्ला दिली; आणि इकडे राजानें हट्टी लार्डांना फार अर्थप्रचुर सर्क्युलर पत्र पाठविलें, त्याचा मायना सभ्य असा होता, पण तात्पर्य स्पष्ट होतें. विरुद्धपक्षापैकीं शंभर लार्ड एवढ्या-वरून उमजलें, आणि त्यांनीं अशी युक्ति लढविली कीं, जेव्हां जेव्हां रिफार्म बिल त्यांच्या सभेपुढें यावयाचें असेल, तेव्हां तेव्हां मुका-ट्यानें गैरहजर रहावयाचें. ह्याचा परिणाम असा झाला कीं जूनच्या चवथ्या तारखेस ( सन १८३२ ) त्या बिलाचें तिसरें वाचन त्या सभेपुढें झालें. पांचव्या तारखेस कामन्स सभेनें त्याच्यावर शेवटचा हात मारिला; आणि सातव्या तारखेस, इतक्या व अशा ठेंचा खाऊन व इतक्या आणि अशा प्रसंगांतून पार पडून, प्रारंभीं लार्ड जॉन रसेलनें ज्या रूपानें त्या सभेपुढे तें अणिलें होतें, त्याच सरासरी स्वरूपीं त्यास राजाची संमती मिळून कायद्याचें रूप आलें.

ह्या बिलाच्या प्रत्येक आणीबाणीच्या प्रसंगीं मेकालेनें आपल्या वक्तृत्वानें त्यास मदत केलेली असल्यामुळें, त्याबदलचें त्यास पारितो-षिक मिळाल्याशिवाय राहिलें नाहीं. कारण १७८४ त ईस्त इंदिया कंपनीच्या डिरेक्टरांवर देखरेख ठेवण्यासाठीं जो स्थापिला होता त्या बोर्ड आव् कंट्रोलवरच्या कमिशनरांपैकीं त्याला एक आतां नेमिलें. कोणत्याही संयुक्त मंडळीच्या सभासदांची कर्तव्यें जड किंवा हलकीं असणें हें त्या त्या व्यक्तीच्या मर्जीवर अवलंबून असतें. मेकालेच्या

ह्या बोर्डाशीं १८ महिने संबंध होता, पण तेवढ्या मुदतींत त्याला विश्रांति घेण्यास मुळींच वेळ मिळाला नाहीं. त्याला आपले दिवस हिंदुस्थानाच्या कामाला, व आपल्या रात्री पार्लमेंताच्या कामाला, (पार्लमेंत बहुधा संध्याकाळीं तीन चार वाजतां भरतें, व अलीकडे बारा वाजल्यानंतर बहुधा बसत नाहीं; पण मेकालेच्या वेळीं व त्यानंतर पुष्कळ वर्षें पर्यंत तें किती वेळ बसावें ह्याचा मुळींच निर्बंध नसे; व त्यामुळें महत्त्वाच्या प्रसंगीं सभासदांस रात्रीच्या रात्री जाग्रणें काढावीं लागत) द्याव्या लागत असल्यामुळें, एडिंबरो रिव्हूसाठीं लेख तयार करावयाचे ते, ज्या रात्रीं वेळेवर निजावयास मिळालें असेल, त्या रात्रीं पहाटेस पांच वाजतां उठून तो तयार करीत असे. अशा रीतीनें त्यानें होरेस वाल पोल, लार्ड चाटाम्, व लार्ड मेहानकृत स्पानिश सक्सेशनच्या युद्धाचा इतिहास, ह्या तीन विषयांवर टीकात्मक फारच उत्तम निबंध लिहून काढिले.

इंग्लंदांत अशी चाल आहे कीं एकाद्या पार्लमेंताच्या सभासदानें राज्यकारभारांत नोकरी पत्करिली कीं आपल्या सभासदाच्या जागेचा राजीनामा दिला पाहिजे, व ती जागा पाहिजे असल्यास त्यानें पुनः उमेदवार ह्मणून उभें राहिलें पाहिजे. त्यांत तो विजयी झाल्यास कामन्स सभेचा तो पुनः सभासद होऊं शकतो. ही गोष्ट मुख्य प्रधानापासून तों सर्वांस लागू आहे. ह्या चालीचा उद्देश असा दिसतो कीं नवीन नेमलेला नोकर मतदारांस पसंत आहे किंवा नाहीं हें त्यावरुन समजावें, आणि सरकारी कामांत गुंतणारा सभासद आपणास पाहिजे किंवा नको हें दाखविण्याची मतदारांस संधि मिळावी. ह्या चालीनुरूप मेकालेनें बोर्ड आव् कंट्रोलवर जागा पत्करिल्याबरोबर आपल्या पार्लमेंतीय सभासदीचा राजीनामा दिला; पण ज्या कान नामक बरोचा तो प्रतिनिधि होता तो 'खिशांतीलच' असल्यामुळें त्यास तेथूनच पुनः निवडून येण्यास मुळींच पंचाईत पडली नाहीं.

चालू पार्लमेंत अर्ध्या आगस्टच्या सुमारास खलास झालें, व उमेदवार लोक नव्या व सुधारलेल्या पार्लमेंतांत निवडून येण्याची खटपट करूं लागले. मेकालेस लीड्स येथील मतदारांनीं निमंत्रण दिलें होतें व त्यानें तें घेतलें होतें, हें मागें सांगितलेंच आहे. पण आतां पार्लमेंताचा सभासद होणें हें पहिल्यासारखें सोपें नव्हतें. कारण नवीन व्यवस्थेप्रमाणें खिशांतील बहुतेक जागा नाहींशा झाल्या होत्या. शिवाय, मतदारांची संख्या बरीच वाढली होती. ह्या कारणांमुळें ज्यास निवडून येणें असेल अशा उमेदवारास खटपट करणें जरूर होतें. मतदारांकडे स्वतः किंवा मित्रांकडून खेपा घालावयाच्या, आपणास मत देण्याबदल त्यांच्याकडून वचनें घ्यावयाचीं; त्यांच्या सभा भरवून मी तुमच्यासाठीं पार्लमेंतांत अमुक करीन, तमुक करीन इत्यादि आश्वासनें द्यावयाचीं, इत्यादि खटपटी कराव्या लागतात, व पैसाही बराच खर्च करावा लागतो. मध्यें मध्यें हें पैशाच्या खर्चाचें बंड माजलेलें होतें, व त्यांत लांचाचाहि समावेश होत असे. पण अलीकडे कायद्यानें पुष्कळ खबरदारी घेतली असल्यामुळें खर्चाचें मान बरेंच बेतावर आलें आहे; तरी निवडणुकीच्या वेळीं हजार पांचशें पौंड सहज खर्च होत असतात. असो.

पण सांगावयाचें तात्पर्य काय कीं, मेकालेचीं मतें फार कडक होतीं; तीं तत्संबंधी एका पत्रांत त्यानें व्यक्त केलीं आहेत. तो सामान्यतः असें ह्मणतो:—मतांसाठीं भिक्षा मागणें ही चाल वेडेपणाची, घातुक, व प्रतिनिधिविशिष्ट राज्य पद्धतीला अगदीं विरुद्ध अशी मला वाटते. मतदारानें मत द्यावयाचें तें खासगी ह्मणून कोणी मागूं नये, व कोणी देऊंहि नये. निवडून येणें हें जसें उमेदवाराच्या फायद्याचें आहे तसें चांगला उमेदवार निवडणें हें मतदारांच्या फायद्याचें आहे. बरें, प्रामाणिक माणसास तूं आपल्या सद्बुद्धिविवेक बुद्धीच्या

सांगण्याप्रमाणें मत दे असें सांगणें अनावश्यक आहे, आणि त्या बुद्धीच्या सांगण्या विरुद्ध वाग असें सांगणें ह्मणजे त्याचा अपमान करण्यासारखें आहे. उमेदवारांचेंच कार्य साधण्यासाठीं जर ते निवडावयाचे असतील तर मग मतें मिळविण्यासाठीं उंबरठे झिजविणें हें ठीक आहे; पण सार्वजनिक कार्य साधण्यासाठीं जर ते निवडावयाचे असतील तर ही चाल ह्मणजे मूर्खपणाची कमाल आहे. आजपर्यंत निवडणुकीचें सगळेंच सोंग होतें, तेथपर्यंत ह्या चालीचें बरेंच अनुकरण लोकांनीं केलें हें स्वाभाविक आहे. पण आतां ही चाल नष्ट होईल अशी मला उमेद आहे. ज्या पुष्कळ व समजुतदार लोकांना नव्या कायद्यानें मतदानाचा हक्क मिळाला आहे त्यांच्या हें लक्ष्यांत येईल अशी मी आशा करतों कीं, आग्रह व आलिंगनें ह्यांना भुलून मत देणें ह्मणजे पैसे घेऊन तें देण्यासारखेंच सरासरी आहे. ज्यूरीमन ह्या नात्यानें जें आपलें वर्णन असतें किंवा असावयास पाहिजे, तेंच मतदार ह्या नात्यानें असलें पाहिजे...माझें वर्तन लिड्सच्या मतदारांस विदित आहे. माझीं मतें मी सर्व प्रसंगीं त्यांस अगदीं स्पष्टपणें सांगण्यास तयार आहें. जर तें वर्तन त्यांस पसंत असेल, जर तीं मतें त्यांस कबूल असतील, तर त्यांनीं मला, माझ्या हितासाठीं नव्हे, तर आपल्या हितासाठीं निवडावें. इ. इ.

पार्लमेंतांत गेल्यावर मी अमुक करीन, तमुक करीन, अशीं वचनें उमेद्वार देत असतात, व मतदार घेत असतात; त्या गोष्टीस अनुलक्षून त्यानें ह्याच पत्रांत असें लिहिलें आहे:—अशीं वचनें मी देणार नाहीं. वैद्यास जशी वैद्यकीची, व चांभारास जशी जोडे शिवण्याची कला, सामान्य माणसापेक्षां ज्यास्त चांगली समजत असते, तशीच पार्लमेंतांत अनुभव घेतलेल्या माणसास राजकीय कारभाराची व कायदेकानूंची कला इतरांपेक्षां ज्यास्त चांगली समजत असते.

ह्मणून त्याच्या कामांत मतदारांनीं ढवळाढवळ करूं नये. प्रथम त्याचीं सामान्य मतें विचारून घ्यावीं, व नंतर तो कसा वागतो तें पाहावें; व त्याचें वर्तन पसंत न पडल्यास त्यास पुनः निवडूं नये; पण त्याजपासून प्रथम वचनें घेऊं नयेत. जर ते मागत असतील तर मी उमेदवार होण्यास तयार नाहीं- इ. इ.

ही त्याची स्पष्टोक्ति पुष्कळ मतदारांस अपमानकारक वाटली, व कित्येकांस तर शक्ति असेल तर मला टाका हुसकून ! अशा प्रकारचें तें आव्हानच वाटलें; अर्थात् त्यास उलट पत्रें आलीं; त्या वर त्यानें उत्तर ह्मणून दुसरें एक पत्र लिहिलें आहे. त्यांत तो ह्मणतो:– हें असें होईल हें सर्व मी जाणूनच होतों. पण मला वाटतें कीं राजकीय कारणांत पडलेल्या माणसांनीं लोकांनां " खरें, सगळें खरें, व खरें असेल तेवढेंच " स्पष्टपणें सांगण्याची जर विशेष महत्त्वाची वेळ कोणतीहि असेल तर ती हीच आहे. लोकांस न आवडतील असे विषय साधले तितकावेळ टाळणें, व त्यासंबंधानें बोलणें भागच पडल्यास उडवा उडवीचीं व पोकळ उत्तरें देणें ह्यापेक्षां अधिक सोपें कांहींच नाहीं. निवडणुक चालली असतां वचनांचा सुकाळ करणें, व निवडून आल्याबरोबर तीं विसरणें, ह्यापेक्षां अधिक सोपें दुसरें कांहींच नाहीं. मी असल्या मार्गाचें अवलंबन खचीत करणार नाहीं. ढोंगाच्या बळावर एकही मत मिळविण्याची माझी इच्छा नाहीं. जुनी पद्धत असतां मी महाजनांची वृथा स्तुति कधीं केली नाहीं. नव्या पद्धती खालीं सामान्य जनाची वृथा स्तुति मी कधीं करणार नाहीं. जें सत्य आहे, किंवा जें सत्य ह्मणून मला वाटतें, तें कधीं कधीं, ज्यांच्या मजवरच्या चांगल्या मताची मी फार मोठी किंमत मानितों, त्यांस रुचणार नाहीं. असें जरी असलें तरी सत्याची कांस मी कधीं सोडणार नाहीं, व विचारान्तीं आणि काल-

न्तरानें तें त्यांस रुचूं लागेल अशा भरंशावर मी राहिन. इतकेंहि करून त्यांनीं मला निवडिलें नाहीं, तर मी माझा पराभव धैर्यानें व न चिडतां सहन करीन. मी पार्लमेंतांत बसावें ही माझ्या सुखास कांहीं आवश्यक गोष्टी नाहीं; पण पार्लमेंतांत काय, किंवा पार्लमेंताच्या बाहेर काय, मीं बरोबर तेंच केलें आहे, अशी मला सदा खात्री असावी, हें माझ्या सुखास आवश्यक आहे. इ. इ.

मेकालेनें आपल्या मतदारांस जरी ह्याप्रमाणें गोड गोष्ट भाषणांनीं तृप्त केलें नाहीं, तरी त्यानें त्यांस राजकीय कामांत उत्तम प्रकारचा उपदेश पाहिजे तितका केला, आणि रिफार्म बिल कायदेशीर रीतीनें चळवळ करून रक्ताचा एक थेंबहि न पडतां पास करून घेतल्याबद्दल फार गोडवे गाईले. मेकालेविरुद्ध आपलें कांहीं चालत नाहीं असें पाहून शेवटीं लीड्स येथील टोरींनीं एक अजब क्लृप्ति ह्मणून काढिली; ती ही कीं, मेकाले हा स्वतंत्र माणूस नाहीं, सरकारी नोकर आहे, असा ते त्याचा कमीपणा दाखवूं लागले. आज केवळ चवदा महिने वजा करतां, जे ८४ वर्षें अधिकारस्थ होते अशा टोरीपक्षाच्या लोकांनीं मेकालेचें हें व्यंग ह्मणून पुढें काढावें ह्मणजे त्यांच्या धाडसाची कमाल झाली ह्मणावयाची. तेव्हां त्यानें त्यांला सणसणीत उत्तर दिलें असेल ह्याची कल्पना सहज होईल. तो ह्मणाला, " दुष्ट माणसें माझ्या विरुद्ध आणूं शकतील असा आरोप एवढाच आहे कीं मी सरकारी नोकर आहे. सभ्य गृहस्थ हो, अशी तुमची इच्छा आहे काय कीं ज्यांच्यावर लोकांचा विश्वास असेल त्यांजवर राजानें ह्मणून कधीं विश्वास ठेवूं नये ? अशी तुमची इच्छा आहे काय कीं ज्यांस कोणीहि लोक प्रतिनिधि ह्मणून निवडणार नाहींत त्यांच्या शिवाय कोणीहि प्रधान होऊं नये ? मी विचारितों, रिफार्म बिल कोणीं पास केलें ?

प्रधानांनीं. पार्लमेंताचे सभासद निवडण्याचा हक्क लीड्स शहरास कोणीं प्राप्त करून दिला? तो प्राप्त करून देण्यास स्वदेशाभिमानी प्रधानांचें निरलस प्रयत्नच कारण झाले आहेत. राजसेवा करणारास लोकसेवा करतांच येऊं नये, असा जर रिफार्म बिलाचा परिणाम झाला असेल, तर त्या बिलानें लोकांचें कार्य मुळींच झालें नाहीं असें मी समजेन."

निवडणुकीस सुरवात होण्याच्या अगदीं सुमारास त्याचा सहाध्यायी व मित्र हाइड व्हिलियर्स हा मरण पावला, आणि अशा रीतीनें बोर्ड आव कंट्रोलच्या सेक्रेटरीची जागा रिकामी झाली. मेकालेस ती जागा मिळाली. ती फार जोखमीची असून तिचीं कर्तव्यें ठरींव अशीं होतीं; ती पत्करल्यापासून नांव मिळविण्यास मेकालेस फार उत्तम संधि मिळाली. ह्याच सुमारास दुसरी एक गोष्ट घडून आली; तिच्या योगानें त्यास जें बरें वाटलें, तितकें राजकीय व्यवहारासंबंधाच्या कोणत्याहि गोष्टीनें वाटलें नसतें. आज कांहीं महिने पावेतों त्याच्या बहिणी हाना व मार्गारेट ह्या लिव्हरपूल नजीक एका खेड्यांत मि. जान क्रापर नामक एका क्वेकरपंथीय गृहस्थाच्या घरीं पाव्हण्या ह्मणून जाऊन राहिल्या होत्या, व तेथें बहुतेक घरच्या मुलीच ह्मणून बनून गेल्या होत्या; ही भेट संपण्याच्या अगोदर मार्गारेटचें घरधन्याचा भाऊ एडवर्ड क्रॉपर ह्याशीं लग्न जुळलें. हा गृहस्थ तिला व पुढें जी व्यापारांत त्याची खूप भरभराट झाली तिला, दोघींलाहि पात्रच होता.

ह्या वेळच्या व ह्या पुढच्या मेकालेच्या पत्रांतून त्याच्या स्वभावाचें असें एक व्यंग दृग्गोचर होतें कीं, ज्याला त्याची त्याच्या राजकीय कामांसंबंधीं कृत्यांवरून व त्याच्या प्रसिद्ध झालेल्या ग्रंथांवरून तेवढीच कायती माहिती झालेली असेल, त्याला तें त्याच्या

ठिकाणीं असेल असें मानण्यास जरा पंचाईतच वाटेल. त्यांना सहाजीकच असें वाटत असेल कीं, मेकालेचें मन ह्मणजे पिंडापासून पुरुषाचें होतें. त्याचें लिहिणें, त्याचे विचार, त्याचें बोलणें, व त्याची कृति हीं सर्व पुरुषास शोभतील अशींच होतीं. लोकांना तो उत्साह, उल्हास आणि स्वावलंबन ह्यांचा पुतळाच ह्मणून वाटे; पण त्याच्या कुटुंबांतील माणसांस, व मित्रांपैकीं कदाचित् एकासच ( एलिस यास ) मात्र असें दिसून येई कीं त्याचें अंतःकरण फारच कोमल आहे, व त्याच्या संवेदनाशक्ती फारच तिखट आहेत. त्याची ज्याच्यावर ह्मणून प्रीति असे, त्याच्यावर ती इतकी निःसीम व इतकी पूर्ण असे कीं, तेणेंकरून त्यानें स्वहितावर पाणी पाडून घेतलें. ज्या नातेवाईकांस, त्यांचें त्याजवर कितीहि प्रेम असलें, तरी आपला सगळा वेळ व आपलें सगळें अंतःकरण देतां येण्यासारखें नव्हतें, अशा आपल्या नातेवाईकांवर त्यानें आपलें इतकें अत्यन्त प्रेम जडवून टाकिलें, हा त्याचा वेडेपणा होय. ह्या वेडेपणामुळें त्याचें फार नुकसान झालें; पण तो इतका न्यायी व इतका दयाळू होता कीं, आपल्याबरोबर त्यानें त्या नातेवाईकांस तसलेंच स्वतःचें नुकसान करून घेण्याची परवानगी दिली नाहीं.

त्याच्या बहिणीची व त्याची ताटातूट झाली, तिचें मेकालेस किती भारी वाईट वाटलें, ह्याबद्दल दिग्दर्शन करण्यापेक्षां ज्यास्त कांहीं करतां येणें शक्य नाहीं. आपल्यापेक्षां जीं लहान त्यांशीं सानंद व सप्रेम अशा निकट सहवासांत एकसारखे पुष्कळ दिवस राहिल्यामुळें जें अगदीं पोरपणापासून वळण त्याच्या मनास लागलेलें होतें, तें ह्यावेळेस जें नाहींसें झालें, तें पुनः कधीं आलें नाहीं. बरें, हा आपला सहवास क्षणभंगुर व अनिश्चित असाच आहे, व तो तसा असावयाचाच, ह्याबद्दलहि त्यांपैकीं कोणाच्याहि मनांत संशयहि आलेला

नव्हता. आतां पहिल्यानें त्याच्या मनांत संशय उत्पन्न झाला कीं, आपण जो आपल्या आयुष्याचा नमुना रेखाटून ठेविला, तो शहाणपणाचा होता, कीं वेडेपणाचा होता; किंवा, कदाचित् असें ह्मणणें ज्यास्त बरोबर होईल कीं आपण आपल्या आयुष्याचा भविष्यक्रम कांहींच ठरविला नाहीं, ही गोष्ट त्याच्या आतां लक्ष्यांत आली. पण त्याच्या स्वभावाची व त्याच्या बऱ्याच कारकीर्दीची किल्ली जी त्याची अनात्माहितबुद्धि तिनें प्रेरित होऊन, आपलें दुःख त्यानें आपल्या नातेवाईकांपासून लपवून ठेविलें; नाहीं तर तेणेंकरून त्यांच्या सुखावर विरजण पडलें असतें.

नवंबर १८३२ त तो लिहितोः—" भाऊ आणि बहिणी ह्यांज मधील प्रेम जरी निर्दोष, सुंदर, व आनंदकारी असें असतें, तरी दुसऱ्या प्रेमांपुढें तें मागें पडण्याचा संभव इतका असतो कीं, जो शहाणा असेल त्यानें त्या प्रेमाशिवाय आपलें चालावयाचेंच नाहीं इतकें त्याच्यावर अवलंबून राहूं नये. बायकांनीं आपलीं जन्मगृहें सोडावीं, व रक्तैक्याहून अधिक प्रिय अशीं नवीन बंधनें जोडावीं, हा नियम आपल्या मानवजातीच्या अगदीं पुराणतम इतिहासाइतकी पुराणतम आहे, आणि माणसाचें शरीर व मन ह्यांच्या घटनेइतकाच अबाध्य आहे. माझ्या अदूरदर्शीत्वामुळें मला जड वाटतें, ह्मणून सृष्टीच्या घटनेविरुद्ध व एकंदर समाजरचनेच्या मूलतत्त्वांविरुद्ध मनांत झुरत राहणें ह्मणजे आपलपोटेपणाची व नीचपणाची कमालच झाली ह्मणावयाची.

" आणखी एकवार मजवर असा प्रसंग येणें आहे. आणखी एक अशीच गोष्ट घडावयाची आहे; व मी आशा करितों कीं, ती जेव्हां घडेल तेव्हां तिजबद्दल माझ्या मनाची तयारी असेल. जर कधीं कोणाचें अंतःकरण गृहसुखाभिलाषी बनलेलें असेल; तर तें माझें·

आहे; असें असूनहि मला तेव्हांपासून महत्वाकांक्षेविना जगांत कांहीं एक उरणार नाहीं. पण काळ आणि जरूरी ह्यांच्या सपाट्यांत सह्य होणार नाहीं, अशी कोणतीच जखम नाहीं; आणि एकंदरींत पाहिलें तर माझ्या वाडवडिलांपेक्षां मीच ज्यास्ती कोण ? ह्या आयुष्यरूप सोडतीमध्यें कोणत्या तरी एकाद्या लाडक्या नंबरासाठीं ज्यांनीं मनाच्या दौर्बल्यामुळें दुप्पट रक्कम भरली आहे, आणि जेव्हां त्या नंबरची चिठी कोरी निघाली, तेव्हां ज्यांची दुप्पट निराशा झाली आहे, अशा लाखों–लाखों कां कोट्यवधि–माणसांपेक्षां मीच कोण ज्यास्ती ?"

इकडे लीड्स येथें निवडणुकीची गडबड चाललीच होती. शेवटीं सॅडलर ह्याचा पराभव होऊन मार्शल व मेकाले हेच निवडून आले; आणि २९ जानेवारी १८३३ रोजीं सुधारलेल्या पार्लमेंताच्या पहिल्या सेशनास सुरवात झाली. ह्या सेशनामध्यें सार्वजनिक उपयुक्ततेचे पुष्कळ कायदे पसार झाले; पण त्यांचें सविस्तर वर्णन करणें हें काम सामान्य इतिहासकारांचें आहे; मेकालेच्या चरित्रकाराचें नव्हे. ऐरिश बारिस्टर व वक्ता ओकॉनेल ह्यानें राजाच्या भाषणावर ( प्रत्येक सेशनाच्या आरंभीं असें भाषण होत असतें, व त्यांत ह्या सेशनांत काय करावयाचें, व राज्याची एकंदर स्थिति कशी आहे, वगैरे गोष्टींचा उल्लेख केलेला असतो. ) लांबलचक टीका केली, व कामन्स सभेस ऐर्लंदाचा विषय हातीं घेणें भाग पडलें; त्यावर वादविवाद सारख्या चार रात्री चालला. त्या वादविवादांत ऐरिश सभासद शील व ग्राटन ह्यांचीं भाषणें नामी झालीं; पील व स्टान्ले ह्यांचीं वाखाणण्यासारखीं झालीं; बुलवरचें (ग्रंथकार व परराष्ट्राशीं वकील ) पहिलें पण छाप बसण्यासारखें भाषण झालें; आणि कॅबिटचें अनिर्बंध व्यापार ह्या तत्त्वाचा एक चालक; दुसरा जॉनब्राइट ) दुसरें पुळपुळीत भाषण झालें; पण सर्वांत मोठ्या व सर्वांहून ज्यास्त वेळेपर्यंत

ज्या टाळ्या मिळाल्या त्या मेकालेनें व्हिग पक्षाच्या वतीनें जेव्हां त्या मोठ्या चळवळ्यास (ओकॉनेल ह्यास असें ह्मणत) सणसणीत पण मर्यादातिक्रम न करतां उत्तर दिलें, तेव्हांच मिळाल्या. अशा रीतीनें जरी हो सभेचा लाडका झाला, तरी तो वरचेवर भाषणें करीत नसे. ह्याचें कारण असें कीं, प्रधानमंडळापैकीं जो खालच्या दर्जाचा कामदार असतो, त्याला त्याच्या खात्यांतच पुरेपुरेसें काम असतें, व त्यामुळें त्यास पार्लमेंतांत वादविवाद करण्याचा मोह फारसा होत नाहीं, व उत्तेजन तर त्याहूनहि कमी मिळतें. पार्लमेंतांत प्रत्येक चालू विषयावर बोलण्याचें त्यानें टाकिल्यामुळें तो जेव्हां आपल्याविषयांवर तेवढें बोले, तेव्हां दोन्ही पक्षांचे लोक त्याचें ह्मणणें लक्ष्यपूर्वक व स्नेहपूर्वक ऐकत असत. आणि त्यामुळें या वेळीं जेव्हां ईस्ट इंडिया कंपनीची सनद पुनः ताजी केली; त्या वेळीं ज्या मोठमोठ्या सुधारणा करण्याचें प्रधानांनीं मनांत आणिलें होतें, त्या पास होण्यास फार सुलभ पडलें.

ईस्ट इंडिया कंपनीची सनद दर वीस वर्षांनीं नवी करीत असत; पण प्रत्येक तेवढ्या मुदतींत कंपनीचें पाऊल इतकें पुढें पडलेलें असे कीं, सनद नवी करावयाची ह्मणजे एक क्रान्तीच बनवून आणावी लागत असे. १८१३ त जेव्हां सनद नवी केली, तेव्हां हिंदुस्थानाशीं व्यापार करण्याचा जो कंपनीचा विशेष हक्क तो काढून टाकिला होता. १८३३ त चीन देशाशीं असा व्यापार करण्याचा जो तिचा हक्क तो काढून टाकण्याची वेळ येऊन ठेपली; आणि हा त्या कंपनीचा व्यापारसंबंधीं शेवटचा विशेष हक्क काढून टाकिला, ह्मणजे व्यापार संबंधीं कंपनी बुडणार हें उघडच होतें. तथापि कंपनीच्या हिंदुस्थानांतील राज्याचा विस्तार यावेळीं इतका झाला होता, व दर दहा वर्षांत इतका ज्यास्त ज्यास्त होत होता कीं कंपनी

कितीहि हुशार, शहाणी, व सावध असली, तरी व्यापारावरील निर्बंध काढल्यावर तिला खाजगी व्यापाऱ्यांशीं टक्कर देतां येण्याचा संभव नव्हता. ह्या महान् कंपनीनें इंग्लंदचा जो मोठा फायदा करून दिला होता, तो त्याच्या ध्यानांत होता; ह्मणून तिच्या शिरावर असह्य ओझें लादून त्या उपकाराची फेड करावी, असें इंग्लंदास वाटलें नाहीं. तेव्हां न्याय आणि सोय हीं दोन्ही साधण्याचा एकच मार्ग राहिला होता; तो कंपनीचें देणें व घेणें सर्व सरकारानें विकत घ्यावें, व त्याबद्दल तीस चांगला मोबदला द्यावा. ह्मणून असें ठरविलें कीं, कंपनीच्या प्रत्येक शंभर पौंड ठेवीवर हिंदुस्थानच्या तिजोरींतून १० गिनी व्याज द्यावें, कंपनीचे व्यापार करण्याचे विशेष हक्क काढून घ्यावे, व हिंदुस्थानच्या राज्यकारभाराचें तेवढें काम तिजकडे ठेवून द्यावें. सारांश, अशा रीतीनें कंपनीचे डायरेक्टर हे राजे ह्मणून राहिलेच, पण व्यापारी राजे, हें मात्र त्यांचें उपपद आतां निघालें.

कंपनीच्या घटनेंत हें जें जंगी रूपान्तर घडवून आणावयाचें होतें तें अमलांत आणण्यासाठीं साधन ह्मणून एक बिल पार्लमेंतापुढें आणिलें; त्याचें प्रत्येक कलम ह्या सुधारलेल्या पार्लमेंताच्या श्रीदास शोभेल असें उदार, मतांतरसहिष्णु व दूरवर दृष्टि देऊन तयार केलेलें असें होतें. त्या बिलाच्या पहिल्या पहिल्या कलमांचा उद्देश कंपनीची सर्व मालमत्ता गादीची ट्रस्टी ह्मणून कंपनीच्या हातीं ठेवावी असा होता; नंतरच्या कलमांनीं चीनच्या व्यापाराचा विशेष हक्क कंपनीपासून काढून घेतला होता; दुसऱ्या कांहीं कलमांनीं राणीच्या सर्व प्रजांना हिंदुस्थानांत जाऊन राहण्याची परवानगी दिली होती; दुसऱ्या कलमांनीं हिंदुस्थानांतून गुलामगिरी काढून टाकिली; आणि दुसरें एक महत्वाचें कलम त्यांत असें होतें कीं,

" धर्म, जन्म, देश, जात, किंवा वर्ण, एवढ्यावरूनच ब्रिटिश राज्यांतल्या कोणत्याहि एतद्देशीय गृहस्थास कोणतीहि जागा, हुद्दा किंवा नोकरी मिळण्यास प्रतिबंध होणार नाहीं. " बोर्ड आव कंट्रोलचा अध्यक्ष जो चार्लस ग्रांट त्यानें हें बिल सभेपुढें आणिलें, आणि बुधवार जुलै १० या रोजीं त्याचें दुसरें वाचन झालें. त्या प्रसंगीं मेकालेनें जेव्हां त्याच्या पुष्ट्यर्थ भाषण केलें, तेव्हां सभागृहांत पातळाई होती; तो बुधवारचा दिवस, आणि हिंदुस्थानसंबंधी प्रश्न पुढें, ह्या दोन गोष्टी ध्यानांत आणिल्या, म्हणजे या गोष्टीबद्दल आश्चर्य मानण्याचें कारण रहावयाचें नाहीं. पण त्या वेळीं श्रोतृमंडळ जरी लहान होतें, तरी त्याच्यांत लार्ड जॉन रसेल, पील, ओकानेल इत्यादि पार्लमेंतांतील बडीं बडीं धेंडे हजर होतीं. भाषणाच्या अखेरीस चार्लस ग्रांट ह्यानें सर्वांच्या वतीनें म्हणून मेकालेची त्याच्या मोठ्या मुत्सद्दीपणाबद्दल, विशेष व्यावहारिक चातुर्याबद्दल, व उदात्त वक्तृत्वाबद्दल फारच तारीफ केली.

उदारबुद्धीच्या मुख्य कामदारानें हाताखालच्या कामदारांशीं फारच सख्यपूर्वक वागत असतां त्याची प्रशंसा केली म्हणजे ती जितक्या कृतज्ञताबुद्धीनें तो मनांत सांठवून ठेवितो, त्यापेक्षां अधिक कृतज्ञताबुद्धीनें तो कांहींच स्मरत नसेल. ज्याच्या हाताखालीं सरकारी नोकर या नात्यानें आपल्या कारकीर्दीस सुरवात झाली असेल, त्या माणसाबद्दल जी आपली निष्ठा असते, तसली निष्ठा मेकालेची चार्लस ग्रांटवर शेवटपर्यंत होती. दुसऱ्या वाचनानंतर जी कमिटी बसते, तींतून एकादें बिल तंट्याबखेड्या खेरीज सुलभ रीतीनें पार पाडणें, हें काम मोठें कठीण असतें; व तसें करणें ह्याचा अधिकाऱ्यांना साहजिक मोठा अभिमान वाटत असतो. तशा प्रकारचें साह्याय्य प्रस्तुत बिलाच्या संबंधानें सेक्रेटरीनें अध्यक्षास करून त्याच्या

नेहमीच्या दयालुत्वाबद्दल व आपल्यावर टाकिलेल्या भरंवशाबद्दल त्याचीं फेड केली. मद्रास व मुंबई एथें बिशप नेमण्याचा संबंधानें जी कलमें बिलांत होतीं त्यांजवर बराच वादविवाद झाला, व पुष्कळ वेळां मतें घेण्याचा प्रसंग आला; पण प्रत्येक प्रसंगीं प्रधानांनीं पुष्कळ माताधिक्यानें आपलें ह्मणणें पास करून घेतलें. आणि त्या बिलाच्या बारीक सारीक गोष्टींत थोडासा फेर बदल होऊन, पण तत्त्वांत मुळींच फरक न होतां, पार्लमेंताच्या व देशाच्या बहुतेक सार्वजनिक ऐकमत्यानें तें बिल अखेरीस पसार झालें.

ह्या वेळच्या त्याच्या पत्रव्यवहारावरून एकदोन महत्वाच्या गोष्टी व्यक्त होतात. एडिंबरो रिव्यूचा खप ह्या वेळीं कमी होऊं लागला होता. त्याचें कारण काय ह्मणून संपादकानें निरनिराळ्या ५०० पुस्तकें विकणाऱ्यांस पुसलें. सगळ्यांच्या उत्तरांचा निष्कर्ष असा निघाला कीं रिव्यूच्या कोणत्याहि अंकाचा खप होणें किंवा न होणें, हें त्या अंकांत मेकालेच्या हातचा लेख असणें किंवा नसणें ह्यावर अवलंबून असतें. ह्यावरून मेकालेची लेखणी ह्या वेळीं किती लोकप्रिय झाली होती, हें उत्तम रीतीनें व्यक्त होतें.

दुसरी एक गोष्ट व्यक्त होते ती अशी कीं आयर्लंदांतील प्रॉटेस्टंट धर्मसंस्थेच्या संबंधानें एक बिल प्रधानांनीं पुढें आणिलें असून लार्डांच्या सभेंत त्याच्याविरुद्ध मारामार चालली होती, व रिफार्म बिलाच्या वेळीं जी स्थिति झाली तिचीच पुनरावृत्ति होते कीं काय, अशी भीती उत्पन्न झाली होती. शिवाय, चालू पार्लमेंत अशा रीतीनें मध्येंच खलास झाल्यास मागें सांगितलेलें ईस्ट इंडिया कंपनीच्या सनदेचें बिल, आणि ह्या वेळीं चर्चा चालत असलेलें व गुलामांच्या स्वातंत्र्याबद्दलचें बिल ह्या दोन महत्त्वांच्या बिलांस खो बसण्याचा संभव होता. ह्या सर्व गोष्टींस त्रासून जाऊन मेकालेनें निराशेचे उद्गार

काढिलेले आढळतात. तो ह्मणतो, " मला ह्या सगळ्याशीं काय करावयाचें आहे ? मला असें आश्चर्य वाटूं लागलें आहे कीं, आपली थंड व बिनगलबल्याची खोली, गरम चहा, व उत्तम पुस्तकें, हीं सोडून, वाईट हवा खाण्यास, वाईट भाषणें ऐकण्यास, सभागृहाच्या लांबच लांब ग्यालर्‍यांतून निरुद्योग भटकण्यास, पहाटेचे तीन वाजेपर्यंत हिरव्या बाकांवरून डुलक्या खाण्यास, लोक येतात तरी कसे ! इ. इ. " असें ह्मणून मेकाले शेवटीं आपल्या बहिणीस असा प्रश्न विचारितो कीं, माझी महत्वाकांक्षा, व हे जे तात्विकविचार माझ्या मनांत येतात ते, ह्या दोहोंचा मेळ कसा बसवावा, हें कोडें तूं उकलशील काय ?

तिसरी एक महत्वाची गोष्ट व्यक्त होते ती ही कीं, मेकालेपाशीं या वेळीं रोकड व येणें मिळून ७०९ पौंड काय ती पुंजी होती; पैकीं २२४ पौंड रोख होते. तिमाहीचा पगार ३७ पौंड लवकरच मिळावयाचा होता. शेवटच्या निबंधाबद्दल रिव्ह्यूकाराकडून निदान १० पौंड यावयाचे होते; व एकाला वीस पौंड हात उसने दिलेले होते. हा सर्व हिशेब मेकालेनें कवितारूप पत्रानें, व अतएव फारच मजेदार रीतीनें, आपल्या बहिणीस कळविला आहे. अशा प्रकारच्या स्वकृत कविता बहिणींना लिहिलेल्या पत्रांतून ह्या वेळीं पुष्कळ आढळतात. असो.

पण ह्या ठिकाणीं ह्या हिशेबास विशेष उल्लेख करणें जरा ज्यास्त महत्वाचें आहे. तें असें. गुलामगिरीची चाल एकंदर ब्रिटिश राज्यांत बंद व्हावी एतदर्थ जी खटपट आज कित्येक वर्षें चालली होती, तींत ह्याच्या बापाचें तन, मन, धन कसें खर्च होत होतें, हें अगोदर सांगितलेंच. ह्या विलक्षण श्रमाचें चीज होण्याची वेळ आतां येऊन ठेपली होती; कारण लार्ड ग्रेच्या प्रधानमंडळानें वेस्ट-

इंडिज बेटांतील नीग्रो लोक दास्यमुक्त करण्याचें काम आपल्या शिरावर घेतलें होतें. पण प्रधानांनीं ह्या संबंधानें जे ठराव तयार केले होते त्यांतील कांहीं जसेच्या तसेच पास झाले, तर त्यांचा परिणाम व्हावा तितका समाधानकारक होणार नाहीं, अशी भीती होती. ह्यापैकीं अगदीं असमाधानकारक ठराव असा होता कीं, गुलामांची मुक्तता केल्यावर पूर्वीच्या धन्यांच्या सोईसाठीं त्यांनीं कांहीं वर्षेंपर्यंत त्यांची नोकरी केलीच पाहिजे. अमुकच वर्षें ह्मणून जरी ठरावांत सांगितलें नव्हतें, तरी पुढें ह्या ठरावानुरूप जें बिल तयार व्हावयाचें होतें, त्याच्या कलमांत बारा वर्षांची मुदत घालणार अशी बातमी होती. ही मुदत ह्मणजे बेताबाहेर लांब आहे, असें मेकालेचें मत होतें, तथापि ह्या मोघम ठरावांच्या प्रसंगीं प्रधानांस टेंका देणें ह्यांत कांहीं गैर नाहीं, असें समजून त्यानें त्यांस अनुकूल मत दिलें. तथापि, त्यानें आपल्या भाषणांत मुद्दाम असें सुचवून ठेविलें होतें कीं, पुढें मागें स्वतंत्रपणें मत देतां येण्यासाठीं आपणास आपल्या सरकारी नोकरीचा (सेक्रेटरीशिपचा) राजीनामा देण्याचा प्रसंग येईल, (ह्या ठिकाणीं एक गोष्ट सांगणें इष्ट दिसतें. ती ही कीं, "ज्याची खावी पोळी त्याची वाजवावी टाळी" या न्यायानें, आणि सरकारी कामाची शिस्त बिघडूं नये, व घरांत तंटा असूं नये, ह्या दृष्टीनें, सरकारी नोकरानें कोणत्याही महत्वाच्या प्रश्नासंबंधानें आपलें मत सरकारच्या विरुद्ध आहे असें प्रसिद्धपणें सांगणें, किंवा सरकारच्या नीतिक्रमावर प्रतिकूल टीका करणें हें गैरशिस्त समजलें जातें. सरकारी नोकरास तसें करणें जरूर वाटल्यास त्यानें प्रथम राजीनामा द्यावा, व मग पाहिजे तें करावें अशी रीत आहे; तीस अनुसरून मेकालेची ही सूचना होती.) असो.

जसजसे ज्यास्त दिवस जात चालले, तसतसें असें स्पष्ट दिसूं लागलें कीं, मेकालेला आपला निश्चय कदाचित् कसोटीस लावून

दाखवावा लागणार; आणि ही कसोटी चांगलीच होती. मेकाले हा नुक्ता मुत्सद्दी ह्मणून उदयास येत होता, व व्हिगपक्षाचे हातीं सत्ता निदान २५ वर्षें तरी आणखी राहील असा रंग होता; तेव्हां अशा मंडळांतून निघणें ह्मणजे आपलें मोठें नुकसान करून घेण्यासारखें होतें; शिवाय तो आपल्या पक्षाबद्दल इतका अभिमानी होता कीं, आपण त्या पक्षाला प्रतिकूल आहों, असें नुसतें दर्शविणें देखील त्यास कसेंसेंच वाटत असे; शिवाय, तो समजूतदार माणूस असल्यामुळें थोडक्या कारणाकरितां आपल्या मित्रांपासून वियुक्त होऊन आपणास विक्षिप्त ह्मणून घेण्याची हौस त्याला मुळींच नव्हती; शिवाय, तो लीड्ससारख्या मोठ्या शहरचा प्रतिनिधि असून, त्याच्या जवळ काय ते रोख व येणें मिळून सातशें पौंडच होते; आणि सर्वांत अत्यन्त महत्वाची गोष्ट ह्मटली ह्मणजे ही कीं, तो मायाळू असा पुत्र व भाऊ असून, त्याला जीं अत्यन्त प्रिय ह्मणून वाटत होतीं, त्या सर्वांचा ह्या वेळेस तोच काय तो मुख्य आधार व आशातंतु होता. अशी सर्व स्थिति असल्यामुळें राजीनामा देऊन त्रागा करण्याची त्याला कांहीं घाई सुटलेली नव्हती, हें सहज लक्ष्यांत येण्यासारखें आहे. त्याच्या बापाची द्रव्यस्थिति नुसती वाईटच नव्हती, तर त्याच्याही पलीकडे गेली होती. आफ्रिकेशीं व्यापार करणाऱ्या त्याच्या पेढीचें जरी दिवाळें निघालें नव्हतें, तरी तिचें काम मुळींच चालत नव्हतें; किंवा इतक्यापुरतेंच चाललें होतें कीं, बरींच वर्षेंपर्यंत संसाराचा जरूरीचा तेवढा खर्च भागून मेकालेच्या उत्पन्नांतून जें काय शिल्लक राहील, तें बापाच्या सावकारांचें व्याज व मुद्दल•यांची फेड करण्यांत खर्च व्हावें. हें जें तो आपलें पुत्रकर्तव्य ह्मणून बजावीत होता, त्या कामीं त्याचा धाकटा भाऊ हेन्री हा हातभार लावीत होता. हाही फार पाणीदार असून फार हुशार होता, व त्यास सेरालोन येथें नेमणूक मिळाली होती.

द्रव्यविषयक संकटाचें हें ओझें ह्या कुटुंबांतील धाकट्या भांवडांना देखील आतां भासूं लागलें होतें. ह्याच वेळाच्या सुमारास, किंवा कदाचित् ह्याच्या जरा अगोदरच, ह्याना मेकाले आपल्या एका आप्तास असें लिहितो:—आमच्याकडे येण्याबद्दल तूं कांहींच लिहित नाहींस. त्वां आनंदानें आमचेकडे यावें. आपल्या संकटांखालीं आपण फारसें खचतां कामा नये; कारण आह्माला वाण काय ती द्रव्याची आहे, आणि द्रव्याची वाण सोसणें, हें अत्यंत सोपें काम आहे; आणि आह्मांवर ईश्वराची जर इतकी दया आहे–आमच्यावर प्रीति करणारे व आह्मी ज्यांवर प्रीति करितों असे–जर आह्माला मित्र आहेत; आह्मी सर्व जर हयात आहों; आणि सर्वांत विशेष गोष्ट ही कीं, आह्मीं पाप न केल्यास आह्मास जर अमरत्वाची आशा दिलेली आहे–तर सुखास जें आवश्यक नाहीं, तें आमच्यापाशीं नाहीं ह्मणून मनाशीं दुःख करीत बसणें, इतका कृतघ्नपणा आपण करतां कामा नये. ”

मेकालेच्या मित्रांना ही सर्व गृहस्थिति जरी पूर्णपणें माहीत नव्हती, तरी त्यांना इतकें माहीत होतें कीं, नोकरी सोडण्यासारखी त्याला कांहीं द्रव्याची अनुकूलता नाहीं; ह्मणून तूं असें कांहीं करण्याच्या भानगडींत पडूं नको, अशी त्यांनीं त्याची पुष्कळ कानउघाडणी केली. पण त्यांना त्यानें थोडक्यांत, व बहुतेक दांडगेपणानें असें उत्तर केलें. “ मला आपल्या बापाच्या विरुद्ध जातां येत नाहीं. त्यानें आपलें सर्व आयुष्य ह्या प्रश्नास अर्पिलें आहे, आणि तो मला आपला निश्चय अढळ ठेवण्यास सांगत असतां, मला मागें घेतां येत नाहीं, ” वेस्ट इंडिया बिलाच्या ह्या आणिबाणीच्या प्रसंगीं झशारी मेकाले व त्याचा पुत्र यांचा सारखा पत्रव्यवहार चालला होता. नेहमी इतरांसाठीं आपलें जीवित घालविल्यामुळें ज्याची शेवटची

वर्षे गरीबींत चालली होती, अशा ह्या वृद्धमाणसाचें ह्या पत्रावरून जें एकंदर चित्र डोळ्यापुढें उभें राहतें तें फार हृदयद्रावक आहे. धाकटा व थोरला मेकाले ह्या दोघांच्या मतें जो क्रम स्वीकारिला असतां धाकट्याची कारकीर्द खचीत संपणार, असा क्रम त्यानें केव्हां व कसा स्वीकारावा, ह्या गोष्टीचा तो शांतपणें आणि जें मनःपूर्वक विचार करीत आहे, असें त्यावरून व्यक्त होतें; आणि आपण करीत आहों, त्यामध्यें कांहीं शूरत्वाचें कृत्य आहे, ह्याबद्दल त्यांच्या इतकें ध्यानीं मनीं दिसत नाहीं कीं, ह्यापेक्षां दुसरा कांहीं मार्ग आपणास स्वीकारतां येण्यासारखा आहे किंवा नाहीं, ही गोष्ट त्या दोघांपैकीं एकासहि सुचल्याचें दिसत नाहीं.

ह्या वेळीं आयर्लंदांतील धर्मसंस्थेसंबंधानें पार्लमेंतापुढें बिल आलेलें असून लार्डांच्या सभेंत त्यास विरोध होत होता, हें मागें सांगितलेंच. अशा आणीबाणीच्या वेळीं गुलामगिरीच्या बिलासंबंधानें आपण आपले हेतू प्रसिद्धपणें सांगितल्यास, प्रधानांस घोटाळ्यांत घातल्यासारखें होईल, असें जाणून मेकालेनें असा बेत केला कीं, प्रस्तुत बिलाच्या दुसऱ्या वाचनाचे वेळीं कांहीं न बोलतां पुढें कमिटी बसली व ऐरिश चर्च बिलासंबंधाचा धोका नाहींसा झाला, ह्मणजे मग आपणास इष्ट तो वर्तनक्रम स्वीकारणें चांगलें.

केव्हां काय करावयाचें, ह्याबद्दल अशा रीतीनें निश्चय केल्यावर मेकाले या परीक्षेच्या वेळास साजेल अशा रीतीनेंच तें करण्याच्या मार्गास लागला. आपण कांहीं करार करीत आहों, किंवा जरब घालीत आहों, अशा प्रकारचा आपला आव दिसूं नये, ह्याबद्दल होईल तितकी खबरदारी घेऊन त्यानें आपले बेत व आपलीं मतें ह्यांची वक्तशीर सूचना योग्य स्थळीं देऊन ठेविली. शेवटीं, काय करावयाचें तें आतां केलेंच पाहिजे, ज्यास्त लांबणीवर टाकतां

येत नाहीं, अशी वेळ येऊन ठेपली. जुलैच्या २४ व्या तारखेस टामस फावेल बक्स्टन ह्यानें कमिटीमध्यें अशी उपसूचना आणिली कीं नवे नोकर मिळविण्यास गुलामांच्या मालकांस जितका वेळ लागेल तितका वेळ त्यांस मुक्त केल्यावर त्यांजकडे कामास रहाणें भाग पाडावें. मेकालेनें आपला राजीनामा लार्ड आल्थार्प ह्याच्या हातीं आधींच देऊन ठेविला होता. त्यानें ह्या प्रसंगीं जें भाषण केलें, तें जरी निरलंकार व कांहीं कांहीं ठिकाणीं अगदीं हेंगाड्यासारखें असें होतें, तरी, किंवा त्यामुळेंच, त्याचा ठसा कमिटीच्या मनावर ज्यास्त उमटला. त्याच्या मनांत जे विकार ह्या वेळीं उंचबळत होते, त्यांनीं याच्या कल्पनाशक्तीचें पंख व वक्तृत्वाचा ओघ हीं दोन्ही आंखडून धरिलीं होतीं; पण हें जरी कारण नसतें, तरी देखील त्याला त्याच्या शहाणपणावरूनच असें समजलें असतें कीं, वक्तृत्वाचा दिमाख करण्याचा हा प्रसंग नव्हे. प्रथम त्यानें कमिटीला अशी विनंति केली कीं, आजच्या पेक्षां ज्यास्त भरंवशानें, व कमी उचंबळलेल्या मनोवृत्तींनीं, मी बोलत असतां जशी आपण माझी आजपर्यंत गय करीत आलां, तशी ह्या प्रसंगींही करावी. नंतर मग, प्रधानांनीं सूचना कबूल केल्यास परिणाम काय होतील, ह्याचें बरेंच विवेचन त्यानें केलें. "स्वतंत्र देशांत धन्याला पाहिजे ते कामकरी निवडतां येतात, व कामकऱ्यांस पाहिजे तो धनी पसंत करतां येतो; पण गुलामगिरी सुरू असणाऱ्या देशांत धन्याच्या हातीं जुलमी सत्ता देणें हें नेहमी आवश्यक असतें. धनी व गुलाम ह्यांच्यामध्यें शांतता राखण्याचें काम ह्या बिलानें माजिस्ट्रेटांकडे सोंपविलें आहे. जें काम गुलामानें १५ मिनिटांत करावें म्हणून धन्यास वाटत असेल, तें काम करावयास जेव्हां जेव्हां गुलामास वीस मिनिटें लागतील, तेव्हां तेव्हां माजिस्ट्रेटाकडे जाण्याचा प्रसंग येणार. सारांश, रात्रंदिवस समाजास तंटे बखेडे करीत बसावें लाग-

णार, व कोणत्याही प्रकारचा मतभेद झाला किंवा कोणत्याही प्रकारची अडचण आली, म्हणजे त्याचा किंवा तिचा निकाल करण्यासाठीं माजिस्ट्रेटास तींत हात घालावा लागणार."

बक्स्टनसाहेबाला अशी भीति होती कीं, ह्या जुलमी नोकरीचा परिणाम क्रूरपणाची वागवणूक असा होईल. मेकालेस तशी भीति वाटत नव्हती. तो म्हणाला, ह्या बाबतींत माजिस्ट्रेटाला कलोनियल ऑफिस (वसाहतींच्या सेक्रेटरीचें ऑफिस) जबाबदार धरील, व कलोनियल ऑफिसाला कामन्स सभा जबाबदार धरील; आणि कामन्स सभेंत, माजिस्ट्रेटाच्या अधिकाराखालीं गुलामाच्या पाठीवर बसणारा चाबकाचा प्रत्येक रट्टा मोजला जाईल, इतकेंच नाहीं, तर वाजवलाहि जाईल. मला भीति पडली आहे ती अशी कीं, ही मृत गुलामगिरी आणखी १२ वर्षें चालू ठेवण्याचा परिणाम—जिच्यांत जीव मुळींच नाहीं, अशा प्रकारची ही समाजस्थिति आणखी बारा वर्षें चालू ठेवण्याचा परिणाम, असा होईल कीं, सगळी नीग्रो प्रजा दुर्बल, भेषपात्र, आणि कुचकामाची होऊन जाईल, आणि स्वतंत्रतेचा उपभोग घेण्यास ह्या बारावर्षांच्या मुदतीच्या प्रारंभीं जितकी ती योग्य असेल, त्यापेक्षां फारच कमी योग्य होऊन जाईल. मला अशी आशा आहे कीं, ही नवी सरणी आपोआपच बंद होईल; मला अशी आशा व उमेद आहे कीं, थोडक्याच महिन्यांच्या अनुभवावरून ह्या तोडीचा कुचकामपणा इतक्या निर्विवादरीतीनें सिद्ध होऊन जाईल कीं, वेस्ट इंडिज बेटांतील मळ्यांचे मालक ती अप्रणच टाकून देतील, व तिच्या ऐवजीं स्वतंत्रतेच्या स्थितीची स्थापना करितील. मी दुसऱ्या वाचनाच्या वेळीं ह्या बिलास आपली संमति दिली आहे, व तिसऱ्या वाचनाच्या वेळींहि देईन; पण बिल जेव्हां कमिटी पुढें जाईल (ह्या ठिकाणीं हें सांगणें इष्ट दिसतें कीं, ही कमिटी

ह्मणजे एकादी सभासदांची लहानशी मंडळी असते असें नाहीं; तर तिच्यांत कामन्स सभेचे सर्वच सभासद बसत असतात. फरक इतकाच कीं ह्या सभेचा अध्यक्ष स्पीकर हा नसतां ' चेअरमन आव् कमिटीज् ' ह्मणून दुसरा कोणी असतो; व फायदा हा कीं ह्या कमिटीपुढें पाहिजे त्यास पाहिजे त्या कलमावर एकापेक्षां अधिक वेळां बोलतां येतें. नेहमीच्या सभेंत तसें बोलूं देत नाहींत. ह्या विशेष परवानगीमुळें बिलाच्या प्रत्येक कलमाच्या गुणदोषांचें विवेचन करणें ठीक पडतें, आणि एकादें बिल ह्याप्रमाणें कमिटींतून एकदां तावून सुलाखून बाहेर पडलें ह्मणजे तिसऱ्या वाचनाचे वेळीं त्याच्यांत फेरफार करण्याची आवश्यकता रहात नाहीं. ) तेव्हां इतर सभासदां बरोबर त्याच्यांत सुधारणा करण्यास होईल तेवढी मी खपपट करीन.

कारभारी मंडळाच्या एका घटकाच्या तोंडांतून असें उद्गार आल्याबरोबर वादविवादास लागलाच जीव आला, आणि बक्स्टनच्या उपसूचनेस इतकीं मतें मिळालीं कीं जरी त्याचें प्रत्यक्ष बहुमतच झालें नाहीं, तरी त्या वेळच्या एकंदर स्थितीचा विचार करतां तशा सारखेंच झालें. दुसऱ्या दिवशीं स्टान्ले हा उठला; प्रधानांची ह्या बिलासंबंधानें सद्यःस्थिति काय आहे तिचें थोडक्यांत त्यानें वर्णन केलें; आणि शेवटीं असें कळविलें कीं, दास्यमुक्त गुलामांच्या ह्या जुलमी नोकराची मुदत बारा वर्षांची घातली होती ती कमी करून सात वर्षांची केली आहे. मि. बक्स्टन ह्यानें गुलामगिरीविरुद्ध खटपट करणाऱ्या मंडळीच्या अग्रणीचें काम कामन्स सभेंत पहिल्यापासून आजपर्यंत जितक्या उत्साहानें तितक्याच शहाणपणानें केलें होतें; त्यानें ह्या प्रसंगीं आपल्या मित्रांस अशी मसलत दिली कीं, प्रधानांनीं ही जी सवलत आपणास दिली आहे तिचा मुकाट्यानें स्वीकार करावा; आणि हें त्याचें ह्मणणें

जरी सर्वांनींच नाहीं, तरी ज्या लोकांस आपल्यापेक्षां आपल्या कार्याचें महत्व जास्त वाटत होतें, त्यांनीं मान्य केलें. ही गोष्ट येथें मुद्दाम सांगण्यासारखी आहे कीं, मेकालेनें जें भविष्य केलें होतें, तें जरी त्यानें ह्मटलें होतें तितक्याच काळांत नाहीं, तरी उशीरां खरें ठरलें. ही तत्पुरती पद्धत चार वर्षे अमलांत राहिल्यावर सर्वच मळेवाल्यांना ती बंद करून टाकावी, ही गोष्ट पसंत पडली; कारण ही स्थिति अशी होती कीं तिजपासून जसा नीग्रो लोकांस स्वतंत्रतेचा लाभ मिळत नाहींसा झाला होता, तसाच मळेवाल्यांना गुलामगिरीचा फायदा मिळत नाहींसा झाला होता.

ह्या संबंधानें मेकाले आपल्या बापास लिहितो, "एकंदर वर्तमान काय घडलें हें जितकें बाहेर आलें आहे, तितकें सगळें वर्तमानपत्रांवरून आपल्यास समजलेंच असेल. ह्याचा जो गुप्त इतिहास आहे तो आपल्यास मि. बक्स्टन ह्याजकडून कळेलच. माझ्याविषयीं ह्मणाल, तर लार्ड आल्थार्प ह्यानें गत रात्रीं मला असें कळविलें कीं, माझा राजीनामा घ्यावयाचा नाहीं असें क्याबिनेटनें ठरविलें आहे. माझ्या सुदैवानें माझी अब्रू आणि माझी नेमणूक हीं दोन्ही मला सुरक्षित ठेवतां आलीं आहेत; आणि गुलामगिरी विरुद्ध खटपट करणारे, आणि माझे व्हिगपक्षीय मित्र, ह्यां पैकीं एकालाहि राग येण्यासारखें माझ्या हातून कांहीं घडून आलें नाहीं. सारांश, प्रामाणिकपणा हीच उत्तम नीति होय, असें ह्मणण्यास मला पहिल्यापेक्षांही आतां ज्यास्त कारण झालें आहे."

ह्या पत्रावर जुलै २७ ही तारीख आहे. पुढच्या आठवड्याच्या त्याच दिवशीं विल्बरफोर्स ह्याला वेस्ट मिन्स्टर आबे (इंग्लंदांतील महा प्रसिद्ध पुरुषांस पुरण्याच्या जागें)मध्यें नेऊन पुरलें. मेकाले लिहितो, "आम्ही त्याला क्यानिंगच्या बाजूला, पिटच्या पायाशीं;

आणि फाक्स व ग्राटन ह्यांजपासून दोन फुटांच्या आंत, पुरलें." ती मेला तेव्हां गुलामगिरीचे दिवस संपले, हें पूर्णपणें ठरलेलें होतें. आगस्टच्या अखेरीच्या अगोदरच पार्लमेंटानें गुलामगिरी बंद करून टाकिली, आणि अशा रीतीनें, ज्या कामीं इतकीं शुद्ध व उदार आयुष्यें खर्चीं पडलीं होतीं, त्या कामास शेवटचा हात दिला. ह्यावेळीं मेकालेच्या अभिनंदनार्थ लिहिलेल्या एका पत्रांत मि. बक्स्टन ह्मणतो, "खरोखर तुह्मांला अत्यानंद मानण्यासारखीच गोष्ट झाली आहे. माझें वास्तविक व विचारपूर्वक असें मत झालेलें आहे कीं, हा इष्ट हेतु साध्य करण्याच्या कामीं तुह्मी जितकी खटपट केली आहे, तितकी दुसऱ्या कोणींच केलेली नाहीं. माझ्याबद्दल ह्मणाल, तर मी मोठ्या आनंदानें कबूल करितो कीं, ह्या सर्व कृत्यांत अथपासून इतिपर्यंत तुह्मीच माझे गुरु आहां, आणि तुमच्याशिवाय माझ्या हातून कांहीं एक झालें नसतें." अशा प्रकारची ह्या माणसांची मति होती; जीं हीं माणसें झगडा चालला होता तोंपर्यंत आरोग्य आणि आराम ह्यांचा पाण्यासारखा खर्च करीत होतीं, तींच जेव्हां विजयाचा दिवस उजाडला, तेव्हां यशाचा जेवढा वांटा मानवी प्रयत्नाचें व आत्मत्यागाचें फळ ह्मणून घेण्यास त्यांस त्यांच्या धर्मीचाहि प्रत्यवाय नव्हता, तेवढा देखील वांटा प्रत्येकीं माझा नाहीं, माझा नाहीं, ह्मणून ह्मणूं लागलीं!

ह्या वेळच्या मेकालेच्या पत्रव्यवहारावरून पुढील गोष्टी व्यक्त होतात. ईस्ट इंडिया बिलाच्या दुसऱ्या वाचनाच्या वेळीं त्यानें जें भाषण केलें, तें अनुभवी व हुशार अशा सभासदांस देखील किती आवडलें हें मागें सांगितलेंच आहे. त्याच भाषणाच्या संबंधानें एक वृद्ध सभासद मेकालेजवळ येऊन त्यास ह्मणाला, "महाराज, आलचें तुमचें भाषण ऐकल्यानें, ज्या तरुण माणसांनीं एडमंड

र्क ह्यानें वक्तृत्व कधींही ऐकिलें नसेल, त्यांचें समाधान होण्यासारखें आहे. "

मागच्या पत्रांप्रमाणें ह्या पत्रांतूनही मेकाले घरीं जाऊन आपलीं पुस्तकें घेऊन आपल्या शेकोटीशीं स्वस्थपणें वाचीत बसण्यास व आपल्या बहिणींशीं गोड गोड गोष्टी करण्यास, अगदीं हपापलेला दिसतो. पार्लमेंताचें हें सेशन फारच लांबलेलें होतें, व मध्यें मध्यें व्हिगपक्षाचा पराभव होण्याचीं चिन्हें दिसत होतीं. त्यांस अनुलक्षून मेकाले ह्मणतो, " तोंडांत केंस अडकला, व तो बाहेर काढूं लागलें, ह्मणजे तो जसा किती तरी लांबच लांब होत जातो, तसें ह्या त्रासदायक सेशनाचें झालें आहे. मला अगदीं कंटाळा आला आहे. . . . . माझें आणि आमच्या पक्षाचें कांहींही होवो; मला हें सेशन संपविण्याबद्दल जितकी उत्कट इच्छा झाली आहे, तितकी माझ्या जाण्याबद्दल किंवा सभासदीबद्दल देखील नाहीं. टोरीपक्षानें यावें व खुशाल सगळें घेऊन जावें. मात्र त्यांनीं मला माझें पेन, माझीं बुकें, माझी उबदार शेकोटी व तूं तिच्या शेजारीं बसून गोष्टी सांगत आहेस , इतकें मला ठेवावें, ह्मणजे पुरे. इ. इ. "

विल्बरफोर्स मेला त्या प्रसंगींचें त्याचें पत्र फारच चटकदार आहे. तो त्यांत ह्मणतो, " विल्बरफोर्सचीं ज्ञानेंद्रियें शेवटपर्यंत काम करीत होतीं, व तो शेवटपर्यंत हुशारींत होता. गेल्या शनिवारीच तो आनंदांत व गोष्टी सांगतांना दिसला. त्यानें कबूल केलें कीं, माझे आजपर्यंत चांगले सुखानें दिवस गेले, व मला आणखी जास्त जगावेंसें अद्यापि वाटतें. " ह्या जगांत प्रेम बसण्यास ज्याला इतकें अल्प साधन होतें, व दुसऱ्या जगावर ज्याचा इतका पूर्ण भरंवसा होता, ज्याचें द्रव्य गेलें होतें, पाठीचा कणा वांकला होता, व पोट सुकून गेलें होतें, त्याला असें वाटावें, हें जरा

चमत्कारिक नाहीं काय ? सद्यःकालीं वेदना भोगाव्या लागत असतां, व भावी सुखाची आशा असतां आपण एवढें ह्या जगाला चिकटून राहतों अशी ही काय मोहिनी आहे ! . . . . . . . . . एक मानवी प्राणी दुसऱ्या मानवी प्राण्याची खरोखर कितीतरी अल्प काळजी करीत असतो ! कोणीही मेला तर त्याबद्दल आपल्यास कितीतरी अल्प चुकल्या चुकल्यासारखें वाटतें ! अगदीं उत्तम व अगदीं शहाण्या अशा माणसांच्या जाण्यानें उत्पन्न झालेली खळी कितीतरी जलद भरून येते ! कॅडोगान प्लेस येथें ठेवलेलें त्याचें शव पाहून जेव्हां मी परत आलों, तेव्हां माझ्या मनांत असा विचार आला कीं, इतर माणसें येथून निघून गेलीं ह्मणजे आह्मी जो आपलपोटेपणा व्यक्त करितों, त्यावरून आपण गेलों ह्मणजे इतरांस आपल्याबद्दल किती अल्प वाईट वाटेल, ह्याचा अंदाज सहज होतो. मला वाटलें, जर मी उद्यां मेलों, तर ज्या श्रीमान् लोकांशीं मी प्रत्येक आठवड्यास जेवीत असतों, त्यांपैकीं एक असामीही, पुढच्या मेजवानीच्या प्रसंगीं, जेथें मला त्यांजबरोबर बोलाविलें आहे तेथें,–एक घांस देखील कमी जेवणार नाहीं, किंवा शांपनेचीं ग्लासें झोंकीत असतां स्त्रियांकडे पाहून जरा देखील कमी आनंदानें हंसणार नाहीं. आणि माझेंही या कामांत असेंच मत आहे. ह्या जगांत अशीं दहा देखील माणसें नाहींत कीं, ज्यांच्या मरणामुळें मला माझें जेवण गोड लागणार नाहीं; पण अशीं मात्र एक दोन माणसें आहेत कीं, ज्यांच्या मरणानें माझें हृदय फुटून जाईल. जितका जितका जगाचा मला जास्त अनुभव येत आहे, जितक्या जितक्या माझ्या ओळखी वाढत आहेत, तितकें तितकें माझें प्रेम जास्त जास्त निरुंद आणि जास्त जास्त आकुंचित होत जात आहे. इ. इ."

पण सर्वांत महत्वाचें पत्र हें होतेंः—" नवीन इंडिया बिलाचें एक कलम असें आहे कीं, हिंदुस्थानचा कारभार करण्यासाठीं जें सुप्रीम कौंसिल नेमिलें आहे त्याचा एक सभासद, जे कंपनीचे नोकर नाहींत अशांपैकीं कोणी तरी निवडावा. बहुधा असा संभव दिसतो, किंवा बहुतेक असें ठरल्यासारखेंच झालें आहे कीं, मी पत्करिल्यास ती जागा मला देणार.

" ही जागा फार फायद्याची आहे. ती अत्यन्त मानाची व महत्वाची आहे. तिचा वर्षाचा पगार दहा हजार पौंड आहे. कलकत्त्याची ज्यांना पुरी माहिती आहे, व त्या इलाख्यांत जे अगदीं श्रीमंत कुटुंबांमध्यें मिसळणारे होते, व मोठ्या हुद्याच्या जागा करीत होते, अशीं माणसें मला खात्रीपूर्वक असें सांगतात कीं, तेथें मला पांच हजारांमध्यें मोठ्या भपक्यानें राहतां येईल, व बाकीचा पगार व त्यावरील व्याज मागें टाकतां येतील. सारांश, अशा रीतीनें वयाच्या ३९ व्या वर्षी ऐन उमेदींत पस्तीस हजार पौंड खिशांत टाकून, मला इंग्लंदास परत येतां येईल. यापेक्षां जास्त संपत्तीची इच्छा मीं कधीं केलेली नाहीं.

" मला पैशाची फार आवड नाहीं, व त्याबद्द काळजीही नाहीं. पण दिवसानुदिवस जरी मला संपत्तीची उत्कंठा कमी कमी होत आहे, तरी ज्या ज्या माणसाला मोठें होण्याची किंवा दुसऱ्यांच्या उपयोगी पडण्याची इच्छा असेल, त्यांच्यापाशीं खाऊन पिऊन पुरेशी संपत्ति असणें किती जरूर आहे, हेंही दिवसानुदिवस मला ज्यास्त ज्यास्त स्पष्टपणें कळून येत आहे. हल्लीं माझी स्वच्छ अशी स्थिति आहे कीं, जोंपर्यंत मला नोकरी आहे, तोंपर्यंतच मला सार्वजनिक कामांत पडतां येईल. जर मी माझी सरकारांतील नोकरी सोडली, तर मला लागलीच पार्लमेंटांतीलही जागा सोडिली

पाहिजे. कारण मला अगोदर जगलें पाहिजे, आणि मला उदरनिर्वाहाचें साधन काय तें माझें पेन; आणि सभ्यरीतीनें राहतां येईल इतका पैसा मिळविण्याइतकें लिहिणें, आणि राज्यकारणांत आंग मोडून काम करणें, ह्या दोन्ही गोष्टी कोणासही साधणें शक्य नाहीं. ह्या सेशनामध्यें एडिंबरो रिव्ह्यूला एकही ओळ मला पाठवितां आली नाहीं; आणि जरी मला नोकरी नसती, तरी माझ्यानें फारसें लिहवलें नसतें. एडवर्ड बुल्वर ह्यानें ' न्यू मंथ्ली मागाझीन ' हें मासिक पुस्तक नुकतेंच सोडून दिलें; आणि तें ह्या मुद्यावर कीं, तें चालविणें आणि पार्लमेंतांतील आपली कामगिरी बजावणें, ह्या दोन्ही गोष्टी साधत नाहींत. कॉबेट ह्यास आपल्या ' रजिस्टर ' कडे इतकें दुर्लक्ष करावें लागत आहे कीं, त्याची विक्री बहुतेक बंदच पडल्यासारखी झाली आहे. आतां, सभ्य गृहस्थाप्रमाणें जर मला रहावयाचें असेल तर हल्लीं मी लिहितों तसें लिहून चालावयाचें नाहीं; तर नियमानें व कदाचित् रोजच्या रोज देखील, लिहिलें पाहिजे. माझ्या लेखणीच्या बळावर आजपर्यंत वर्षाची दोनशेंहून जास्ती रकम मला कधींच मिळालेली नाहीं. मला जर सुखानें रहावयाचें असेल तर वर्षाचे पांचशेंहून कमी पौंड कधीं पुरावयाचे नाहींत. आणि बहुधा मला स्वतः व्यतिरिक्त आणखी पुष्कळांचें पोषण करावें लागेल, असा संभव दिसतो. आपल्या कुटुंबाची भावी स्थिति पूर्वीपेक्षांही जास्त निराशेची दिसते.

" बरें, इकडे राजकीय कामासंबंधींही माझी भावी स्थिति काळजीचीच आहे. प्रधानमंडळांत दुफळी होण्याचा रंग दिसत आहे. ... ...त्यांचें सर्वांचें एक मत होईनासें झालें आहे. मी तुला अंधदीं मनःपूर्वक सांगतों, माझी सध्याची नोकरी आणखी

सहा महिने देखील चालण्याचा संभव इतका अल्प आहे कीं, मला कोणी पन्नास पौंड रोख दिले, तर मी तेवढ्याला ती खुशीनें विकून टाकीन. जर मी असाच नोकरीवर राहिलों, तर मला अशी भीति वाटते कीं, माझी राजकारणांत जी आज अब्रू आहे, ती मात्र गमावेल. बरें जर मी आपली जागा सोडून दिली व विरुद्ध पक्षास जाऊन मिळालों, तर गेल्या तीन वर्षांत जे मी खासगत संबंध जोडिले आहेत, त्यांपैकीं बहुतेक तोडावे लागतील. इंग्लंदांत कांहीं काळपावेतों, गरिबी, अप्रियता आणि जुन्या संबंधाची ताटातूट ह्याशिवाय मला माझ्या पुढें कांहीं दिसत नाहीं.

"ह्या सर्व अडचणींतून सुटण्याचा जर मार्ग नसता, तर मी धैर्यानें त्यांना तोंड दिलें असतें. कोणाही माणसास सभ्यपणानें व प्रामाणिकपणानें वागतां येणें नेहमींच शक्य आहे; आणि मी जरी फ्लीट प्रिझनमध्यें असलों, तरी देखील मला प्रत्यक्ष दुःख होऊं नये, असा बंदोबस्त करण्याइतकीं मानसिक साधनें मजपाशीं आहेत. पण ह्या संभाव्य धोक्यांतून पार पडण्याचा मार्ग असेल, तर तो स्वीकारण्याची मला इच्छा आहे. ही जी जागा मला बहुतकरून मिळण्याचा संभव आहे, ती जर मी पत्करिली, तर एथें जे दुफळ्या होऊन तंटे सुरू झाले आहेत, त्यांतून मी कांहीं वेळ सुटेन. मी जेव्हां परत येईन, तेव्हां सर्व गोष्टी सुस्थित झालेल्या असतील, राजकीयपक्षांचे नवे मेळ बसलेले असतील, आणि नव्या प्रश्नांची चर्चा सुरू झाली असेल. नंतर एकदम कोणताहि पक्ष सोडल्याचा किंवा पूर्वींहून निराळें वर्तन केल्याचा आरोप शिरावर न घेतां, पाहिजे तसा वर्तनक्रम अनुसरण्यास ठीक पडेल, इकडे माझ्या कुटुंबाचें विपत्तीपासून मला संरक्षण करतां येईल; आणि मी परत येईन, तेव्हां प्रामाणिकपणानें पोटापाण्याची व्यवस्था करून येईन, किंवा

इतका श्रीमंत होऊन येईन कीं जणूं काय मी नार्दंबर्लंडचा ड्यूक, किंवा वेस्ट मिन्स्टरचा मार्किसच आहें! आणि मला योग्य कर्तव्याच्या मर्यादेंतून ढळण्याचा तीळभरहि मोह न होतां प्रत्येक सार्वजनिक प्रश्नाच्या संबंधानें वागतां येईल. हिंदुस्थानांत असतांना जीं कामें मला करावीं लागतील, तीं मोठ्या श्रमांचीं नसून अत्यन्त सन्मान्य अशीं असणार. त्या देशांत जें जें सुख किंवा जो जो भपका मिळण्यासारखा आहे, त्याचा उपभोग मला घेतां येईल; बरें, माझ्या मित्रांला किंवा एथल्या लोकांना माझा विसर पडून जावा इतके दिवस मला तेथें रहावें लागेल, असेंहि नाहीं.

"मी आज जें तुला लिहिलें आहे, तें लार्ड ग्रे, दोघे ग्रांट बंधु, स्टुअर्ट म्याकेंझी, व जॉर्ज बाबिंगटन, एवढ्यांनाच माहीत आहे. च्यार्लस ग्रांट आणि स्टुअर्ट म्याकेंझी यांना राजकीय पक्षांची जेवढी माहिती आहे तेवढी दुसऱ्या थोडक्यांनाच असेल; त्याचें मत असें आहे कीं, ही जागा जर मी नाकारिली, तर माझा वेडेपणा होईल; आणि तूं गेल्यानें जरी आह्मास फार चुकल्यासारखें होणार आहे, तरी असें आमचें मत आहे, असें ते मला सांगतात; आणि ते सांगतात तें मनःपूर्वक सांगतात अशी माझी खात्री आहे. पण मला किती वाईट वाटणार आहे ? आणि एथून निघून जाणें हें जरी शहाणपणाचें काम आहे, व माझें कर्तव्य आहे असें जरी मी समजतों, तरी माझा देश व माझें कुटुंब ह्यांच्यावर माझें इतकें प्रेम असतां हा वियोग माझ्यानें कसा सहन करवेल ? माझा हा काल समाधानाचा व सुखाचा होणें किंवा न होणें हें तुझ्यावर अवलंबून आहे. ही जागा माझ्या अंदाजाप्रमाणें जर मला देऊं लागले तर तूं माझ्याबरोबर येशील किंवा नाहीं ? तुला मी केवढा त्याग करावयास सांगतों आहें हें मी जाणून आहें. कांहीं काळ पावेतों तुला

किती लाडकीं व मोलवान् बंधनें तोडावीं लागतील हें मी समजून आहें. हिंदुस्थानच्या दरबारांतील भपका, आणि ज्या लकलकीत मंडळापैकीं तूं एक अग्रगण्य बाई बनून जाशील, त्यांचे आनंदोत्सव ह्यांच्या मोहांत तूं पडणार नाहींस हें मला माहित आहे. तेव्हां तुझें मन वळवावयाचें तर एवढें सांगूनच वळण्यासारखें आहे कीं, तूं जर माझ्या बरोबर आलीस, तर हल्लीं मी तुजवर जितकें प्रेम करितों त्यापेक्षां साधल्यास, ज्यास्त प्रेम करावयास लागेन.

" जार्ज बार्विंग्टन यास तुझ्या आणि माझ्या प्रकृति संबंधानें विचारून ठेविलें आहे. तो असें ह्मणतो, तुझ्याविषयीं मला बहुतेक मुळींच शंका वाटत नाहीं, व ह्यांविषयीं तर मुळींच वाटत नाहीं. खरोखर, त्याचें एकदरींत असेंच मत दिसतें कीं तेथील हवेपासून तुला जितका त्रास होण्याचा संभव आहे, तितकाच फायदा होण्याचाही आहे.

" हें सर्व अगदीं अगदीं गुप्त आहे. तुला वाटेल तर हें पत्र मार्गारेटला दाखविण्याची परवानगी आहेच; आणि मार्गारेटनें पाहिजे तर एडवर्डाला सांगावें; कारण नवऱ्यांच्या कायदेशीर अधिकाराविरुद्ध गुप्त तट मी कधीं करीत नसतों. पण ह्यांच्या पलीकडे मात्र ही गोष्ट जातां कामा नये. बाबाला मी स्वतः कळविण्यापूर्वी ही गोष्ट जर दुसऱ्याकडून कळली तर त्याला वाईट वाटेल, व वाटावें हें अगदीं रास्तच आहे. आणि ह्यासंबंधानें जर किंचित्हि बातमी बाहेर फुटली, तर लीड्स येथील लोकांच्या संबंधानें माझी स्थिति अगदीं कशीशीच होऊन जाईल. इंडिया 'आफिसमध्यें ह्या नेमणुकीसंबंधानें अडचणी उत्पन्न होण्याचा जरी फारसा संभव नाहीं, तरी मुळींच नाहीं असें नाहीं. ह्मणून डिरेक्टर लोकांनीं निवड करण्याच्या, व राजानें ती पसंत करण्याच्या अगोदर, ज्याला ही गोष्ट

आर्धीच गुप्तपणें कळविलेली नाहीं, अशा कोणाशींहि त्यासंबंधानें अवाक्षरहि बोलण्याचा माझा इरादा नाहीं.

"आणि आतां मी लिहिलें आहे ह्याचा शांतपणें विचार कर. तुला आपला निश्चय करण्यास पूर्ण वेळ मिळावा असें जर मला वाटलें नसतें तर ही गोष्ट पूर्णपणें ठरे तोंपर्यंत तिजसंबंधीं मीं तुलाहि लिहिलें नसतें. हिंदुस्थानची जर तुला असह्यच ओकारी येत असेल, तर माझ्या गैरहजिरींत इंग्लंदांतील तुझी वसति समाधानाची करण्यास, व इतरांचे उपकार घेण्याच्या ऐवजीं इतरांवर तुला उपकार करतां यावे अशी तुझी स्थिति करण्यास, मी होईल तेवढी तजवीज करून ठेवीन. पण माझ्या आयुष्यांतील ह्या आणीबाणीच्या प्रसंगीं जर माझी लाडकी ताई, मजवरच्या तिचा प्रेमाचा जो पुरावा—जो दुःखकारक व त्रासदायक पुरावा–मी मागत आहें, तो मला देईल, तर मला वाटतें त्याबद्दल तिला पस्तावा करावा लागणार नाहीं. तिला जीं जीं प्रेमाचीं वाटतात, अशा बऱ्याच माणसांपासून कांहीं वर्षे दूर राहिल्यानें जें तिचें नुकसान होणार आहे, तें जर ज्यास ती आपल्या प्राणापेक्षांहि ज्यास्त प्रिय वाटते अशाच्या अमर्याद विश्वासानें व प्रेमानें, भरून येण्यासारखें असेल, तर ती खचीतच पस्तावा पावणार नाहीं.

"अहारे माझी लाडकी मार्गारेट! तिला ह्याबद्दल फार वाईट वाटेल. माझ्या लाडक्ये, तिचें मत घे, आणि तिची उत्तम समजुत व आपणविषयीं दाट प्रेम ह्यांच्या योगानें जी सल्ला मसलत ती देईल तिचा फायदा आपण दोघेंहि घेऊं या. फार फार उशीरां ह्मणजे पुढच्या सोमवारीं मी तेथें येईन अशी माझी अटकळ आहे. हल्लींच्या स्थितींत आमचा स्काटलंदांतील प्रवास (तिला तो पार्लमेंत उठल्यावर त्या देशीं घेऊन जाणार होता) आंखूड करावा लागेल. नाताळच्या

सुमारास नव्या कौंसिलरानें इंग्लंदास रामराम ठोकावा, हें बरें दिसेल. हिंदुस्थानांतील त्याच्या कामास एप्रिलांत सुरवात होते. इ. इ."

हें पत्र लंदनाहून १७ आगष्ट १८३३ रोजीं त्यानें लिहिलें होतें, व अर्थात् तें आपली बहीण हाना हीस लिहिलें होतें. तें त्यानें लिहिलें त्या वेळीं त्याच्या मनाची स्थिति निरनिराळी व विलक्षण झालेली होती हें उघड दिसतें; व तें त्याच्या बहिणीनें वाचलें तेव्हां तिचेंहि अंतःकरण सद्गदित झालें असेल व तिला आश्चर्य वाटलें असेल, ह्यांत शंका नाहीं. हल्लीं त्या लोकांस हिंदुस्थान जितकें परिचित झालेलें आहे, तितकें त्या वेळीं नव्हतें. हल्लीं जशी पार्लमेंटचें सेशन संपल्याबरोबर मंडळी इकडे धांव घेते, व पुढेंच सेशन सुरू होण्याच्या वेळापर्यंत सर्व हिंदुस्थानास प्रदक्षिणा करून परत विलायतेस जाते, असें तेव्हां नव्हतें. हल्लीं जशी सिमला किंवा कलकत्ता येथील कौंसिल सभेंत जें आज संध्याकाळीं ठरेल त्याची चर्चा उद्यां सकाळच्या न्याहारीच्या प्रसंगीं विलायतच्या लोकांस करतां येते, तशी तेव्हां करतां येत नसे. ज्या गांवढे गांवांतील भटाभिक्षुकांच्या कुटुंबांना व मध्यम स्थितीच्या गृहस्थांना होतकरू मुलास हिंदुस्थानांत नोकरी मिळाली तर बरीच म्हणून हल्लीं वाटते, त्यांनाच साठ वर्षांपूर्वी हा देश म्हणजे कोठचा कोना कोपऱ्यांतला, व रोग आणि मृत्यु ह्यांचें माहेर-घरें म्हणून वाटे. ज्या मुलीनें वेल्सच्या पलीकडे परदेश पाहिला नव्हता, किंवा मर्सी नदीपेक्षां ज्यास्त रुंद किंवा वादळी अशा जलसंचयांतून कधीं प्रवास केला नव्हता, तिला ज्या जलप्रवासाला कदाचित् सहा महिनेहि लागतील त्याचा विचार मनांत येऊन किती काळजी वाटली असेल ह्याची, ज्यांना हल्लीं डोव्हरहून मुंबईस येण्यास त्याच्या निम्मेही आठवडे लागत नाहींत त्यांना कल्पनाही करण्यास मारामार पडेल. अशा स्थितींत लाडक्या प्रिय नातेवाईकांना सोडून निघावयाचें म्हणजे खरोखरच त्यांचा शेवटचा निरोप

घेण्यासारखें असे; ज्याना आपण आज सोडून जात आहों त्यांपैकीं परत आल्यावर आपल्या दृष्टीस किती पडणार नाहींत, हें जर मेकाले व त्याची बहीण ह्यांस अगोदर कळलें असतें, तर केवळ्याहि ऐहिक फायद्यासाठीं त्यांनीं स्वदेशाचा किनारा सोडला असता कीं काय हा प्रश्नच आहे. पण ह्यानाची स्वकर्तव्याची कल्पना इतकी बळकट होती कीं, ह्या शंकांना व भीतींना ती डग-मगली नाहीं; आणि ज्या स्वदेशत्यागास तिचा भाऊ तिच्या विना तोंड देण्यास कधीं तयार झाला नसता, तो स्वदेशत्याग त्या-बरोबर अनुभवण्यास ती कबूल झाली. तो तिचा निश्चय ऐकून नि-श्चित होत्साता मेकाले सेशन संपल्याबरोबर लिव्हरपूलला निघून आला; आणि आपणा दोघांना वाचण्यासाठीं होरेस वालपोलचीं पत्रें आणि आपल्यालाच वाचण्यासाठीं स्मालेटचे ग्रंथ बरोबर घेऊन, तिला एडिंबरो दाखविण्यासाठीं पोष्टाच्या तांग्यांत घालून चालता झाला. आक्टोबरच्या पूर्वी बोर्ड आफ कंट्रोलपुढें येऊन तो पुन: हजर झाला, आणि त्याचा पत्रव्यवहार पूर्वीपेक्षांही ज्यास्त वरचेवर, व ज्यास्त व्यावहारिक पण कदाचित् कमी विनोदी असा पुन: सुरू झाला.

ह्या त्यांच्या पत्रव्यवहारांत पुढील गोष्टी विशेष महत्वाच्या आहेत. ह्या वेळेस त्यानें वर सांगितलेल्या होरेस वालपोलच्या पत्रांवर टीका-त्मक एक लेख रिव्ह्यूसाठीं तयार केला होता, याविषयीं तो ह्मणतो; मी होरेस वालपोलवरचा निबंध आताच पुरा केला; माझ्या आयु-ष्यांतील सुखाच्या क्षणांपैकीं हा एक आहे. एक त्रासदायक काम पुरें झालें आहे. माझ्या मनावरचें एक ओझें निघाल्यासारखें झालें आहे. जर तो मला तुलाच वाचून दाखवावयाचा असता तर मला फार आनंद वाटला असता, पण तो नेपियरकडे एकदम गेलाच पाहिजे; हें पत्र मीं संपविलें कीं लागलेच मी तो आपल्या सुंदर हातांनीं मोठ्या पोष्टांत नेऊन टाकीन. त्याच्यावर शेवटचा हात मारण्यासाठीं

मी आज पहांटेस चार वाजतां उठलों. इतर लोकांच्या लेखांबद्दल माझा व इतर बहुजनांचा पुष्कळ वेळां मतभेद पडतो, व माझ्या स्वताच्या लेखांबद्दल तर त्यापेक्षांहि ज्यास्त वेळां पडतो. आणि ह्मणून माझें मत कदाचित् चुकीचें असेल; पण मला वाटतें हा लेख फार उत्तम वठेल. पाहूं आपण काय होतें तें. पहिला अर्धा लेख तयार करण्यास मला फारच श्रम पडले; आणि दुसरा अर्धा मी फार सफाईनें लिहून टाकिला, आणि तोच मला फार आवडतो. इ. इ.

ह्या पत्रांवरून असें दिसतें कीं, प्रधानमंडळींच्या मनांत ही कौंसिलरची जागा ह्याला देण्याविषयीं जरी फार होतें, तरी कंपनी-च्या कांहीं डिरेक्टरांच्या मनांत नव्हतें. त्यांची अशी समजूत झालेली होती कीं, इंडिया बिल तयार करते वेळीं हा आपल्याला फार प्रतिकूल गेला. ह्याच्या विरुद्ध मुख्यत: कंपनीचे चेअरमन व व्हाइस चेअर-मन होते, पण ते इतक्यांत बदललें व नवे अधिकारी ह्याला अनु-कूल असेच आले. ह्यामुळें त्याला ही जागा मिळेल किंवा नाहीं ह्या-बद्दल मुळींच शंका राहिली नाहीं.

त्यानें निघण्याच्या अगोदर एडिंबरो रिव्ह्यूच्या संपादकाशीं अशी व्यवस्था करून टाकिली कीं ह्यापुढें हिंदुस्थानांत असतां तो जो लेख लिहील त्याबद्दल संपादकानें रोकड पैसे न देतां त्यास वाटतील तीं नवीं नवीं उत्तम पुस्तकें पाठवून द्यावीं. ह्या त्याच्या सूचनेसंबंधानें नेपियरानें जुना संपादक जेफ्री याचा सल्ला विचारिला. त्यानें लागलेंच त्यास असें कळविलें की मेकालेची सूचना अगदीं योग्य आहे, व ती कबूल करणें हें संपादकाच्या फायद्याचेंच आहे.

हा जाणार ह्याबद्दल ह्याच्या मित्रांसच नव्हे तर प्रधानमंडळीसहि फार वाईट वाटलें; कारण त्याची पार्लमेंतांत व राज्यकारभारांत रिकामी झालेली जागा भरून काढणें फारच कठीण होतें; तथापि

त्यांनीं त्यास खुशीनें निरोप दिला, कारण त्याच्या योग्यतेनुरूप त्यास किफायतीची जागा देण्याचें या वेळीं त्यांच्या हातीं नव्हतें; आणि मनुष्य कितीही हुशार असला तरी तो जर घरचा खाऊन पिऊन सुखी नसेल तर त्यास पार्लमेंतांत स्वतंत्रपणें काम करणें किती कठीण पडतें, एकाद्या प्रसंगीं त्यानें विशिष्ट वर्तन केलें असतां तें प्रधानास खुश करण्याकरितां व आपली नोकरी कायम राखण्यासाठीं, किंवा एकादी मोठी जागा पटकवण्यासाठींच केलें असेल, असें लोकांस वाटण्याचा किती संभव असतो, ह्या सर्व गोष्टी त्यांस अवगत होत्या, ह्मणून ते त्याच्या आड आले नाहींत; उलट त्यांनींच ही जागा त्यास दिली असें ह्मटल्यास चालेल.

त्याच्या मित्रांपैकीं त्याच्या जाण्याबद्दल ज्यास अत्यन्त वाईट वाटलें तो एलिस होय; व तो जाणार हें पाहून जिनें आपणास अत्यन्त वाईट वाटलेंसें दाखविलें ती लेडी हॉलंड होय. होरेस वालपोलावरील निबंधांत त्यानें त्याजवर जो चांगला चाबूक ओढिला होता त्याबद्दल तीस वाईट वाटलें होतें, कारण तो हालंड घराण्याचा फार जुना मित्र होता; तथापि जेव्हां तो तिचा निरोप घ्यावयास गेला, तेव्हां तिनें मोठा 'सीन'च केला. मेकाले ह्मणतो, " तीस वर्षांपूर्वीं ती जितकी तरुण व सुंदर होती, तितकी जर आजामितीस असती तर तिनें मला वेडच लाविलें असतें; माझ्या जाण्याबद्दल ती अगदीं वेड्यापिशासारखें करूं लागली; तिनें माझे इतके गोडवे गाईले कीं ते मला एथें सांगण्याची देखील लाज वाटते; ती रडली, बडबडली, मला लाडक्या, लाडक्या मेकाले ह्मणून ह्मणाली. मला सर्व समजलें; तूं आपल्या कुटुंबाला बळी जात आहेस. तूं त्यांचें फारच देव्हारें करितोस. ते तुझा नेहमीं फायदा घेतात; गेल्या सेशनांत गुलामांच्या संबंधानें त्यांनीं तुझा फायदा घेतला; व आतां तुला हिंदुस्थानांत पाठवीत आहेत ! " लेडी हालंडशीं प्रसंग आला ह्मणजे

मी तीन कारणासाठीं नेहमी आपला राग आवरीत असतों; ती स्त्री आहे हें एक कारण; तिची प्रकृति व तिची एकंदर परिस्थिति ह्या-संबंधानें ती फार दुःखी आहे हें दुसरें; व ती मजवर लरोलरच माया करिते हें तिसरें. पण शेवटीं ती तुला (हाना हिला) अनु-लक्षून कांहींसें बोलली; तें माझ्यानें सहन करवेना; आणि रागानें कंप भरलेल्या अशा स्वरानें मीं उत्तर देण्यास सुरवात केली होती, इतक्यांत ती पुनः बडबडूं लागली. "मी तुशी क्षमा मागतें! लाडक्या मेकाले, मला क्षमा कर. मी फार फाजीलपणा केला; मला माहीत आहे, तूं मला क्षमा करशील. तुझ्या सारखा (चांगला) स्वभाव कोणाचाच नाहीं, मी असें शंभरवेळां ह्मटलें आहे. आज संध्याकाळींच आलेनपाशीं (तिच्या हातचीं नेहमी पुष्पें खाणारा एक निगरगट्ट भोजनभाऊ) असें ह्मटलें. मला खात्री आहे कीं, हें माझें व्यंग तेवढें तूं सहन करशील. मी तुला पुनः बघण्यास जगत नाहीं!" ती रडली, आणि माझा राग निवाला; मी असें ऐकतों कीं, ह्या कामीं ती माझ्याशींच असें वागली असें नाहीं. मला जाऊं देण्याबद्दल ती प्रधानांवर देखील अशीच पिसाळते. माझ्या कानीं असें आलें आहे कीं, एकदां भोजनसमयीं ती इतकी रागांत आली कीं, माझ्यापेक्षां इतक्या थंड स्वभावाचा जो लार्ड हालंड त्याला देखील आत्मनियंत्रण करवेनासें झालें, आणि तो रागानें ह्मणाला, अग, असें भलभलतेंच कांहीं बोलूं नको. काय ग असें ह्मणतेस हें! एकाद्या गृहस्थाच्या स्नेहावर आपला थोडासा हक्क असला ह्मणून, त्यानें संध्याकाळचें येऊन तुझ्याशीं गप्पा सांगत बसावें एवढ्यासाठीं स्वतंत्रपणानें उदरनिर्वाह करण्याचें साधन मिळविण्याची एकाद संधि त्यास आली असतां, ती दे घालव, असें आपणास त्यास सांगतां येईल काय? "इ. इ."

आणखीं एक ह्या वेळचें त्याचें विशेष महत्वाचें पत्र आहे तें लार्ड लाण्ड्सडौन ह्यास लिहिलेलें होय. त्यामध्यें आपण ही जागा कां पत्कारितों ह्यांचीं कारणें त्यानें सविस्तर दिलीं आहेत; तीं हाना मेकालेला लिहिल्या पत्राच्याच धोरणावर सरासरी आहेत, ह्मणून तीं एथें सांगत नाहीं. पण शिवाय लार्ड लाण्ड्सडौननें ह्याला कौन येथील सभासदाची जागा मिळविणाच्या कामीं मदत करून ह्यास लहान वयांतच कसें पुढें आणिलें, व त्यामुळेंच आजची स्थिति त्यास कशी आली, हें त्या पत्रांत फार कृतज्ञतापूर्वक त्यानें कबूल केलें आहे.

१८३४ च्या फेब्रूवारीच्या ४ थ्या तारखेस त्यानें आपल्या लीड्स येथील मतदारांचा निरोप घेतला. तथापि त्याचा पार्लमेंताशीं संबंध अद्यापि तुटला नव्हता. ह्या महिन्याच्या पहिल्या मंगळवारीं पार्लमेंत भरलें. दुसऱ्या दिवशीं सेशन झाल्यापासून ज्यानें एवढ्या अवधींतच दोन भाषणें करण्याची संधि साधून घेतली होती, तो ओकॉनेल मधल्या सुटीच्या दिवसांत हलचा प्रतिनिधि मि. हिल ह्या कांहीं बोलला होता तें सभेपुढें आणण्यासाठीं तिसऱ्यानें उठला. या गृहस्थाला आपल्या मतदारांना सांगण्यास दुसरें कांहीं अधिक चांगलें न सुचल्यामुळें ती त्यांस असें बोलून गेला होता कीं एक ऐरिश सभासद, जो कोअर्शन बिलाच्या (कायद्याच्या जोरावर देशांत शांतता राखण्याचें बिल) प्रत्येक भागाविरुद्ध मोठ्या दांडगाईनें बोलला होता, व ज्यानें त्या बिलाच्या प्रत्येक कलमाविरुद्ध आपलें मत दिलें होतें, तो प्रधानांकडे जाऊन ह्मणाला: "ह्या बिलाचा एक अणुहि काढून घेऊं नका, नाहीं तर ऐर्लंदांत एका माणसाला देखील राहतां यावयाचें नाहीं." ह्या भाषणासंबंधानें प्रधानांचा प्रतिनिधि या दृष्टीनें ओकॉनेलनें लार्ड आल्थार्प यास असें हटकून विचारिलें कीं, हिल साहेबाच्या ह्या ह्मणण्यांत काय तथ्य आहे

तें सांगा. लार्ड अल्थार्प घाबरून जाऊन त्या क्षणीं जी त्याला स्फूर्ति झाली तदनुरूप त्यानें ह्या प्रसंगीं वर्तन केलें; ती स्फूर्ति अशी होती कीं, ओकॉनेल आणि त्याचें प्रसिद्ध शिष्यमंडळ ह्यांच्या तडाक्यांत गरीब मि. हिल यास होतां होई तोंपर्यंत देऊं नये. ओकॉनेलनें ह्मटलें तशाच प्रकारचा निश्चित व ठरीव शब्द प्रधानापाशीं कोणी येऊन बोललेला नाहीं. असें सांगून, हे लार्ड साहेब आणखी असें बोलून गेले कीं, कांहीं ऐरिश सभासद उघड उघड ज्या प्रकारचीं भाषणें करितात, त्यापेक्षां "भिन्न विचार त्यांच्या खाजगी संभाषणांत येत असतात; असें मानण्यास मला चांगला आधार आहे, असें जर मी ह्या प्रसंगीं प्रसिद्धपणें सांगितलें नाहीं, तर मी आपलें कर्तव्य केल्यासारखें होणार नाहीं."

हे त्याचे शब्द मोठ्या उदार बुद्धीचे पण मोठ्या वेडेपणाचे होते. ओकॉनेल लागलाच उठला, व त्यानें त्यास विचारिलें कीं, तुह्मी ज्या ऐरिश सभासदांना अनुलक्षून बोललां, त्यापैकीं मी एक आहे कीं काय? आणि लार्ड साहेबांनीं आश्वासनपूर्वक त्याला उत्तर दिलें कीं 'नाहीं.' इतक्यांत स्पीकरनें तें प्रकरण तेथच्यातेथेंच विझविण्याचा प्रयत्न केला. पण तें अगोदरच बेताबाहेर गेलेलें होतें. ह्मणून निरनिराळे ऐरिश सभासद एकामागून एक उठले, व त्यांनींहि आपापल्यासंबंधानें तोच प्रश्न केला, व तेंच उत्तर त्यांस मिळालें. शेवटीं शील उभा राहिला, व त्यानें असा प्रश्न केला कीं, ज्या सभासदांना अनुलक्षून आपली सरदारसाहेबांची स्वारी बोलली, त्यांपैकीं मी एक आहे कीं काय? लार्ड अल्थार्पनें उत्तर केलें. "होय. आपण त्यांपैकीं एक आहां." शील ह्यानें "आपला देश व आपला देव यां समक्ष" असें सांगितलें कीं, ज्या माणसानें सरदारसाहेबांना अशी बातमी दिली असेल त्यानें

'शुद्ध खोटें व निर्लज्जपणाचें भाषण' केलेलें आहे. व तो आणखी असें ह्मणाला कीं, हा आरोप खरा करून दाखविण्याचें सरदारसाहेबांनीं आपल्या शिरावर घेतलें आहे, अशी त्यांच्या भाषणावरून माझी समजुत झालेली आहे. नंतर मग कामन्ससभेंत असा कांहीं ' सीन ' उठाला कीं तो त्या सभेस अत्यन्त लाजिरवाणा होय; सगळे फाजील शहाणे, आपल्या ब्रीदास अनुसरून, पुढें घुसले; आणि न शोभणाऱ्या, न समजणाऱ्या, व कधींच संपावयाची नाहींशी भासणाऱ्या हमरीतुमरींत तासामागून तास निघून जाऊं लागले. स्पीकरसाहेबांनीं शीलला असें आश्वासन देण्याविषयीं आज्ञा केली कीं, सभागृहाच्या बाहेर हा तंटा मी नेणार नाहीं. त्यानें ही गोष्ट कबूल करण्याचें नाकारिलें, आणि त्याला शिस्तीप्रमाणें सार्जंट ऍट आर्म्स ह्याच्या ताब्यांत लागलेंच दिलें. नंतर स्पीकरसाहेब लार्ड अल्थार्पकडे वळले, व त्याकडून त्यांनीं तेंच आश्वासन मागितलें. त्यानें पार्लमेंतास शोभेल अशा भाषेनें, मी शील यास द्वंद्वयुद्धास आव्हान करणार नाहीं ह्मणून वचन दिलें. इतकें झाल्यावर हान्सार्डमध्यें (पार्लमेंतांतील संभाषणाच्या वगैरे एकंदर बातम्या ज्यांत दिल्या असतात अशी पार्लमेंताच्या अधिकाराखालीं प्रसिद्ध होणारी त्याच्या कृत्यांची बखर ) सरळ भाषेंत पण हुबेहुब रीतीनें वर्णिलें आहे त्याप्रमाणें " मि. ओकॉनेल हा शेजारीं बसणाऱ्या सभासदास कांहीं बोलला, तें पुष्कळ सभासदांस ऐकूं आलें नाहीं. लार्ड आल्थार्प लागलांच उठला, आणि मोठ्या टाळ्यांच्या गजरांत व बऱ्याच रागानें त्यास अनुलक्षून असें विचारिता झाला कीं, प्रस्तुत सभासदानें जे हावभाव आतां केले, त्यांचा अर्थ काय ! त्याचें ओकॉनेलनें उत्तर दिल्यावर, सरदारसाहेब पुनः अशा कांहीं शब्दांचा उपयोग करते झाले कीं, त्यांचा असा स्पष्ट अर्थ झाला कीं, ओकॉनेलला ' आव्हान ' करण्याचें जरी आपणास कारण

दिसत नाहीं, तरी त्यानें आव्हान केल्यास तें नाकारण्याचाहि आपला इरादा नाहीं. यामुळें सरदारसाहेबहि सार्जंटाच्या स्वाधीन झाले. तथापि इतर सभासद जेवण्यास उठण्याच्या पूर्वी त्यांच्या कानावर अशी वार्ता आली कीं, आपल्या हद्दी सोबत्यांनीं स्पीकराचें बोलणें शेवटीं कबूल केल्यामुळें त्यांची अटकावांतून सुटका झाली आहे. हें ऐकल्यामुळें अर्थात् त्यांचें जेवण त्यांस ज्यास्त गोड लागलें.

प्रस्तुत ह्या अडचणींतून निघून जाण्यास एकच मार्ग होता. फेब्रुवारीच्या दहाव्या तारखेस ह्या प्रकरणाची चौकशी करण्यासाठीं म्हणून एक कमिटी नेमिली; तिचे सभासद मोठे समजूतदार म्हणून ज्यांची कीर्ति होती, असेच निवडिले होते. हिल यानें आपले साक्षिदार बलाविले. पहिल्या साक्षीपाशीं मुद्याचें असें सांगण्यास कांहींच नव्हतें. दुसरा साक्षी मेकाले होता; पण त्यानें एकदम ह्या कामाचा निकाल करून टाकिला; कारण त्यानें सांगून टाकिलें कीं, खासगी संभाषणामध्यें जो मजकूर आपल्या कानीं आला असेल तो सांगणें गैरशिस्त होय, असें मी समजतों; हें त्याचें म्हणणें कमिटीस इतकें पसंत पडलें कीं, त्यांनीं प्रत्यक्ष टाळ्या वाजविल्या. अशा रीतीनें शहाणपणाच्या एका वाक्यानें ह्या मूर्खांच्या गोंधळाचा योग्य तो निकाल लागला. हिल साहेबाच्या लक्ष्यांत आपली चूक आली. त्यानें आणखी पुरावा घेऊं नये म्हणून कमिटीची विनंति केली; आणि पुनः कामन्सची सभा भरली तेव्हां अगदीं पश्चात्तापपूर्वक त्यानें आणिलेला आरोप मागें घेतला. लार्ड अल्थार्प ह्यानेंहि राजी-खुशीनें कबूल केलें कीं, सामान्य माणूस ह्या नात्यानें माझें वर्तन वेडेपणाचें झालें खरें, व प्रधान या नात्यानें तर जास्तच वेडेपणाचें झालें; आणखी तो असें म्हणाला कीं, शील यानें आपण असें बोललों नाहीं असें म्हटलें तर तेंच खरें असें कबूल करणें हें माझें कर्तव्यच

आहे." तथापि ह्या कृत्यावरून शील ह्याच्या बदलचें आपलें मत ज्यास्त चांगलें झालें आहे, अशा प्रकारचा ठसा त्याच्या श्रोत्यांच्या मनावर उठावा, अशा प्रकारचें स्वरूप त्याला कांहीं आपल्या भाषणास देतां आलें नाही. शीलने ह्या दोन माफ्यांबद्दल तिच्या तिच्या किमतीप्रमाणें आपली मान्यता दाखविली; आणि अशा रीतीनें ह्या घाणेरड्या कामांचा निकाल लागला.

मेकाले निघतां निघतां फेब्रुवारीच्या १५ तारखेस लार्ड लॅण्डसडौन ह्यास लिहितो:--" निघण्याच्या पूर्वीं आणखी एकदा आपल्यास भेटावें असें माझ्या मनांत होतें; पण ह्या कामन्स सभेंतल्या मूर्खांच्या बाजारामुळे मला तसें करतां आलें नाहीं; तथापि आपल्याला दोन अक्षरें लिहिल्य शिवाय मला इंग्लंद सोडणें बरें दिसत नाहीं. तुमचा माझा जो संबंध त्याचें मला नेहमी किती कृतज्ञतापूर्वक स्मरण राहील, व तुमचे आणि तुमच्या कुटुंबाचे कुशलवृत्त ऐकण्यास मी नेहमी किती उत्सुक असेन, हे एथे सांगण्याची जरूर नाहीं. आपला, इ. इ. "

# प्रकरण ५ वें.

## हिंदुस्थानांतील कारकीर्द.

फालमौथ एथील विहग लोकांनीं आपल्या मेयरास-हित येऊन त्यास निरोप दिला, व त्यास परमेश्वरानें सुखी ठेवून इंग्लंदास सुरक्षित परत आणावें, असें म्हटलें, तेव्हापासून त्याचा जो सुखाचा व जलदीचा जलप्रवास झाला त्याची कंटाळवाणी एकतानता मोडण्यास सांगण्यासारखें काही एक झाले नाही. इकडे येणाऱ्या तारूंवर त्या वेळीं जशा प्रकारची प्रवासी मंडळी सामान्यतः असे, तशाच प्रकारची ह्या प्रसंगीहि होती. हा त्या मंडळींत फारसा मिसळला नाहीं; ह्याची पुस्तकें बरोबर होतीं. जेवणाच्या वेळीं इतरांशीं बोलण्याचा काय प्रसंग येईल तो, बाकी त्यांच्याशीं ह्याचा एक शब्दहि कधीं होत नसे. ह्याची बहीण मात्र मंडळींत फार मिसळे. "तिनें सकाळीं स्त्रियांबरोबर पुस्तकें व धर्मव्याख्यानें वाचावीं, व संध्याकाळीं पुरुषांबरोबर नाचावें:— प्रवासामध्यें मी फार आनंदानें एकसारखा वाचीत होतों, व जसजसा मी जास्त वाची, तसतसा मला ज्यास्त आनंद होई. ग्रीक, ल्याटिन, स्प्यानिश, इतालियन, फ्रेंच आणि इंग्लिश द्विपत्री, चतुष्पत्री, अष्टपत्री, आणि द्वादशपत्री ग्रंथांच्या ग्रंथ मीं पालथे घातले."

जूनच्या दहाव्या तारखेस तारूं मद्रास येथें थांबलें; आणि ज्यासाठीं कायदे बनविण्याकरितां मेकालेची नेमणूक झाली होती, तें

याच्या प्रथम दृष्टीस पडले. प्रथम त्याला दिसला तो अर्थात् ज्यानें बंदरावर वल्हावून नेले तो होडीवाला होय. त्याच्या संबंधानें तो ह्मणतो. " तो जेव्हां आमच्या तारवांवर आला, तेव्हां त्याच्या अंगावर एका पिंवळ्या अणकुचीदार टोपीखेरीज कांहीं एक नव्हतें. तो आमच्या मधून इतक्या धिटपणाने व अदबीने चालत होता कीं, तें पाहून व त्याचा तो रंग आणि त्याची ती दिगंबरवृत्ति हीं अवलोकन करून मी हसतां हसता मेलो. मागून दुसरे गृहस्थ आले, त्यांनीं जी बातमी आणिली, ती ऱ्याच्या उलट. ह्या वेळीं लार्ड विलियम् बेंटिंक हा गव्हर्नर जनरल होता; त्याची प्रकृति बिघडली असल्यामुळें नीलगिरी पर्वतावर उटकामंड येथें ती सुधारण्यासाठीं तो आलेला होता. सरकारी काम विशेष महत्वाचे असल्यामुळें त्याच्या कौंसिलची सभा तेथेच भरणे जरूर पडले; आणि ज्या अर्थी कौंसिलचा दुसरा एक मेंबर बंगाल्यात गव्हर्नर जनरलच्या बदली काम करण्यास राहिलेला होता, त्या अर्थी इंग्लंदाहून नवीन कौंसिलर येई तोंपर्यंत कोरमच (सभेचे काम सुरु होण्यास अवश्य लागणारी सभासदांची संख्या) बनत नव्हते, ह्मणून सत्वर निघून येण्याविषयी त्याजकडून मेकालेस समान आले; आणि त्याची बहीण बरोबर असल्यामुळें तो मोठ्या पंचाइतीत पडला. कारण हिंदुस्थानात पाऊल ठेविल्याबरोबर व जून महिन्याच्या ऐन अमलात, तिला एकदम चारशें मैलांचा स्थळप्रवास करावयास लावावे, हे त्यास बरें वाटना. बरें, तीस एकटी कलकत्यास पुढें पाठवावी, तर तीहि पंचाईतच. इतक्यांत सुदैवानें कलकत्याचा बिशप विल्सन ह्याचे पत्र त्याच्या हातांत पडलें. त्याचा व ह्याच्या बापाचा स्नेह असल्यामुळे त्यानें ह्यास आपल्याकडे उतरावयास येण्याबद्दल आग्रहपूर्वक लिहिले होतें. ह्मणून हाना त्याच तारवांवरून पुढे कलकत्यास गेली, व बिशपकडे

उतरली; लवकरच लेडी विलियम बेंटिक हिची तिची ओळख हो- ऊन ती हिच्यावर माया करू लागली.

इकडे मेकालेला हिंदुस्थानांतल सगळेंच नवीन, ह्मणून तें पाह- ण्यांत तो गर्क झाला, व त्याच्या बाहिणीच्या वियोगानें त्यास तितकें वाईट वाटलें नाहीं. तो ह्मणाला: " तीन महिने समुद्रावर घालवि- ल्यावर जमिनीला पाय लागणे ह्यांतच एक मोठी मौज वाटते, पण अशा ह्या देशांत उतरणे ह्मणजे किती तरी मजा ! काय तीं पांढरीं पागोटीं, काय ते पायघोळ आंगरखे, काय तीं काळा कुळकुळात तोंडें ! तेथलीं झाडें देखील निराळीं: वातावरणाला वास येतो तो देखील ग्रीष्मगृहातल्यासारखा; आणि एथील शिल्पकाम एथील वनस्पतीं इतकें विलक्षण ! " या देशांतील प्रत्येक देखावा त्यास आनंददायक वाटला; तो देखावा स्वतः चांगला ह्मणून, व त्याच्या चपल व माहितीने भरलेल्या मनात तेणेंकरून पुष्कळ आठवणी व कल्पना जागृत होत ह्मणून. त्यानें किनाऱ्यावर पाय ठेविल्याबरोबर जी १५ तोफांची सलामी झाली, त्यावरून देखील त्यास असे स्म- रण झालें की, आपण हल्लीं ज्या देशांत आलो, तेथें लढवय्ये व राज्यकर्ते ह्मणूनच आपणास राहिलें पाहिजे.

मद्रास येथें उतरल्यानतर नीलगिरीस जाण्यासाठीं एका आठ- ड्यानें तो निघाला: तेव्हा त्याजबरोबर पालखीवाल्यासहित ३८ नोकर माणसें होतीं. तो रात्रीचा प्रवास करीत असे, व दिवसा ऊन टाळण्याकरिता विश्रांति घेत असे. या देशाबद्दल जे पहिले ठसे त्याच्या मनावर उमटले, ते तो दिनचर्यारूपानें लिहून आपली बहीण मार्गारेट हीस पाठवीत असे. १५ तास प्रवास केल्यावर तो अर्काट येथें येऊन पोहोंचला, आणि तेथून म्हैसूर प्रांतांत शिरून बंगलोर येथें गेला. त्याला साहजिक श्रीरंगपट्टण पाहण्याची फार

प्रत्येकास माहीत आहे. खरोखरच, मला असें मानण्यास कारण आहे कीं, ज्या थोड्याशा मंडळीला थोडें बहुत तरी ग्रीक येतें आहे, त्यासर्वांचें मत याहून निराळें आहे—बाकी तें चुकीचें आहे ह्यांत संशयच नाहीं.' अशा रीतीनें आमचा हा वाद संपला त्या गृहस्थानें मजकडे अशा मुद्रेनें पाहिलें कीं, जणूं काय मी त्याला फार दुष्ट माणूस भासलों; आणि, माझी खात्री आहे कीं त्यानें इतक्यावेळांत एवढें शोधून काढिलेंच आहे कीं, जर टामसपैकीं 'टी,' बाबिंग्टनपैकीं 'बी,' आणि मेकालेपैकीं 'एम्' हीं अक्षरें गाळून माझें नांव तामिल भाषेंत लिहिलें तर त्यांतून ही दुर्दैवी संख्या निघेल."

मेकालेच्या दुर्दैवानें तो जेव्हां निलगिरीला गेला तेव्हां पावसाळा होता. "पाऊस जणूं काय पुरांनींच पडत होता. धुकें इतकें असे कीं १०० यार्डांच्या आंतलें देखील दिसण्यास मारामार पडे. सगळ्या महिन्यांत मला दोन तास देखील फिरावयास मिळालें नाहीं." तो कधीं त्रासावयाचा नाहीं, पण आतां त्रासूं लागला: आणि त्याच्या सोबत्यांना वेळ घालविण्याचीं त्याच्यासारखीं साधनें (वाचन वगैरे) नसल्यामुळें ते तर उद्योगाविना अपणास टांगून घेण्यास तयार झाले. उटकामंड येथें नवीनच वस्ती झालेली होती; त्यामुळें पावसाळ्यांत वेळ घालविण्यास जीं इतरत्र साधनें असतात, तीं एथें अद्यापि तयार झालेलीं नव्हतीं. सभोंवती जंगल ह्मणजे मी ह्मणत होतें; तेथें गेल्यास "हत्ती हत्तीच्या पायीं सांपडून रुपयाएवढाले तुकडे होण्याचा, व व्याघ्रमुखीं पडण्याचा, फारच संभव; आणि हीं जनावरें बंगालचें मैदान सोडून येथें कां येतात ह्मणाल तर इतके युरोपियन लोक ज्या कारणासाठीं हिंदुस्थानांत येतात तेंच कारण: एथें जें कांहीं मिळेल त्याच्या आशेनें तीं ही वाईट हवा सोसण्यास तयार

होतात. " मग काय विचारतां ? आपण बरे, आणि आपलीं पुस्तकें बरीं, अशा रीतीनें त्यानें तेथें दोन महिने काढिले.

सरते शेवटीं लार्ड विलियम् बेंटिक यानें त्यास रजा दिली, आणि पूर्वीच्याच थाटानें तो घांट उतरूं लागला. निलगिरी उतरून खालीं आल्यावर तो पावसाच्या व धुक्याच्या त्रासांतून मुक्त झाला, व त्यास हायसें वाटलें. त्या वेळचें तो वर्णन करितो:—"एक तासभर घांटाखालीं उतरल्यानंतर पाऊस आणि ढग यांतून आह्मी बाहेर पडलों; आणि म्हैसूरचें मैदान आमच्या पुढें पसरलेलें दिसूं लागलें; तें मैदान ह्मणजे वृक्षांच्या पानांचा एक विस्तृत समुद्रच होता, व त्याच्यावर सूर्याचा चकचकीत प्रकाश पडलेला होता. सृष्टिसौंदर्याचीं जीं ठरीव वर्णनें आहेत तसलीं ओढून ताणून करण्याची मला सवय नाहीं. पण खरोखरच माझ्या डोळ्यांत आनंदाश्रु येऊं लागले. मी पालखींतून एकदम खालीं उतरलों, व त्या विशाल खोल डोंगरांतून चालतच निघालों. दोन तासांत आह्मीं सरासरी ३००० फूट खालीं उतरलों असूं. रस्त्यावर जेथें जेथें नवें वळण लागे, तेथून तेथून खालच्या अमर्याद अरण्याचा कांहीं तरी नवीनच तऱ्हेचा देखावा दृष्टीस पडे. हें जें जगाच्या उत्पत्तीपासून अस्तित्वांत असलेलें व सृष्टीनेंच लावून दिलेलें विशाळ जंगल त्याच्यामध्यें व आमच्या विलायतेमध्यें मुद्दाम हुशार माळ्यांनीं शोभेसाठीं तयार केलेलीं जीं रानें त्यांच्यामध्यें, जें साम्य दिसतें तें पाहून मी चकित झालों. डोंगरांच्या पायथ्याशीं येऊन पोंहोचल्यावर आमच्या नजरेस जे देखावे पडले, ते नंदनवनांतीलच कीं काय असा भास होई. असे गगनचुंबित वृक्ष मी कधीं पाहिले नव्हते. पावतासांत असे शेकडों वृक्ष आमच्या डोळ्याखालून गेले कीं, त्यापैकीं अगदीं लहान वृक्ष इंग्लंडांत जे विशाळ ओक ह्मणून दाखवितात, त्यांच्या तोडीचे होते. "

अशा रीतीनें मद्रास येथें परत येऊन कलकत्त्यास जाण्यासाठीं तो आगबोटीवर चढला, व वेळ जाण्यासाठीं ह्मणून पोर्चुगीज भाषा शिकूं लागला त्याला अगोदरच किती भाषा अवगत होत्या, हें आधीं आलेंच आहे. त्यांत ही नवीन भर पडणार होती. त्याची नवीन भाषा शिकण्याची पद्धति त्यानें एके ठिकाणी अशी वर्णिली आहे कीं, कोणतीहि भाषा शिकावयाची ह्मणजे त्या भाषेंतील बैबल वाचावयाचे मी अगोदर सुरवात करितो. अर्थात् सर्व भाषेंतील मजकूर एकच असल्यामुळें तें समजण्यास नवशिक्यास सोपें पडतें; आणि त्याची विलक्षण स्मरण शक्ति, व तासच्या तास वाचीत बसण्याची संवय! मग काय विचारतां! चार महिन्यांत तो नवी भाषा आपलीशी करून घेत असे.

पण यासमयीं त्याला पोर्चुगीज भाषा शिकण्यास फारसा वेळ मिळाला नाहीं. तारूं फारच सपाट्यानें गेले, व त्याचे बंगालच्या उपसागरांत काय ते आठ दिवस मोडले, व पुढे हुगळी नदींत दोन दिवस. तेथें गेल्यावर आपली बहीण गव्हर्नर जनरलच्या बंगल्यांत राहिलेली असून खुशाल आहे. असें त्यास आढळून आलें; तेथें तो प्रथम उतरला, व दीड महिना त्यानें तेथेंच काढिला. नवंबरच्या १५ वीच्या सुमारास मेकाले स्वतंत्र राहूं लागला, व जरूरीपेक्षां जरा ज्यास्तच सढैल हातानें खर्च करूं लागला, कारण ही त्याला नेहमी संवयच असे.

ह्या वेळेच्या त्याच्या पत्रांपैकीं अत्यन्त महत्त्वाचें ह्मटले ह्मणजे त्याची बहीण हिचें कलकत्यास लग्नानें जमले, ह्यासंबंधानें त्यानें दुसरी बहीण मार्गारेट हीस लिहिलेलें होय. तिच्यावर या वेळीं ज्याचें प्रेम जडलें, त्याचें नांव ट्रेव्हेल्यन असें होतें. त्याचें वय या वेळीं अवघें २८ वर्षांचें होतें. तो फार हुशार, फार प्रामाणिक, व फार

उल्हासी असा माणूस असे. तो २१ वर्षांचाच असतां सर एडवर्ड कोलब्रूक याच्या हाताखालीं दिल्ली येथें त्यास नेमिलें. कोलब्रूक हा फार हुशार व लोकप्रिय माणूस असे, पण लांच फार खाई. ट्रेव्हेल्यन यास त्यानें आपली विद्या शिकविण्याचा यत्न केला. तो त्या मोहांत पडला नाहीं, इतकेंच नाहीं, तर उलट त्यानें त्याचीं कृष्णकृत्यें उघडकीस आणिलीं. त्या वेळा पुष्कळ लोक ह्यास शिव्या देऊं लागले, व याच्याशीं बोलेनासे देखील झाले; पण तो डगमगला नाहीं. शेवटीं कोलब्रूकची चौकशी होऊन त्यास नाकरीवरून दूर केलें, व गव्हर्नर जनरल याजवर फार खुश झाला; व त्यांनें यास पाहिजे तें माग ह्मणून सांगितलें. यानें आपल्याकरिता कांहीं एक न मागता आपला भाऊ लष्करांत होता त्याची बढती करण्यास सांगितलें; पण तो स्वकृतीनेंच बढतीस पात्र झालेला होता. नंतर यास लार्ड बेंटिकनें परराष्ट्रीय कामाचा अंडर सेक्रेटरी नेमिलें, व तेंहि काम तो फार शिताफीनें करूं लागला. मेकाले त्याजवर फार खुष झाला, व आपल्या बहिणीवर त्याचें प्रेम जडत आहेसें पाहून तो तीस सर्वांशीं योग्य वर जाणून, त्याच्या त्या प्रेमसंपादणीस व्यत्यय न आणतां त्यानें आनंदानें उत्तेजनच दिलें; पण आतां आपली दुसरी बहीणहि आपणास सोडून जाणार, हा विचार मनांत येऊन त्यास फारच वाईट वाटलें. त्याबद्दल तो आपल्या पत्रांत ह्मणतो:—" मला स्वताला काय वाटलें असेल हें सांगण्याची जरूर नाहीं. तू जेव्हां माझ्यापासून गेलीस, तेव्हाच माझें अंतःकरण बहुतेक फुटलें होतें; पण त्या वेळीं माझी नान्सी (हाना हिचें लाडकें नाव) तरी होती; माझे दुसरे सर्व आप्त माझ्यापाशीं होते; माझे मित्र माझ्याजवळ होते, मी आपल्या स्वदेशांत होतों. आतां मला माझ्या मनाचा आधार, व आपल्पोटेपणानें न 'वागल्याबद्दलचें

समाधान ह्या शिवाय दुसरें कांहीं राहिलेलें नाहीं. पण मी कुरकुरत नाहीं. जें जे मी भोगीत आहें तें मीं स्वतःवर ओढून आणिलें आहे. विचारशक्ति व अनुभव ह्यांच्या अगदीं उघड उघड सांगीचीं मी आवहेलना केली आहे. फांसा कसा पडेल ह्याचा अंदाज केल्याशिवाय मी आपले सुख पणास लाविलें आहे. मी बोरूवर टेंकलों आहें. मी वाळूवर इमारत उभारिली आहे; आणि, विशेषें-करून, मला अशी खबरदारी घेतली पाहिजे कीं, ती शिक्षा माझ्या पक्षीकडे दुसऱ्या कोणास भोगण्यास लागूं नये. इ. इ. ”

दुसऱ्या एका पत्रांत तो असें ह्मणतो:—“ तिरसटपणा व संशय ह्या वृत्तींकडे माझ्या मनाचा कल ज्यास्त ज्यास्त होत आहेसें मला वाटतें. माझी बुद्धि कायम आहे; आणि कांहीं वर्षें तरी तिच्यांत मी सर्वस्वी गर्क होऊन जाईन असें मला वाटतें. माझी ज्ञानतृष्णा कायम आहे, ती कमी झालेली नाहीं; ह्या उलट सर्व गोष्टी घडत आहेत, त्यांनीं ती ज्यास्तच बळकट होत आहे; सर्व युगें व सर्व राष्ट्रें यांच्यांतील जीं उत्तम मनें त्यांच्याशीं संभाषण करीत बसण्याची माझी हौंस; आपली वर्तमान परिस्थिति विसरून भूत, भविष्य, दूरचें, व काल्पनिक, असें जें असेल त्याच्याच सहवासांत राहण्याची माझ्या आंगची शक्ति, हीं सर्व कायम आहेत. पुस्तकें ह्मणजे माझें सर्वस्व असें मला वाटूं लागलें आहे. मला जर आतां कोणी पाहिजे त्या रीतीचा आयुष्यक्रम अनुसरण्याची परवानगी दिली, तर युनिव्हर्सिटी-मध्यें आपण जीं भव्य संग्रहालयें पाहिलीं कीं नाहीं त्यांपैकीं एकांत मी आपल्यास पुरून घेईन, आणि पुस्तक हातीं घेतल्याशिवाय जागृतावस्थेंतील एकहि तास घालविणार नाहीं. इ. इ. ”

ह्या वियोगापासून आपल्या भायास होणारें दुःख साधेल तितकें कमी करावें ह्मणून ह्याना दिनें नवऱ्यास असें सुचविलें कीं, आपण

सर्वांनीं एकत्र राहावें; ह्या सूचनेस तो मान्य झाला, व मेकाले तर तें ऐकून आनंदितच झाला. पण अशा रीतीनें त्यांचा आयुष्य नदीचा प्रवाह पुनः संथपणानें चालू होण्याच्या पूर्वी त्यास मध्येंच एक विघ्न आलें. जिला ह्मणून ( मार्गारेटला ) मेकालेनें पत्रें पाठविलीं होतीं तिला तीं पोंचण्याच्या पूर्वींच तिचे डोळे मिटले होते. ही दुःखकारक वार्ता हिंदुस्थानांत येऊन पोहोंचली तेव्हां तीं नूतन वधूवरें बराकपूर येथें आपला हनीमून (लग्नानंतरचा पहिला महिना) घालवीत होतीं. तीं लागलींच कलकत्त्यास परत आलीं, आणि ह्या महत् दुःखाच्याच भरांत आपल्या भावाच्या घरीं रहाण्यास त्यांनीं सुरुवात केली; इकडे मेकाले सरकारी कामाच्या पुरांत आपलें दुःख होईल तेवढें बुडवून टाकण्याची खटपट करूं लागला.

ह्या वेळीं हिंदुस्थानांतील वर्तमानपत्रांस कायद्यानें पूर्ण स्वातंत्र्य नव्हतें. बहुतेक किंवा सगळींच पत्रें इंग्लिश लोकांनींच चालविलेलीं असत. ते ह्या कायद्यास फारसे जुमानीत असें नाहीं. पण त्यामुळेंच तो कायदा रद्द करणे, व जें स्वातंत्र्य वर्तमानपत्रें वस्तुतः उपभोगीत होतीं तें त्यांस कायद्यानें देऊन टाकणें, योग्य होतें. यासंबंधानें त्यानें जी मिनिट लिहिली होती, तींत तो ह्मणतोः—" मी जो कायदा काढून टाकावा ह्मणून ह्मणतो त्याच्यापेक्षां, योग्य ह्मणून दाखविण्यास कमी क्षम्य अशा कायद्याची कल्पनाहि करतां येत नाहीं. राजाधिकाऱ्यांची चाल नेहमीं अशी असते कीं, जुलमी कायद्यांना देखील लोकप्रिय स्वरूप व नांवें देऊन ते सुरू करावयाचे. पण वर्तमानपत्रांच्या संबंधानें हिंदुस्थान सरकारची वागणूक ह्या रूढीच्या अगदीं विरुद्ध आहे. ... ... ... राजकीय विषयांच्या चर्चेला जबरदस्त नियंत्रणानें बांधून टाकणें ही नीति समजण्यासारखी आहे, आणि कदाचित् कांहीं देशांत अशा राजनीतीला

शहाणपणाचीहि ह्मणतां येईल (जरी मला ह्याबद्दल बरीच शंका आहे). पण सध्या आपणास ह्या प्रश्नाचा विचार कर्तव्य नाहीं. आमच्यापुढें जो प्रश्न आहे तो वर्तमानपत्रांस स्वातंत्र्य द्यावें किंवा नाहीं हा नाहीं, तर तीं स्वतंत्र असतां त्यांस तशीं ह्मणावें किंवा नाहीं हा आहे. विनाकारण आपणास लोकांमध्यें अप्रिय करून घेणें हें कोणत्याहि सरकारचें शुद्ध वेडेपणाचेंच कृत्य होय........ तथापि हें आम्ही हल्लीं करीत आहों....हीं गोष्ट सर्वांस कबूल आहे कीं, वर्तमानपत्रवाल्यांनीं प्रथम परवानगी घेऊन नंतर पत्र काढण्यास सुरुवात करावी, ह्याबद्दल जो हल्लीं आहे, त्या कायद्यानें सरकारच्या कोणत्याहि कृतीवर किंवा कोणत्याहि सरकारी कामदारावर हवा तितका ताशेरा झाडण्यास किंवा त्याची हवी तितकी निंदा करण्यास कोणासहि प्रतिबंध होत नाहीं. तरी 'छापण्याची परवानगी' हे जे शब्द आहेत ते जगावर कोठेंहि इंग्लिशमन असला तरी त्याच्या कानास अगदींच कडू लागतात.......आतां अशा प्रकारची भुमा असतां वर्तमानपत्रवाल्यांनीं हा कायदा काढून टाका ह्मणून जी खटपट आरंभिली आहे ती शहाणपणाची आहे किंवा नाहीं, ह्याची चवकशी करण्याची आपणांस जरूर नाहीं. आपल्याला ज्या प्रश्नाचा विचार कर्तव्य आहे तो त्यांनीं काय करावयास पाहिजे होतें हा नव्हे, तर आम्ही काय करावयास पाहिजे, हा आहे."

हा मुद्रणस्वातंत्र्यनियंत्रणाचा कायदा कायम ठेवण्याबद्दल कांहीं-कांनीं असें कारण दाखविलें होतें कीं, तो नसला तर एकाद्या कठीण प्रसंगीं फार पंचाईत पडेल. ह्यासंबंधानें मेकाले ह्मणतो:—

" बिलक्षण धोका आल्यास त्याबद्दल बिलक्षण खबरदारी घेण्यासाठीं हिंदुस्थान सरकाराला जितकीं साधनें दिलेलीं आहेत, तितकीं जगांतील दुसऱ्या कोणत्या सरकारच्या हातीं नसतील. ज्यांना

अर्ध्या तासांच्या आंत एकत्र जमवितां येतें, ज्यांचें काम गुप्त चालतें, व इतरत्र कायदे करण्याच्या कामाला ज्या नियमांचा बाध होत असतो, व ज्यामुळें वेळ लागत असतो, तसल्या नियमांचें बंधन ज्यांस मुळींच नाहीं, अशीं पांच माणसें (एक गव्हर्नर जनरल, व त्या वेळचे त्याचे चार कौन्सिलर) एका बैठकीस असा कायदा पास करूं शकतील कीं, ज्याच्या योगानें हिंदुस्थानांतील प्रत्येक छापखाना बंद पडावा."

मेकालेचें हें ह्मणणें कौंसिलच्या इतर सभासदांस मान्य झालें, व मुद्रणस्वातंत्र्याची हिंदुस्थानांत १८३५ त स्थापना झाली. तें पुढें लार्ड लिटनच्या कारकीर्दीपर्यंत कायम होतें. पुढचा इतिहास सर्वांस विदितच आहे. पण अशा रीतीनें जरी तो वर्तमानपत्रांच्या वतीनें एवढा लढला, तरी त्यांनीं त्यास शिव्या देण्यास कधीं कसूर केली नाहीं. 'फसव्या' 'सोदा' 'तोतया' इत्यादि शेलकीं विशेषणें ते त्यास देत असत. कधीं कधीं वर्तमानपत्रांतून ह्याच्यावर इतके हलकट हल्ले आलेले असत कीं, त्या दिवशीं वर्तमानपत्रें बहिणीच्या टेबलावर ठेवण्याची सोय नसे. एकदा 'फ्रेंड आफ् इंडिया' (कलकत्याचें स्टेट्समन व 'फ्रेंड आफ् इंडिया' हेंच तें बहुधा असावें) या सभ्य पत्रानें त्यांना लाज आली तर पहावी ह्मणून त्यांच्या आर्टिकलांतून शेलकीं विशेषणें व शिव्या काढून एकत्र छापिल्या; पण निगरगट्टच ते, त्यांचा कांहींएक उपयोग झाला नाहीं. उलट, असल्या अमंगळ शब्दांचा आपल्या पत्रास विटाळ होऊं दिल्याबद्दल या पत्रकर्त्यास मात्र वाईट वाटलें, व पुढें तो या फंदांत कधीं पडला नाहीं.

इतकें झालें तरी मेकाले कधीं डगमगला नाहीं, किंवा वर्तमानपत्रांच्या संबंधानें जें आपलें कर्तव्य त्यांत त्यानें काडीचीही कसूर

केली नाहीं. उलट हें प्रकरण जेव्हां १८३६ सालीं विलायतेस डिरेक्टरांकडे गेलें, व त्यांस हा कायदा रद्द करण्यांत दाखविलेल्या मुत्सद्दीपणाबद्दल शंका आली, तेव्हां त्यानें पुनः स्वकृतिमंडनार्थ एक लांबलचक व मुद्देसूद मिनिट लिहून तिकडे पाठवून दिली. युरोपांतील व हिंदुस्थानांतील वर्तमानपत्रांची स्थिति किती निरनिराळी आहे हें दाखविण्यासाठीं यूरोपांतील वर्तमानपत्रांच्या शक्तीचें वर्णन करून हिंदुस्थानच्या वर्तमानपत्रांविषयीं तो ह्मणतोः—" हिंदुस्थानांत वर्तमानपत्रे ही त्या दृष्टीनें पाहतां फार दुर्बल आहेत. यूरोपांतल्या वर्तमानपत्रांपेक्षां तीं फार कमी हित व फार कमी अहित करूं शकतात. ज्या अनिष्ट गोष्टी सरकारास एरवी कधीं कळल्या नसत्या त्या कधीं कधीं तीं त्याच्या नजरेपुढें आणितात. सरकारी कामगारांवरही त्यांचा कधी कधी हितपरिणामी वचक असतो. राज्यकारभार शुद्ध राखण्याच्या कामीं त्याचा थोडासा उपयोग होतो. आतां कधी कधीं सरकारी कृतीस भलतेंच स्वरूप देऊन, व आपल्या आश्रयदात्यांच्या मतांतील दुराग्रहांस उत्तेजन देऊन तीं कधीं कधीं लोकांचें मनांत थोडासा उत्क्षोभ उत्पन्न करितात हें खरें आहे, पण हे आश्रयदाते लोक फारच थोडे आहेत. इ. इ."

कांहीं वर्तमानपत्रें मेकाले त्यांचा इतका हितकर्ता असतां त्याच्यावर इतकी तुटून कां पडत ह्याचें कारण निराळेंच होतें. ह्या वेळीं कंपनीच्या मुलखांत जिकडे तिकडे कंपनीचीं कोर्टें असत, व कलकत्त्यास एक ब्रिटिश सरकारचें ह्मणून सुप्रीम कोर्ट असे, व एक कंपनीचें सदर कोर्ट असे. त्या वेळीं ज्या दिवाणी कामांत एक पक्षकार यूरोपियन असेल त्या कामांत त्यांना सुप्रीम कोर्टापुढें अपील करण्याचा अधिकार असे. इतरांचीं अपिलें कंपनीच्या सदर कोर्टापुढें येत. आतां मेकालेनें कौंसिलपुढें अशी सूचना आणिली

कीं हीं अपिलें या पुढें सदर कोर्टापुढेंच यावीं. सदर कोर्टाचेही सर्व न्यायाधीश यूरोपियनच असत. तात्पर्य, त्याच्या सूचनेपासून कोणास कांहींच अपाय होण्यासारखा नव्हता. तरी याच्याबद्दल यूरोपियन वर्तमानपत्रांत इतकी चळवळ उडून गेली कीं, ती सूचना अमलांत आणणें किंवा न आणणें हा खरा खुराच फार महत्वाचा प्रश्न होऊन बसला.

यासंबंधानें मेकाले लिहितो-" सदर कोर्ट पसंत कां करावें याचें माझ्या मतें मुख्य कारण हें आहे-कीं हिंदुस्थानांतील महाजन-समूहास अखेरपर्यंत ( अपिलांत ) न्याय देण्यासाठीं तें कोर्ट आपण स्थापन केलेलें आहे. जर तें त्या कामाला योग्य नसेल तर तें योग्य केलें पाहिजे. बरें, महाजनसमूहास न्याय देण्यास जर तें योग्य असेल तर, त्याच्या अधिकारांतून मूठभर रहिवाशांसच ( इंग्लिश लोकांस ) आपण मुक्त कां करावें ? १८१३ च्या चार्टर आक्टा-मध्यें एकपक्षीयपणा व जुलूम ह्यांचा वास्तविकपणा मी नाहीं ह्मणणार-पण दिखाऊपणा, खचीत आहे. त्यामध्यें जो भेद केला आहे त्यावरून अशी कल्पना गर्भित होते कीं, हिंदुस्थानच्या नेटिव्हांस पूर्ण न्यायापेक्षां कांहीं थोडेंसे कमती मिळालें, तरी त्यांची कांहीं गैरसोय व्हावयाची नाहीं, किंवा असें गर्भित होतें कीं, इंग्रजांस पूर्ण न्यायापेक्षां कांहीं ज्यास्त मिळविण्याचा हक आहे. ज्या खटल्यांमध्यें इतर कोणासहि अपील करावयाचें असल्यास कंप-नीच्या कोर्टाकडे जावयास भाग पडतें, त्याच खटल्यांत आम्ही आपल्या देशबांधवांस राजाच्या कोर्टाकडे जाऊं देणें म्हणजे कंप-नीच्या कोर्टाची अब्रू कमी करण्यासारखेंच आहे. ह्या करण्यानें हिंदुस्थानांतल्या लोकांना आम्ही असें जाहीर करितों कीं न्यायाचे दोन प्रकार आहेत; एक जाडा भरडा प्रकार, जो त्यांस पुरे

म्हणून आम्ही समजतो. आणखी एक श्रेष्ठ प्रकार,' जो आम्ही आमच्या साठीं राखून ठेवितों. आमच्या उच्चतम कोर्टावर आमचा भरंवसा नाहीं, असें जर आम्ही मुद्दाम दाखवूं लागलों, तर त्यांचा तरी विश्वास त्यांवर असावा, अशी आशा आपणास कशी करतां येईल ? "

नंतर या बिलास कोणते यूरोपियन विरुद्ध आहेत, व ते बहुतेक बारिस्टर, वर्तमानपत्रांचे कर्ते वगैरे कसे आहेत, आणि लागवड करणारे वगैरे लोक त्यास प्रतिकूल कसे नाहींत, हें दाखवून मेकाले म्हणतो:—इंग्लिश लोकांची इंग्लंदांतील जी राजकीयविषयक भाषासरणी आहे, तीच त्यांची एथेहि आहे. पण एकाच शब्दांनीं लंदन व कलकत्ता येथें फार निरनिराळ्या वस्तू व्यक्त केल्या जातात, हें कधीं विसरतां कामा नये. सार्वजनिकमत, स्वातंत्र्यप्रीति, वर्तमानपत्रांचें वजन, हीं वचनें एथें आपल्या पुष्कळ कानीं येतात. पण आपण ध्यानांत ठेविलें पाहिजे कीं, ह्या ठिकाणीं सार्वजनिक मत म्हणजे ज्या पन्नास लाख लोकांमध्ये ते राहतात, पण ज्यांचें हितहित, मनोवृत्ति, व अभिरुचि हीं सर्व अगदी भिन्न आहेत अशा पांचशे इसमांचे मत, स्वातंत्र्यप्रीति म्हणजे त्या पांचशेंना त्या पन्नास लाखांशीं पाहिजे तसें वागतां येण्याचें बंद व्हावें एतदर्थ कांहीं उपाय योजिले असतां त्या उपायांस ह्यांची अत्यन्त प्रतिकूलता; आणि वर्तमानपत्र म्हणजे ज्यांना त्या पांचशेंचाच आधार आहे अशीं, व ज्यांस त्या पन्नास लाखांच्या वतीनें बोलण्यास कांहींच लालूच नाहीं अशीं. "

ह्या मिनिटींत मेकाले असें लिहून गेला होता कीं हा कायदा जर यूरोपियनांस खरोखरच नको असता, तर त्यांनीं विशेष चळवळ केली असती; तशी कांहीं त्यांनीं केलेली नाहीं. हें त्याला

प्रतिकूल गेलें. कारण ह्या चालक लोकांनींही आपल्यास सूचनाच समजून लागलीच कलकत्त्यास सभा भरविली; तींत फारच हास्यास्पद व दांडगीं भाषणें झालीं, व ह्या कायद्याविरुद्ध विलायत सरकारास व पार्लमेंतास अर्ज करावा, असें एकदाचें कसें बसे ठरलें. पुढें १८३८ च्या मार्च महिन्यांत ह्या आक्टाच्या परिणामाबद्दल चवकशी करण्यासाठीं एक कमिटी नेमावी ह्मणून कामन्स सभेपुढें कोणी सूचना आणिली. पण मेकालेच्या जोरदार लेखणीनें ती हाणून पडली. त्यानें असें लिहिलें होतें:—"मला वाटतें कीं, हा कायदा स्वत: चांगला आहे, व तो पास करण्यासाठीं जी वेळ योजिली होती, ती चांगलीच होती. तथापि तो पास करण्यास अत्यंत बळकट कारण ह्मणजे त्याच्या उलट जो विरोध झाला त्याचें अंत:स्वरूप हें होय. ह्या विरोधवाद्यांचीं वर्तमानपत्रें दररोज असें ह्मणत होतीं कीं, इंग्रज लोक हे ह्या देशाचे जेते व मालक आहेत; त्यांची जात राज्यकर्ती आहे; ज्या कामन्ससभेचा अधिकार विलायतेंत कंपनीवर व हिंदुस्थानांत गव्हर्नर जनरल व त्याचे कौन्सिल ह्यांजवर चालतो, तिचे ते निवडणारे आहेत. ते आह्मांस असें सांगू लागले कीं, ब्रिटिश कायदे मंडळाचे जे हे घटक ते त्यांच्यापेक्षां हलक्या अधिकाऱ्यांनीं केलेल्या कायद्यांनीं कधीं बांधिले जाणार नाहींत. ह्या दोनशें किंवा तीनशें लोकांची ही निष्कारण ओरड ऐकून सरकार डगमगलें नाहीं, हें पाहून ते त्याच्या वर्तनास सार्वजनिक मताचा अपमानकारक रीतीचा तिरस्कार असें ह्मणूं लागले. लहानशा गोऱ्या लोकांच्या श्रीमान् जमावास लाखों लोकांवर आह्मी अरेरावी करूं दिली नाहीं ह्मणून ते आह्मांस स्वातंत्र्यशत्रु ह्मणूं लागले. हीं त्यांचीं तत्वें विचारशक्ति, न्याय, ब्रिटिश सरकारची इभ्रत, व हिंदुस्थानवासी लोकांचें हितसंबंधित, ह्या सर्व गोष्टींच्या किती

विरुद्ध आहेत हें मला दाखवीत बसण्याची जरूर नाहीं. माझ्या संबंधानें मला इतकेंच ह्मणावयाचें आहे कीं, हिंदुस्थानचा राज्यकारभार जर ह्या तत्त्वांच्या धोरणानें चालावावयाचा असेल, तर माझे मनोविकार व माझीं मतें ह्या दोन्हीं दृष्टींनी मी असल्या कारभारांत आपलें कोणत्याहि प्रकारचें अंग ठेवण्यास अगदीं नालायक आहें, आणि माझी जागा करण्यास अधिक योग्य अशा एकाद्या माणसाच्या हवालीं ती मी जितकी लवकर करीन तितकें चांगलें.'

मेकालेच्या अभिरुचीचा व शिक्षणाचा माणूस अधिकारसंपन्न होऊन इकडे आला, व तो आला त्याक्षणींच आला, हें हिंदुस्थानचें मोठें सुदैव होय; कारण, हिंदुस्थानच्या विद्यावृद्धीच्या संबंधानें ही फार महत्वाची वेळ होती. सार्वजनिक शिक्षणाची ह्मणून जी कमिटी होती तिच्या सभासदांमध्ये कधीं समेट न होणारा असा मतभेद उत्पन्न झालेला असल्यामुळें आज कांहीं दिवस पर्यंत शिक्षणाचें सगळें काम बंद पडल्यासारखें झालें होतें. कमिटींत दहा सभासद असत; पैकीं पांचांचें मत असें होतें कीं, प्राच्य विद्यांना उत्तेजन देण्याची जुनी पद्धति आहे तीच तशी कायम ठेवावी, व तिचाच ज्यास्त विचार करावा. ती पद्धत अशी होती कीं, संस्कृत, आरबिक व पार्शीयन या भाषांच्या विद्यार्थ्यांस पगार द्यावे, आणि ह्या भाषांतून पुस्तकें प्रसिद्ध करण्यासाठीं सढळ हाताने देणग्या द्याव्या. दुसऱ्या पांचांचें असें मत होतें कीं, एतद्देशीय मुलांस प्राथमिक शिक्षण देशी भाषांतून द्यावें व वरिष्ट शिक्षण इंग्लिश भाषेच्या द्वारें द्यावें. मेकाले इकडे आल्यावर त्याला या कमिटीचा प्रेसिडेंट नेमिलें; पण वरील मतभेदाचा सरकार निकाल करी तोंपर्यंत त्यानें तिच्या कामास

हातभार लावण्याचें नाकारिलें. १८३५ च्या जानेवारीच्या अखेरीस हा प्रश्न सुप्रीम कौंसिलपुढें आला; आणि फेब्रुवारीच्या दुसरीस कौंसिलच्या सभासद या नात्यानें यानें त्यावर एक मिनिट लिहून ती कौंसिलापुढें ठेविली, तींत त्यानें इंग्लिश शिक्षण द्या, असें जे कमिटीचे सभासद ह्मणत होते, त्यांचें मत स्वीकारून त्याचें मंडन केलें होतें.

तो ह्मणतो: "प्रश्न काय आहे तें प्रथम आपण पाहूं. ज्यांना त्यांच्या जन्मभाषेंत शिक्षण देतां येत नाहीं अशा लोकांस आपणास शिक्षण द्यावयाचें आहे. तेव्हां त्यांना कोणत्या तरी परकी भाषेचें शिक्षण दिलेंच पाहिजे." नंतर इतर परकी भाषांच्या मानानें इंग्लिश भाषेचें महत्व किती आहे, तिच्यांत अध्यात्मशास्त्र, नीति, राजकीय विषय, कायदेशास्त्र, व्यापार, इत्यादि शास्त्रीय विषयांवर कसे अनेक ग्रंथ आहेत, तद्वतूच गद्य, पद्य, वक्तृत्व, नाट्य, इत्यादि वाङ्मयात्मक विषयांवर किती नामी ग्रंथसंग्रह आहे, हें सांगून तो ह्मणतो:--"हिंदुस्थानांत राज्यकर्त्यांची बोलण्याची भाषा इंग्लिश आहे; राजधानीच्या शहरांतून वरिष्ठ वर्गांतील नेटिव लोक तीच भाषा बोलतात. सगळ्या प्राच्य समुद्रांतून व्यापाराची तीच भाषा होण्याचा संभव आहे." नंतर दक्षिण आफ्रिका व आस्ट्रेलेशिया एथें इंग्लिशांच्या नवीन वसाहती वाढत आहेत हें सांगून व तेथें इंग्रजांची मोठीं राज्यें लवकरच बनतील, व हिंदुस्थानच्या त्यांच्याशीं निकट संबंध जडेल असें भविष्य करून तो ह्मणतो:--"आमच्या वाङ्मयाची वास्तविक किंमत किती आहे ती लक्ष्यांत आणिली असतां व ह्या देशाची सद्यःस्थिति ध्यानांत आणतां, आपणास असें मानण्यास फारच बळकट आधार दिसतो कीं सगळ्या परकीय भाषांमध्यें इंग्लिश भाषाच आमच्या एतद्देशीय प्रजेस अत्यन्त उपयोगी पडणार आहे."

नंतर एतद्देशीय भाषांतून इतिहास, भूगोल, ज्योतिःशास्त्र, वैद्यक इत्यादि विषयावर जे ग्रंथ आहेत त्यांची योग्यता काय आहे हें सांगून, व त्यांतील एतद्विषयकमतें ज्या ज्या स्थळीं यूरोपियन भाषांतील ग्रंथांच्या मतांहून भिन्न आहेत तेथें तेथें त्यांतच चुकीचा अंश ज्यास्त आहे. ह्या सर्वसंमत गोष्टीवर हवाला देऊन, तो विचारितो कीं, इंग्लिश भाषा शिकविण्याचें सामर्थ्य आपल्या अंगीं असतां ह्या भाषाच आपण शिकवीत रहावयाचें कीं काय ?

नंतर, आपल्या भाषेतील ग्रंथ शिकण्याच्या ऐवजीं दुसऱ्यांच्या भाषा शिकल्यानें फायदे कसे होतात, ह्याबद्दल तो इंग्लंद व व रशिया हीं दोन उदाहरणें देतो. तो विचारितो कीं १५–१६ या शतकांत इंग्लिश युनिव्हर्सिटीतून जर केवळ आंग्लेसाक्सन भाषेंतील बखरीच तेवढ्या शिकवून ग्रीक व ल्याटिन ह्या भाषांतील ग्रंथ भांडारास टाळा दिला असता, तर आज जी इंग्लदची स्थिति आहे ती त्यास प्राप्त झाली असती काय ? रशियाबद्दलहि तो अशीच गोष्ट सांगतो. तो ह्मणतो कीं रशियाची जी सुधारणा झाली तीस कारण तेथील लोक परकीय भाषा शिकले, व अशा रीतीनें आपली ज्ञानवृद्धि करून घेऊन आपल्या भोळ्या समजुतीस रजा देते झाले, आपल्या अभिरुचि उन्नत करून घेते झाले, आपल्या देशांत शास्त्रें आणि कला यांचा पाया घालते झाले, हेंच होय. अखेरीस तो ह्मणतो:–“ पश्चिम यूरोपांतील भाषांनीं रशिया देशास सुधारिलें. त्या भाषांनीं तार्तार लोकांचा जो फायदा करून दिला आहे तो त्या हिंदूंचा करून देतील याबद्दल मला मुळींच शंका वाटत नाहीं. ”

ह्या त्याच्या लावलचक व मुद्देसूद मिनिटीनें त्या प्रश्नाचा एकदम आणि अखेरचा निकाल लागला. ७ मार्च १८३५ या रोजीं

लार्ड विलियम बेंटिंक यानें असें ठरविलें कीं ' ब्रिटिशसरकारचा मोठा उद्देश पाश्चात्य वाङ्मय व पाश्चात्य शास्त्र यांचा हिंदुस्थानच्या नेटिवांमध्यें प्रसार करणें हा असला पाहिजे; " प्राच्य विद्यांच्या वाद्यांपैकीं दोघे कमिटींतून निघाले; कित्येक नवे मेम्बर—नेटिव व युरोपियन—नेमिले गेले; आणि मेकाले अशा उत्साहानें व उद्योगानें अध्यक्षाचें काम करूं लागला कीं, त्याचें मन त्या कामांत पूर्ण-पणें आहे. हें त्यावरून निर्विवाद रीतीनें दिसून आलें.

हें काम म्हणजे खुशालचेंडूचें नव्हतें. हिंदुस्थानसारख्या विस्तीर्ण देशाकरितां सर्व प्रकारच्या शिक्षणाचा क्रम ठरविणें, त्याचा पाया घालणें, व तो अमलांत आणणें इतक्या गोष्टी कमिटीस करावयाच्या होत्या. हें जें काम त्यानें अंगावर घेतलें होतें तें पुरें करण्यास त्या वेळीं साधनें फार अपुरीं होतीं. व्यवस्थित असें कामगारमंडळ अद्यापि अस्तित्वांत आलेलें नव्हतें. शाळांचे इन्स्पेक्टर नव्हते; मास्तर लोक तयार करण्यास ट्रेनिंग कालेजें नव्हतीं; म्यानेजर लोकांचें अनुभवशीर बोर्ड नव्हतें. ह्या वेळीं काय होतें ह्मणाल तर आपखु-शीनें काम करणाऱ्या व कलकत्त्याच्या कमिटीशींच प्रत्यक्ष व्यवहार करणाऱ्या अशा जागजागीं कमिट्या होत्या. मकालेनें प्रसंग पाहून तदनुरूप वर्तन करण्यास आरंभ केला, आणि शिक्षण खात्याचा कारभार व त्यावर देखरेख ठेवणें हें काम मोठ्या उत्साहानें पण मोठ्या नियमितपणानें व मोठ्या खुबीनें तो करूं लागला. एक हुशार माणूस त्याचें काम पाहून म्हणतो:—चिडखोर स्वभावाचे असे बरोबरीचे व हाताखालचे कामदार ह्यांच्याशीं व्यवहार करतांना मेकाले इतका मनमिळाऊपणा दाखवितो, आणि बारीक सारीक कामाचा इतक्या समजूतदार व छानदार रीतीनें निकाल लावितो, आणि शिक्षणखात्यासंबंधीं किंवा शाळांच्या संबंधानें जे बिकट

प्रश्न पुढें येतील त्यांच्यांतील अडचणीचा भाग इतक्या खुबीदार रीतीनें काढून टाकितो, कीं आम्हाला तो हें काम इतक्या उत्तम रीतीनें करील, असा अजमास नव्हता.' माणूस ज्या व्यवसायामागें लागला असेल त्याची किमत तो किती मानितो, ही गोष्ट तें काम करतांना तो आत्मनियंत्रण किती करतो, व दुसऱ्यांशीं त्या संबंधानें व्यवहार करतांना किती सहनशीलता दाखवितो, हें ह्यावरून बहुधा बरोबर समजते. मेकालेला जर ह्या कसाला लाविलें तर असे उघड दिसते कीं, पार्लमेंतांतील आपली जागा, किंवा प्रधान मडळांतील आपली नेमणूक कायम राखण्याकरितां त्यानें कधींहि घेतली नसेल इतकी काळजी हिंदुस्थानांत योग्य आणि टिकाऊ अशी शिक्षणपद्धति कशी सुरू होईल ह्या कामाबद्दल त्यानें घेतली. मोठमोठ्या शिक्षणविषयक सामान्यतत्त्वांपासून तो तद्विषयक बारीक सारीक गोष्टींपर्यंत निरनिराळ्या विषयावर त्यानें ज्या असख्य मिनिटी लिहिल्या आहेत त्या सर्वांमध्यें विशिष्ट आग्रह किंवा आवडी नावडी यांचा गंध देखील दिसत नाहीं; तर जो मनुष्य उपयोगी पडण्यासारखा असेल त्याची तरफ्त राखण्याकडे, आणि जें जें साधन इष्ट हेतुसाधक होण्यासारखे असेल त्याचा स्वीकार करण्याकडे, त्याचा कल सर्वत्र दृग्गोचर होतो.

तो किती बारीक सारीक गोष्टींकडे स्वतः नजर पुरवीत असे हे पाहणें असल्यास बक्षिसांकरितां कोणतीं पुस्तकें निवडावीं, बक्षीससमारंभाचे वेळीं मुलाकडून नाटकाचे वगैरे भाग करून दाखवावे किंवा नाहींत, दाखविल्यास ते कशा प्रकारचे दाखवावे, शाळांना गोल किती व कोणते आणावे, पुस्तकालयें कशीं स्थापन करावीं, वगैरे गोष्टींबद्दल देखील त्याच्या मिनिटींतून उल्लेख आहे हें ध्यानांत आणावें.

देशी भाषांतून ग्रंथ करणारांस उत्तेजनार्थ कांहीं पैसे द्यावे, अशी कल्पना कोणीं काढिली होती. त्यासंबधानें मेकाले ह्मणतो:—"एकाद्या भाषेत वाङ्मय तयार करण्यासाठीं चार पांच असामी भाड्यानें लावणे, ह्या मार्गाचा जगाच्या कोणत्याहि भागांत आजवर उपयोग झालेला नाहीं, व पुढें कधींहि होणार नाहीं. भाषा ह्या वाढत असतात; रचनां यावयाच्या नाहींत. आह्मी हल्लीं ज्या मार्गाचें क्रमण करीत आहों तो जरी मंद असला, तरी खात्रीचा आहे, आणि हिंदुस्थानच्या भाषांत चांगल्या पुस्तकांची भर पडण्यास आह्मांस त्याच मार्गावर अवलंबून राहिले पाहिजे. सुशिक्षित नेटिव्हांचा एक मोठा वर्ग आपण तयार करीत आहों. मला अशी आशा आहे कीं, आणखी वीस वर्षांनी ग्रंथ रचनेचे उत्तम नमुने व पाश्चिमात्य शास्त्र, यांत चांगले निष्णात असे शेकडो-शेकडों कां हजारों-नेटिव्ह दिसं लागतील. त्यांच्यामध्ये कांहींजण असे खचीत निपजतील कीं, ज्यांच्या अंगी युरोपियन लोकांनले ज्ञान देशी भाषांतून व्यक्त करण्याची इच्छा आहे व शक्तिहि आहे. मला वाटतें कीं, ह्या देशांत उत्तम देशी वाङ्मय उत्पन्न करण्याचा हाच काय तो योग्य मार्ग आहे."

शिक्षणाच्या कामीं मेकालेनें हे जे श्रम केले त्यांची किंमत वाचकांच्या ध्यानावर लक्ष्यांत येण्याकरितां असें सांगणें जरूर दिसतें कीं, हे श्रम त्यानें आपखुषीनें शिरावर घेतले होते, व त्याबद्दल त्याला दमडीहि मिळत नव्हती. अशाच प्रकारची आणखी एक प्रकाराची कामगिरी त्यानें हिंदुस्थानची केली; ती कामगिरीहि हिच्या इतकीच टिकाऊ व हिच्या इतकीच महत्वाची होती. १८३३ च्या कायद्यांत एक कलम असें घातलें होतें कीं, हिंदुस्थानांतील कंपनीच्या मुलखांतील कायदेकानू व त्यांची अंमल बजावणी ह्यांची

चवकशी करून त्यांत शक्य ती सुधारणा करावी; त्याप्रमाणें एक कमिशन नेमिलें, व त्याचाहि अध्यक्ष त्याच्याच सांगीवरून मेकाले यासच केलें. हें नवें काम त्यानें शिरावर घेऊन फार महिने झाले नाहीं तोंच त्यानें एक अशी सूचना पुढें आणिली कीं, जिचा स्वीकार केल्यानें सगळ्या हिंदुस्थानासाठीं एक क्रिमिनल कोड तयार व्हावें. त्यानें असें सुचविलें होतें कीं, "हें कोड म्हणजे एतत्संबंधी हल्लींचे जे कायदे व वहिवाटी आहेत त्यांची ती केवळ गोळा बेरीजच असूं नये, तर कमिशनला योग्य वाटतील अशा सर्व सुधारणा त्यांत गोवून दिलेल्या असाव्या. तें तयार करतांना दोन मुख्य तत्त्वें ध्यानांत ठेवावीं—होईल तितक्या कमी त्रासानें अपराध प्रवृत्ति कमी करावयाची हें एक तत्त्व, आणि द्रव्य व वेळ यांच्या होईल तितक्या थोड्या खर्चानें आरोपांतील सत्य काय, तें कळून यावें हें दुसरें तत्त्व."

ही त्याची सूचना सरकारनें मोठ्या उत्सुकतेनें मान्य केली, आणि कमिशन त्या उद्योगास लागलें. त्या उद्योगाचें फळ, हिंदुस्थान सरकारासारख्या अत्यंत व्यवहारदक्ष व काम करून घेणाऱ्या सरकारास जितकें लवकर मिळावेंसें वाटत होतें, तितक्या लवकर दृग्गोचर झालें नाहीं. त्यामुळें जस्टिनियन (प्रसिद्ध रोमन कायदेशास्त्रज्ञ) च्या वेळापासून कायद्याचीं कोडें तयार करण्याचें काम आजपर्यंत ज्यांनीं ज्यांनीं केलें आहे, त्यांना त्यांना तीं तयार करण्यास जो वेळ लागला, त्या मानानें आमचा हा विलंब म्हणजे प्रत्यक्ष त्वराच आहे, असें मेकाले स्पष्ट करून दाखवूं लागले.

कमिशनच्या मेंबरांपैकीं दोघांना आजारामुळें किंवा इतर कारणामुळें कमिशनच्या कामास विशेष मदत करितां आली नाहीं, व सर्व कामाचा बहुतेक बोजा आपल्यावरच कसा पडला हें दाखवून,

मेकाले ह्मणतो:-" ज्या कामांत आह्मी गुंतलों आहों त्याचें महत्व किंवा काठिन्य ज्यांस माहीत नाहीं अशा लोकांस कोड हें भाषणाप्रमाणें एकदम बोलून दाखवितां किंवा एकाद्या मासिकांतल्या निबंधाप्रमाणें झपाट्यानें लिहून टाकतां कां येत नाहीं याचें आश्चर्य वाटतें. पण मला असें कबूल करण्यास मुळींच लाज वाटत नाहीं कीं, ह्या कोडाच्या कित्येक भागांवर कित्येक महिनेच्या महिने मला घालवावे लागले आहेत; त्या भागांचा एकंदर नमुना मी दहा किंवा बारा वेळां बदलिला आहे; त्यांमध्यें प्रारंभीचा एकहि शब्द जशाचा तसा हल्लीं राहिलेला नाहीं; आणि ते भाग अजून तरी असावे तसे झालेले वाटत नाहींत. अज्ञान लोकांची पोरकट जिज्ञासा तृप्त करण्यासाठीं मी आपल्या कामांत म्हणून घाई करणार नाहीं. जें काम चांगलें होण्यावर लाखो लोकांचें हिताहित पुष्कळ वर्षपर्यंत अवलंबून राहावयाचें आहे, ते करण्यांत गुंतलेल्या लोकांनीं अशा लोकांच्या ओरडीची बिलकुल पर्वा करतां कामा नये. असल्या कामाच्या महत्वाच्या दृष्टीने पाहतां कमिशनवर होणारा खर्च हा काहींच नाहीं. कमिशन बसल्यापासून जो वेळ लोटला आहे तो त्याचें काम ज्या कालावधींत हिंदुस्थानांत बरें किंवा वाईट उत्पन्न करणार आहे, त्या कालावधीच्या मानानें काहींच नाहीं." नंतर त्यानें नेपोलियननें इतके कायदेशास्त्रज्ञ लाविले असतां त्याचें कोड तयार तयार होण्यास ७ वर्षे कशी लागलीं, व इंग्लंडांत असलीं कामें किती मंद चालतात, हेंहि दाखविलें आहे.

ही मिनिट त्यानें २ जानेवारी १८३७ रोजीं लिहिली, आणि वर्ष पुरें होण्याच्या पूर्वींच कोड प्रसिद्ध झालें. त्याला त्यानें जी पुरणिका जोडली होती, तींत स्पष्टीकरणार्थ एकंदर १८ टिपणें घातलीं होतीं, व प्रत्येक टिपण ह्मणजे एक निबंधच होता. हें कोड

अत्यंत वाचनीय आहे; कारण त्याच्यांत जीं उदाहरणें घालून दिलेलीं आहेत तीं इतिहास, वाङ्मय व रोजच्या व्यवहारांतल्या गोष्टी, यांपैकीं घातलेलीं आहेत.

ह्या कोडाच्या संबंधानें व मेकालेच्या यांतील अंगाच्या संबंधानें प्रसिद्ध कायदेशास्त्रज्ञ फिट्झ् जेम्स स्टीफन हा ह्मणतोः—लॉर्ड मेकालेचें हें मोठें काम इतकें धिटाईचें व कल्पकपणाचें होतें कीं, तें एकदम मान्य झालें नाहीं. त्यानें जेव्हां १८३८ त हिंदुस्थान सोडलें, तेव्हां तो पीनलकोडाचा केवळ मसुदा होता. त्याच्यामागून जे त्याच्या हुद्यावर आले, त्यांनीं त्याजवर २२ वर्षेंपर्यंत सूचना केल्या. तीं वर्षें ह्मणजे लढाया व लढायाच्या बातम्या यांनीं भरलेलीं होतीं ...... नंतर १८५८ चें बंड झालें, तेणेंकरून एकंदर जुनी शिस्त मोडून पडली......कायदेकानूंवर बंडाचा परिणाम स्पष्ट दिसतो. क्रिमिनल प्रोसिजर कोडचा कायदा १८५९ त पास झाला. पीनलकोडाचा कायदा १८६० त पसार झाला, आणि १ जानेवारी १८६२ रोजीं तो अमलांत आला. तो पास करण्याचें श्रेय सर बार्निस पीकॉक ह्यास दिलें पाहिजे. मसुदा व कायदा हीं दोन्ही त्याच्या त्याच्या कर्त्यास फारच भूषणास्पद आहेत. ......पीनलकोडाच्या संबंधानें मला ज्या गोष्टीचा अत्यंत अचंबा वाटतो ती ही कीं, त्यावरून मेकालेस इग्लंदच्या फौजदारी कायद्याचें जे विलक्षण ज्ञान दिसून येते, ते त्यानें वकिलीचें काम किती अल्प केलें होतें ह्याचा विचार करतां, त्यास प्राप्त झालें कसें? एकाद्या गोष्टीच्या एकदम मुळाशीं कसें जावें, व भुंसापासून दाणा निराळा कसा काढावा, ही देणगी त्यास विलक्षण तऱ्हेची प्राप्त झालेली असली पाहिजे.......”

आतां मेकाले कलकत्त्यास होता तेव्हां त्याची सामान्य रहाणी

कशी असे ह्या विषयीं दोन शब्द सांगूं. सामान्य आंग्लो-इंडियन पुरुषांचा असा प्रघात असतो कीं, सूर्योदयानंतरचे दोन तास घोड्यावर बसून बाहेर फिरण्यांत घालवावयाचे व स्त्रियांचा प्रघात असा असतो कीं, रात्रीची झोपेंत जी उणीव पडली असेल ती भरून काढावयाची. मेकालेचा प्रघात हे दोन तास हातांत पुस्तक घेऊन बंगल्या सभोंवतालच्या बागेंत हिंडत रहावें असा असे. अशा रीतीनें हा वाचीत असतां रोज सकाळीं नेमल्या वेळीं त्याच्या बाळ-भाचीनें तेथें यावें, आणि सकाळीं चहाबरोबर जी भाकर हा खात असेल तिचे तुकडे कावळ्यांस घालण्याची करमणूक करावी; हा विधि चालला असतां सरासरी तिच्या एवढ्या त्या कावळ्यांपासून तिचें संरक्षण करतांना ह्यास पुरेपुरेसें व्हावें. कारण त्या कावळ्यांनीं ओटीच्या पायरीवर ती बसली असतां ह्या तुकड्यासाठीं तिच्याभोंवतीं सारखें नाचत व उडत असावें. नंतर उन्ह होऊन तो घरांत गेला ह्मणजे त्यानें स्नान, पोषाक, ह्या कामास लागावें आणि नंतर न्याहारी करावी.

ज्या दिवशीं सुप्रीम कौंसिलाची किंवा कायदेकमिशनची बैठक असेल त्या दिवशीं अर्थात् त्याला आपला दिवस घराबाहेर खर्च करावा लागत असे; पण एरवीं त्यानें आपलें कायद्यासंबंधानें लिहिण्यावाचण्याचें व शिक्षणखात्यासंबंधीं सर्व काम आपल्या पुस्तकालयाच्या निवांत जाग्यांत करीत असावें. कधीं कधीं भेटी परत करण्यांत त्याची सकाळ खर्च होत असे; पण हा खर्च तो फार नाखुषीनें करी हें सांगावयास नकोच. ह्या संबंधानें तो ह्मणतोः—" सुदैवानें एथल्या लोकांस इतका उद्योग असतो कीं ते फार क्वचित् ' घरीं ' असतात. ( यूरोपियनांची अशी चाल आहे कीं ते कामांत असले किंवा त्यांस कोणास भेटावयाचें नसलें ह्मणजे

घरीं असले तरी नाहीं, म्हणून वर्दी द्यावयास शिपायास सांगून ठेवितात. ही चाल सर्व विश्रुत असल्यामुळें त्याबद्दल कोणास राग येत नाहीं, किंवा त्यांत खोटेपणाचाहि कांहीं अंश ते मानीत नाहींत.) धर्मोपदेशक खेरीज करून बाकी सर्व लोक कोठें ना कोठें तरी उपयुक्त कामांत गुंतलेले असतात, त्यामुळें आपली कार्ड टाकिली म्हणजे काम भागतें. पण हे पाद्री गृहस्थ मात्र दोन प्रहरीं नेहमीं घरीं असावयाचे; उताणे पडलेले, न्याहारीबद्दल कुरकुर करणारे, टिफिनाची वाट पहात बसलेले, आणि लेमोनेडसाठीं आरडाओरड करीत रहाणारे." मधल्या फराळानंतर तो मिसेस ट्रेव्हेल्यनशीं तिच्या फायद्यासाठीं ग्रीक ग्रंथांचें भाषांतर करीत किंवा फ्रेंच वाचीत बसत असे. सूर्यास्ताची वेळ नजीक आली, आणि वारा सुटला, म्हणजे तो आपल्या बहिणीबरोबर हुगळी नदीच्या तीरानें गाडींतून फिरावयास जाई, आणि नक्षत्रें चमकू लागलीं म्हणजे परत येई. नंतर मग मुख्य भोजन व्हावयाचें, व त्या वेळीं पुष्कळ वेळां बरीच मंडळी बोलावलेली असावयाची. हे ठराविक भोजनसमारंभ त्यास मुळींच आवडत नसत. तो म्हणतो:—ह्या भोजनांपेक्षां अधिक नीरस दुसरें कांहींच नसेल. जो तो आपल्या शेजारच्या माणसा-पलीकडे दुसऱ्या कोणाशीं बोलावयाचा नाहीं. संभाषण म्हणजे अगदीं ठराव मिकार असावयाचें. आणि ज्या अर्थी मला नेहमीं अत्यंत मोठ्या पदवीच्या—म्हणजे जमलेल्या मंडळी पैकीं अत्यन्त वृद्ध, अत्यन्त कुत्सित आणि अत्यन्त गर्विष्ठ अशा—बाईच्या शेजारीं बसावें लागतें, त्या अर्थी इतरांपेक्षां माझी दना फारच जास्त होते."

या वेळीं त्याचे मुख्य मित्र म्हटले म्हणजे कलकत्त्याचे चीफ जस्टिस सर एडवर्ड रायन, त्याचा जुना मित्र जस्टिस माल्किन, लॉ कमिशनचे सभासद क्यामरन व म्याक्लिऑड कंपनीच्या वृद्ध

नोकरां पैकीं म्याकनाटन. व तरुण नोकरांपैकीं म्यागल्स, कॉल्विन, व जॉन पीटर ग्रांट हे असत; ह्यांना तो स्वस्थपणानें जेवणास बोलावीत असे. प्रत्येक शुक्रवारीं ही मंडळी त्याच्याकडे न्याहारीस यावयाची; आणि लॉकमिशनचें त्या आठवड्यांत जेवढें काम झालेलें असेल, त्यांतील मुख्याच्या प्रत्येक गोष्टीवर चर्चा करीत बसावयाची; आणि जो जो मुद्दा निघेल त्याच्यावर कायद्याच्या संबंधानें, इतिहासाच्या संबंधानें, राजनीतिविषयक आणि व्यक्ति-विषयक अशा भाषणाचा असा कांहीं पूर यावयाचा कीं, चहाचे पेले रिकामे होऊन दोन प्रहर होण्याची वेळ आली, तरी मंडळी बसलेलीच; नंतर मग आफिसांत कामें तुंबलेलीं आहेत, व कागदांचे ढिगारे वाढत आहेत, ह्याची आठवण होऊन, कसेंसेंच पाहून, प्रत्येकानें आपापल्या हपीसाचा रस्ता धरावयाचा.

अशा रीतीनें जरी ह्याचा कलकत्ता येथें आयुष्क्रम चाललेला होता, तरी त्याला स्वदेशीं केव्हां जाईन असें वरचेवर फार वाटे. तो लिहितोः—" इंग्लंदास येण्याकरितां मी किती झुरतों आहें, आणि हा देशत्याग जरी मी बऱ्याच रीतीनें सहन केला आहे, तरी तो मला किती कडू वाटतो, हें तुह्मांस ( बहिणींस ) सांगण्यास मजपाशी शब्द नाहींत. मला असें वाटतें कीं, जणूं काय आपला देश पुनः एकदा पहावा व मरावें ह्या खेरीज मला दुसरी कोणती इच्छाच नाहीं. मी तुह्मांला खात्रीनें सांगतों हा देशत्याग ह्मणजे हलकी गोष्ट मुळींच नाहीं. ज्याला त्याचा अनुभव नाहीं, त्या माणसाला त्याचा बरोबर अंदाज करतां येणें नाहीं. आयुष्यक्रमाच्या सर्व संबंधींची पूर्ण क्रांति; बहुतेक प्रत्येक जुना मित्र व ओळखीचे माणूस यांची ताटातूट; वनवासी व त्याच्या सर्व प्रिय गोष्टी ह्यांच्या-मध्यें १५००० मैल पसरलेला महोदधि; हें सर्व मला तरी फार

जड जाते. कितीही द्रव्याच्या किंवा अधिकाराच्या लालचीनें हें संकट आपल्यावर पुनः ओढून घेण्याच्या मोहांत मी खचीत पडणार नाहीं. इ. इ."

तथापि असेल त्यातच आनंद मानून घ्यावयाचा असा याचा स्वभाव असल्यामुळें, ह्यापेक्षाहि वाईट ठिकाणीं आपल्यास जावें लागलें नाहीं, त्याबद्दल समाधान मानण्यास तो नेहमीं तयार असे. उदाहरणार्थ, इंग्लंदांतील एका मित्रास लिहितांना तेथील दुःखांचें वर्णन करून तो ह्मणतोः—आह्माला ह्या देशांत दुःखांचा आमचा वाटा भोगावा लागत आहे हें खरें आहे. वर्षांतून चार महिने आह्मी भाजून निघत असतों, चार महिने शिजून निघत असतों, आणि बाकीचे चार महिने साधल्यास आह्मी पुनः थंड व्हावें एतदर्थ आह्मास दिलेले असतात. ह्या वेळीं ऊन भट्टीसारखें प्रज्वलित झालें आहे. पावसाच्या लोटांनी भुरून गेलेल्या जमिनी-तून, ओल्या घोंगडींतून जशी वाफ निघावी, तशी निघत आहे. सभोंवतीं सर्वत्र झाडझाडोरा कुजत आहे. पण आमचें वातावरण जरी गरम आहे तरी आमचे तटे सोमाळे आहेत. ...... आमच्या येथेंहि आमच्या लहानशा स्केलावर चळवळ्ये आहेतच, पण पलीचे सुसरीशी जितकें साम्य आहे, तितकें त्याचें ओकानेलशीं आहे."

१८३७ चा पावसाळा फार रोगट गेला. तो ह्याच्या बहिणी-शिवाय बाकी सगळ्यांना भोंवला. तिचा नवरा व तिची लहान मुलगी ही बरेचवर आजारी पडली. खुद्द मेकालेला देखील एकदा धपाटून ताप भरला, पण दोन तासातच उतरला; मात्र त्याचा अशक्तपणा पुढें १५ दिवस कायम होता. पहिल्या वेळाप्रमाणें हा ज्वर आणखी एक वर्ष इकडे काढता, तर याजपाशीं आणखी एक

लाख रुपयांची पुंजी असता असावी अशा, पण ती त्या बेताने वर्षाची नाहीं. शिवाय, त्याचा चुलता जनरल कॉलिन मेकाले हा या सुमारास वारला होता; त्यानें यास आपल्या मृत्युपत्रांत दहा हजार पौंड लिहून ठेविले होते. तो ह्मणतो, मला एकट्याला एवढें द्रव्य पुरे आहे; आणि मी लग्न करीन असें कांहीं दिसत नाहीं. असें ह्मणून तेवढ्यावर तृप्त राहून त्यानें निघण्याचा बेत केला. आपली कौन्सिलच्या संबंधाचीं, लॉकमिशनसंबंधी, व शिक्षण खात्यासंबंधीं, सर्व अर्धवट राहिलेलीं कामें पुरीं केलीं, आणि बहीण, मेव्हणा व त्यांचें अपत्य यांच्या समवेत १८३८ च्या पहिल्या पंधरवड्यांत त्यानें जहाजावर पाय ठेविला.

या वेळचा त्याचा पत्रव्यवहार बहुतेक एलिस यांच्याशींच झाला आहे. त्यांत बहुतेक आपण ग्रीक, फ्रेंच, इंग्लिश वगैरे पुस्तकें कोणकोणतीं वाचिलीं व वाचीत आहों, त्यामध्यें आपणाला कोणाबद्दल काय वाटतें, वगैरे गोष्टींबद्दलच विशेष उल्लेख आहे. तीं पत्रें वाचिलीं ह्मणजे ह्यास सरकारी व सार्वजनिक कामें इतकीं करावयाचीं असतां इतकें इतर वाचन करण्यास वेळ कसा सांपडे, ह्याचें खरोखरीच फार आश्चर्य वाटतें. कालेजांत शिकलेलीं पुस्तकें पुनः वाचणें, आणि त्या वेळच्या व मोठे वयांतील वाचनामध्यें केवढा फरक पडतो, हें पाहणें हें किती असामी करीत असतील बरें ? पण मेकाले त्यांपैकीं एक होता, व ह्याचा अशा मंडळींत बहुधा वर नंबर लागेल. तो ह्मणतो:—लहानपणीं कोणताहि शब्द अडला कीं शब्दकोशाकडे धांव घ्यावयाची, कोणतेंहि वाक्य अडलें, ह्मणजे त्याचा अर्थनिर्णय अगोदर करून घ्यावयाचा, व एकंदर अर्थापेक्षां, वाक्या वाक्याच्या अर्थाकडे विशेष लक्ष्य लाव-णें, अशी प्रवृत्ति असते; पण हल्लींची माझी वाचनपद्धति अशी

लिपली आहे. अडलेला शब्द वाक्यार्थास विशेष महत्वाचा नसला ह्मणजे मी तसाच सोडून देतों. एकादें वाक्य अडलें तर आणखी एकदा वाचून पाहतों; अर्थ लागला तर बरेंच, नाहींतर केली त्याच्यावरून मंडूकप्लुति, व चालला पुढें. प्रसिद्ध ग्रीक इतिहासकार थ्युसिडैडिस व हिरोडोटस ह्यांची तो फारच प्रशंसा करितो, व एकंदरींत ल्यातिनपेक्षां ग्रीक भाषेतील ग्रंथ त्यास विशेष आवडत असें दिसतें. ह्या जुन्या ग्रथांच्या वाचनाशिवाय इंग्रजी, स्पानिश, फ्रेंच वगैरे भाषांतील ग्रंथांचें त्याचें वाचन चाललेलेंच असे; आणि त्याशिवाय तो कादंबऱ्या इतक्या वाची कीं, सामान्य दोन माणसांस तेवढेंच त्याचें वाचन पुरेसें व्हावें.

इतकें तो वाची तेव्हां तें कसें तरी ओरबाडून टाकीत असेल असें कोणास वाटण्याचा संभव आहे; पण तशी मुळींच स्थिति नसे. एकादें वाक्य, किंवा वचन, किंवा प्यारा, बरासा वाटला ह्मणजे त्याच्याखालीं त्याच्या योग्यतेनुरूप एक, दोन, तीन रेघा काढावयाच्या असा त्याचा परिपाठ असे: शिवाय पृष्ठाच्या बाजूस त्याबद्दल आपलें काय मत असेल तें नमूद करून टाकावयाचें, अशीहि त्यास सवय असे. इतकेंचसें काय, पण पुस्तकछपाईंत जीं अशुद्धें राहिलीं असतील, किंवा जे विराम चुकले असतील, ते देखील तो शुद्ध करीत असे; जणू काय हा प्रुफरीडरच आहे, व त्याला ह्या पुस्तकाची पुनरावृत्ति काढावयाची आहे!

दुसरी एक गोष्ट ह्या पत्रव्यवहारावरून व्यक्त होते ती ही कीं, तो जरी राजकारणांत पडला होता, व द्रव्यविषयक स्वातंत्र्यप्राप्त्यर्थ त्यानें जरी नोकरी पत्करिली होता, तरी त्याचें सगळें अंतःकरण आपण आपलें आयुष्य अध्ययन व लेखन ह्यांत घालवावें, ह्या गोष्टीकडे असे. पुढें जो इंग्लंदाचा इतिहास त्यानें लिहिला, त्याची

स्वप्न त्याला एव्हांपासून पडूं लागलें होतें, व पुढें तो कोणत्या धोरणावर लिहावयाचा, ह्याचा नमुना तो एव्हांपासून मनांत रेखाटून ठेवूं लागला होता. त्याच्या पत्रांतून वारंवार असे उद्गार दृष्टीस पडतात. "ज्याला पुढें येण्यास राजकारणाशिवाय दुसरा मार्ग नसेल त्यानें त्यांत पडावें हें ठीक आहे. पण ज्याला वाङ्मय व राजकारण हीं दोन्हीं द्वारें खुली आहेत, त्यानें वाचन व लेखन ह्यांतील मजा सोडून देऊन, स्वच्छ हवा, मनाची शांति, उच्च बुद्धीच्या व मनोवृत्तीच्या आत्म्यांशीं समागम, इत्यादि फायदे सोडून हौस आव् कॉमन्स मधील घाणेरडी हवा, रात्रीचीं जागरणें, भिकार भाषणें, स्वपक्षाची अधवत् सेवा, ह्या गोष्टी कां पत्कराव्या हें मला समजत नाहीं." बाकी तो असेंहि सांगून ठेवितो कीं, हे सगळे माझे एथले (हिंदुस्थानांतलि) विचार आहेत. लंदनमध्यें मी गेलों ह्मणजे काय होईल तें नकळे. तथापि पुढें जरी तो पुनः पार्लमेंतांत शिरला, व खुद्द मुख्य प्रधानमंडळांत जरी त्याचा प्रवेश झाला, तरी त्याची वाग्देवीवरची भक्ति, व तिची विशेष आवड, हीं यत्किंचित्‌हि कमी झालीं नाहींत. नवे नवे ग्रंथ वाचावयास मिळावे ह्मणून तो नवीन भाषा शिकावयास देखील मागें पुढें पाहत नसे. हिंदुस्थानांतून परत जाते समयीं जहाजावर जे तीन चार महिने मोडतील, तेवढ्या अवधींत त्यानें जर्मन भाषा शिकण्याचें ठरविलें, व शिकण्यास निघण्याच्या पूर्वींच सुरवात केली. तो जें लिही तें केवळ द्रव्याच्या लालचीनें नव्हे, हें त्यानें हिंदुस्थानांत येते समयीं नेपियरशीं जो ठराव केला, त्यावरूनच दिसतें. त्याचे लेख इतके लोकप्रिय असत, तरी अमुक लेखाबद्दल मला अमुक द्या, असा त्यानें रिव्ह्युकारांशीं कधीं करार केला नाहीं. इतकेंच नव्हे, तर बेकनवरचा लांबलचक निर्बंध तयार झाल्यावर त्यानें जेव्हां क्लैव किंवा टेंपल (इंग्लिश-मुत्सद्दी,

सर विल्यिम टेंपल, १६२८–९९ ) याजवर लेख लिहिण्याचें मनांत आणिलें, तेव्हां तो नेपियर यास कळवून ह्मणतो, " ह्या विषयांवर तूं दुसऱ्या कोणास लिहावयास सांगितलें असलेंस तरी पंचाइतींत पडूं नको. माझे लेख प्रसिद्ध न झाले, किंवा त्याबद्दल मला कांहीं मोबदला न मिळाला, तरी चालेल. कारण माझे लिहिण्याचे श्रम मी लिहीत असतां जो मला आनंद होतो, त्यानेंच भरून येतात." याचें नांव शुद्ध विद्याप्रेम !

# प्रकरण ६ वें.

## क्याबिनेटांत प्रवेश.

तो ज्या जहाजांतून निघाला तें चालण्यांत फार मंद अशी त्याची प्रसिद्धि होती, व ती त्यानें या वेळींहि खरी करून दाखविली. त्याला विलायतेस परत जाऊन पोहोंचण्यास सहावा महिना उजाडला. हा इतका विलंब लागल्यामुळें व केप आव् गुडहोपला वेढा घातल्यावर त्या तारवांस फार वादळी हवा लागलेली कळली असल्यामुळें, लंदनांत अशी अफवा उठली कीं तें तारूं बुडून त्यावरचे सर्व लोक तत्वत् झाले. हें ऐकून किती तरी व्हिगपक्षीय लोक कंपनीच्या हपिसांत चवकशी करण्याकरितां लंदन येथें गेले. यावरून त्याच्या बापास व भावंडांस काय वाटलें असेल याचा सहज अंदाज होतो. तो गेल्यापासून त्यांस अगदीं कसेसेंच झालेलें होतें. त्यांना त्याच्याविना घर उदास दिसूं लागलें होतें. त्याची एक बहीण लिहिते:—" टॉम गेल्यापासून आम्हास सूर्य मावळल्यासारखें झालें आहे. त्याच्या जाण्यानें जी खिंड पडली आहे, ती कधींच भरून येण्यासारखी नाहीं. तो असा कांहीं विलक्षण प्राणी आहे कीं, त्याच्या वरचेवर घरीं येण्यानें आमच्या या एकतालीय आयुःक्रमास एक प्रकारचा ताजेतवानेपणा येत असे; पण हल्लीं दिवस असे उजाडत आहेत व मावळत आहेत कीं त्यामुळें आम्हास कांहींच मजा वाटत नाहीं; [illegible] कधीं कधीं [illegible] जमाना [illegible] [illegible] [illegible]. "

जसजसे दिवस ज्यास्त जात चालले, तस तशी ह्या स्थितींत सुधारणा झाली नाहीं. पुष्कळ माणसांचें असें होतें कीं, त्यांचें ह्या जगांतील काम संपलें ह्मणजे तेव्हांपासून तों त्यांचे डोळे मिटत तोंपर्यंत त्यांचीं वर्षे दुःख, आशा, व निराशा ह्यांमध्यें जात असतात. ते आपल्या जीवास कंटाळून जातात, व त्यांस हें जग एकदां केव्हां सोडून जाईन असें होतें. तशी झशारी मेकालेची या वेळीं स्थिति झालेली होती. त्याची प्रकृति अशक्त होत चालली होती, त्यास डोळ्यांनीं बरोबर दिसेनासें होऊं लागलें होतें; आणि इतके दिवस लोकहित करण्यांत त्यानें इतके श्रम केलेले असल्यामुळें आतां आपल्या हातून कांहीं होत नाहीं, असा विचार मनांत येऊन आपण निरुपयोगी व निराश्रित झालों असें त्यास वाटावयास लागलें होतें. शिवाय परावलंबीपणाबद्दल त्याला आतां फारच वाईट वाटत होतें. अशी त्याची अवस्था झाली असतां, त्याचीं मुलें जलप्रवास करीत होतीं त्या अवधींत त्याची प्रकृति फारच बिघडली, आणि मे महिना संपण्याच्या पूर्वींच, त्यांची याची पुनः भेट न होतां, त्यानें परलोकचा रस्ता धरिला. गुलामगिरी बंद करण्याच्या सत्कृत्यांत ज्यांनीं याच्यासारखेंच तनमनधन खर्च केलें होतें ते बहुतेक—विल्बरफोर्स, हेन्रीथार्न्टन, बाबिंग्टन, वगैरे—ह्याच्या आधींच निघून गेले होते. विलबरफोर्सप्रमाणें ह्यालाहि याची योग्यता जाणून वेस्टमिन्स्टर आबे येथें पुरिलें.

मेकाले परत आल्यावर, जें काम त्याच्यासाठीं पुरें व्हावयाचें थांबलें होतें, तें बरेंच अप्रिय होतें. त्यानें हिंदुस्थानांत असतांच सर जेम्स म्याकिंटाश ह्याच्या १६८८ च्या राज्यक्रांतिच्या इतिहासावर टीकात्मक लेख लिहिला होता, त्या ग्रंथाचा संपादक एक वॉलेस नामक कोणी होता; त्यानें म्याकिंटाशचें चरित्र ह्मणून त्या

ग्रंथास जोडून त्याच्या लहानपणच्या गोष्टी काढून त्याजबद्दल बरेंच फाजिलपणाचें लिहिलें होतें. म्याकिंटाशबद्दल मेकालेच्या मनांत फार पूज्यबुद्धि असल्यामुळें त्यानें त्या अव्यापारेषु व्यापाराबद्दल वालेसला बरेच जोडे मारिले होते. त्याबद्दल त्या गृहस्थास राग येऊन तो सूड घेण्याकरितां त्याची विलायतेस परत येण्याची वाट पाहत होता. ह्मणून हा येतां क्षणींच त्यानें यास द्वंद्वयुद्धास आव्हान केलें; व बहुतेक या दोघांचे वार उडण्याचा वेळ आला होता; पण यांच्या एका दोघांमित्रांच्या मध्यस्थीनें तें टळलें. त्यांनीं अशी तोड काढिली कीं, वालेस यानें म्याकिंटाशची नालस्ती करण्याचा आपला उद्देश नव्हता असें ह्मणावें, व नंतर मेकालेनें त्याजवर एवढा ताशेरा ओढल्याबद्दल आपला खेद प्रदर्शित करावा. ही तोड दोघांसही मान्य झाली, व तो तंटा मिटला.

यावेळीं सरवाल्टर स्काट यास मरून पांच सहा वर्षें झालीं होतीं. त्याचें प्रसिद्ध व विस्तृत चरित्र त्याचा जांवई लाखार्ट यानें लिहून प्रसिद्ध केलें होतें; त्याजवर टीकात्मक लेख लिहावयास नेपियरानें यास विनंति केली. पण काव्य वगैरे वर टीका करणें हा आपला विषय नाहीं, व शिवाय स्काटचे ग्रंथ जरी आपणास प्रिय आहेत, तरी त्याचें वर्तन आपणास सर्वांशीं पसंत नाहीं; त्यानें बेताबाहेर खर्च करून, व धंद्यांत पडून अस्ताव्यस्त कर्ज करून, तें फेडण्या-साठीं ग्रंथ आगगाडीच्या वेगानें खरडण्याचें जें काम सुरू केलें, तें आपणास पसंत नाहीं, असें सांगून, व स्काटविरुद्ध लेख एडिंबरो रिव्ह्यूंत येणें बरोबर नाहीं असें सुचवून, त्यानें तें काम नाकारिलें; व रिव्ह्यूचा संपादक लार्ड जेफ्री हा तें करण्यास सर्वतोपरी योग्य आहे, अशी त्यानें शिफारस केली.

लंडन येथें परत आल्यापासून याची लोकमित्रता फार वाढली

होती, व फराळांचीं आणि मेजवान्यांचीं आमंत्रणें रोज यावयास लागलीं होतीं; मधला सगळा दिवस भेटी देण्यांत व घेण्यांत जात असे. शेवटीं तो या स्थितीस कंटाळला, व लंदन सोडून कोठें तरी खेड्यांत जाऊन रहावें, व आपल्या इतिहासलेखनाच्या इष्ट उद्योगास लागावें, असे विचार याच्या मनांत येऊं लागले. परंतु हें सर्व निश्चित करण्यापूर्वीं आपल्या वारलेल्या बहिणीच्या लहान्या मुलांस एकदा पहावें म्हणून तो लिव्हरपूल येथें गेला; आणि नंतर बापाच्या मृत्यूचें वगैरे जें दुःख झालें होतें त्याचा विसर पडावा म्हणून इटाली देश व विशेषतः पोपाचें निवासस्थान जें रोम शहर तें पाहावयास जाण्याचा त्यानें बेत केला; व तदनुरूप आक्टोबरच्या १५ वीच्या सुमारास त्यानें प्रयाण केलें. त्यास सृष्टिसौंदर्याचें तिखटमीठ लावून वर्णन करावयास बेताचेंच येत असे. पानें हिरवीं होतीं, आकाश निळें होतें, शेतें सुपीक दिसत होतीं, डोंगर वृक्षवल्लींनीं आच्छादित होते, इतकें लिहिलें कीं झालें याचें सृष्टिवैभवाचें वर्णन. यामुळें या वेळची याची रोजनिशी फारशी मनोहर वाटत नाहीं.

तो इटलीदेशांत फिरत असतां त्या वेळचा मुख्य प्रधान लार्ड मेलबर्न यानें यास जज्ज आडव्होकेटची जागा देऊं केली. त्या जागेचा पगार सालाचा २५०० पौंड होता. तथापि त्या कामगाराचा क्याबिनेटांत प्रवेश नसल्यामुळें, व आतां नोकरी करावयाची तर क्याबिनेट प्रधानाचीच करावयाची असा याचा निश्चय असल्यामुळें, यानें ती नाकारिली. आणि उलट असा निरोप पाठविला कीं, लहान सहान जागा करणें माझ्या मनास पत्करत नाहीं, व तुमच्या बरोबरीची जागा मागण्याचा माझा अधिकार नाहीं; एतदर्थ मला तुह्मी नुसता पार्लमेंताचा सभासद पुनः होण्याच्या कामीं मदत कराल, तर मी खुशीनें होईन. आणि मी स्वतंत्र असलों।

तर तुमच्यां, ह्मणजे व्हिगपक्षाच्या, मी जितका उपयोगीं पडण्याचा संभव आहे, तितका परतंत्र असतां नाहीं. कारण स्वतंत्र सभासदाच्या ह्मणण्यास कामन्स सभा जितका मान देते, तितका प्रधानांच्या ओशाळ्या मनुष्याच्या ह्मणण्यास देत नाहीं.

अशा रीतीनें नाकारणीचें पत्र लार्ड मेल्बर्न यास लिहिल्यावर त्याच विषयावर लार्ड लान्स्डौन यासहि रोमयेथून एक पत्र लिहिलें, त्यांत वरील कारणें सविस्तर दाखवून त्यानें आणखी असें ह्मटलें होतें कीं, जरी माझ्या मनाचा कल बाकीचें आपलें आयुष्य ग्रंथलेखनाच्या शांत कामांत खर्च करावें असें आहे, तरी व्हिगपक्षास सद्यः हुशार अशा मंडळीचें असावें तसें पाठबळ नाहीं, हें जाणून त्या पक्षासाठीं पार्लमेंताचा सभासद होण्यापासून माझ्या स्वास्थ्याचा, द्रव्याचा, व वेळाचा जेवढा व्यय होण्याचा संभव आहे, तेवढा करण्यास मी सिद्ध आहें. आणि नोकरी नाकारिल्यामुळें द्रव्यदृष्ट्या जरी माझें थोडें नुकसान होणार आहे, तरी तेणेंकरून लोकांस माझा उपयोग ज्यास्त होणार आहे; याकरितां तें मी सोसण्यास तयार आहें. हें त्याचें ह्मणणें त्याच्या सर्व मित्रांस पसंत पडलें; व तूं प्रस्तुत जागा नाकारिलीस तें बरें केलेंस, असें ते त्यास ह्मणाले.

१८३९ च्या फेब्रुवारीच्या पहिल्या आठवड्याच्या अखेरीस मेकाले फ्रान्साच्या वाटेनें लंदनास परत आला. या वेळीं ग्लाडस्टन साहेबाचें 'चर्च ॲण्ड स्टेट' (धर्मसंस्थान आणि सरकार) हें पुस्तक नवीन प्रसिद्ध झालें होतें. त्याची कृति जरी यास बिलकूल पसंत नव्हती, तरी त्याची एकंदर लेखनशैली यास बरीच आवडली व त्यानें त्यावर प्रतिकूल पण गोड भाषेंत असा टीकात्मक लेख एडिंबरो रिव्ह्यूंत लिहिला. तेव्हांपासून त्याचा याचा बराच स्नेह जमला, मापूर्वीं रोम येथें याची त्याची एकदां मुलाखत झाली होती. त्याक

स्टननें हा लेख पाहून त्यास एक आभारप्रदर्शक पत्र पाठविलें; त्यांत त्यानें असें लिहिलें होतें कीं आपण विरुद्ध पक्षाचे (ग्लाडस्टन या वेळीं टोरी पक्षाकडे होता ) असून प्रस्तुत लेखांत मनाची इतकी समता ठेविली आहे कीं, ती विरुद्धपक्षाच्या ठिकाणीं बहुतेक असंभाव्य दिसते. हें पत्र मेकालेस किती आवडलें याची एक साक्ष अशी कीं, त्यानें तें आपल्या नेहमीच्या शिस्तीस अनुसरून वाचून झाल्यावर जाळून टाकिलें नाहीं. मेकालेनेंहि त्यास फार गोड गोड असें उत्तर लिहिलें; त्यांत असें नमूद केलें होतें कीं, तुमच्याबद्दल तुमच्या विरोध्यांकडून देखील जी हकीकत मला कळली आहे, त्यावरून माझा तुमच्याबद्दल अनुकूल ग्रह होऊन गेला आहे, व तो प्रस्तुत पत्रानें ज्यास्तच वृद्धिंगत होणार आहे.

या दोन्ही पत्रांवरून विरुद्धपक्षांमध्यें या वेळीं जो कडुपणा असेल असें दिसून येतें, तो हल्लीं कोणास खरा देखील वाटावयाचा नाहीं. कारण हल्लींचा मनु अगदीं बदलला आहे. हल्लीं विरुद्धपक्ष राजकीय कारणाच्या संबधानें एकमेकांशीं किती जरी भांडत असले, तरी एकमेकाविषयींची सन्मान बुद्धि वगैरे यांत बिलकूल कमी करीत नाहींत. अर्थ तोच, पण शब्द गोड, व भाषणशैली अबाध्य, अशी हल्लींची तऱ्हा आहे. पण १८३९ त स्थिति अगदीं भिन्न होती. व्हिगकारभाराचा आतां अंत होण्याचा समय आला होता, व राजकीय कारणाच्या संबंधानें तो आणीबाणीचा प्रसंग होता. आणि असा प्रसंग आलेला असला ह्मणजे ज्या अनिष्ट व गर्हणीय गोष्टी घडून येत असतात त्यांची या वेळीं समृद्धि झालेली होती. सार्वजनिकरीत्या द्वेष करणें, खाजगी रीतीनें एकमेकांस शिव्यादेणें, इत्यादि गोष्टींना असा ऊत आला होता कीं, सर रार्बट वालपोल याच्या अधिकारच्युतीपासून ( १७४२ ) तसा कोणीं कधीं पाहिला नसेल.

मेल्बर्नच्या प्रधानमंडळानें देशाच्या फार मोठ्या कामगिऱ्या बजाविल्या होत्या; आणि सर्वांत मोठी कामगिरी बजाविली होती ती ही कीं, त्यांनीं आपल्यास अधिकारारूढ करून घेऊन आजपर्यंत आपलें अस्तित्व कायम टेविलें होतें. असें ह्मणण्याचें कारण असें. १८३४ च्या नवंबर महिन्यांत कामन्स सभेंत व्हिगपक्षाचें प्राबल्य असतांहि राजानें आपल्या स्वेच्छेच्या व खुशीच्या जोरावर टोरी प्रधानमंडळ नेमिलें. त्या वेळीं लार्ड जान रसेल यानें मोठ्या धैर्यानें व चातुर्यानें जो हल्ला व्हिगपक्षाकरवीं ह्या प्रधानमंडळावर सुरू केला, तो वर वर पाहणारास जरी केवळ आपलपोटेपणाचा ( आपल्याला अधिकार मिळावा ह्मणून ) वाटण्याचा संभव होता, तरी त्याचा वास्तविक उद्देश इंग्लिश राजनीतीच्या तत्त्वांपैकीं अगदीं मुख्य अशा तत्त्वाचा एकदाचा कायमचा निकाल लावून घ्यावा, व त्याची अबाधित स्थापना करून टाकावी, हा होता. खरोखरच पाहतां सर राबर्ट पीलच्या ह्या वेळच्या राज्यकारभाराविरुद्ध जीं जीं मतें दिलीं गेलीं, व जीं जीं भाषणें झालीं, तीं सर्व यथायोग्यच होतीं. त्यांतील प्रत्येकापासून इष्ट कार्यसिद्धीस मदत झाली. राजानें पाहिजे ते ह्मणून नेमिलेले प्रधान कबूल करण्याच्या ऐवजीं ते नेमण्याचा वास्तविक अधिकार लोकांसच आहे, राजास नाहीं, हें तत्त्व सिद्ध करण्यासाठीं लागेल तितका वेळ व लागेल तितकी शक्ति ह्यांचा खर्च करणें हें योग्यच होतें. व्हिक्टोरिया राणीच्या छत्राखालींच वृद्ध झालेल्या लोकांस ह्या १८३५ च्या सेशनाची हकीकत वाचून चमत्कार वाटतो. कारण लोकांची निवडणुकीच्या वेळीं जशी इच्छा दिसून येईल त्याप्रमाणेंच प्रधान निवडावयाचे, त्यांच्या इच्छेबाहेर कधीं जावयाचें नाहीं, हें तत्त्व तिनें आपल्या दीर्घकालीन व सुखकारक कारकीर्दींत जसें काय स्थापूनच

टाकिलें आहे, आणि अशा रीतीनें तिनें जणूं काय १६८८ च्या महाक्रांतीनंतर ही एक दुसरी महाक्रांतिच घडवून आणिली आहे. आणि ही क्रांति तिनें हल्लकल्लोळ व गडबड मुळींच न करितां घडवून आणिली आहे, ही गोष्ट तर तिला विशेषच भूषणास्पद व लोकांस विशेषच हितकर झालेली आहे. पण सध्याची स्थिति अशी असल्यामुळें, लोकांच्या इच्छेकडे मुळींच लक्ष न देतां वाटेल ते प्रधान नेमावयाचे, हा जो तिसऱ्या जार्जाचा प्रघात, ज्यापासून त्यानें देशाचें इतकें नुकसान केलें, तो प्रघात त्याचा मुलगा चवथा विलियम हा पुनः चालूं पाहतो, असें पाहून व्हिगपक्षीय राजकारणी पुरुषांस किती राग आला असेल, व त्यांचीं मनें किती अस्वस्थ झालीं असतील, ह्याची सध्या कल्पना देखील करण्याची मुष्कील पडते. असो; पण अशी त्यांच्या मनाची स्थिति झालेली असल्यामुळें पीलला अधिकारच्युत करणें हेंच लोकांच्या पुढाऱ्यांचें सध्याचें कर्तव्य आहे, असें त्यांस वाटलें, व ती गोष्ट साध्य होई तोपर्यंत ते थांबले नाहींत ह्यांत नवल नाहीं. पण अशा रीतीनें ते जे निश्चयानें व धिरानें लढले, त्याचा खरा अर्थ सर्वांस बरोबर न समजल्यामुळें व ज्यांस तो समजला नाहीं त्यांस तें करणें केवळ आपस्वार्थाचें वाटल्यामुळें, परिणाम असा झाला कीं त्यांस अनेक नवे शत्रू उत्पन्न झाले, व त्यांचे जुने शत्रू पहिल्यापेक्षां त्यांचा ज्यास्त द्वेष करूं लागले. राग, भीति, आणि गैरविश्वास यांच्या लाटा तेणेंकरून उचंबळूं लागल्या, आणि त्यांची वेळ आली तेव्हां त्यांना अधिकारच्युत करी तोपर्यंत त्या थांबल्या नाहींत; १८३५ च्या वादविवादांच्यावेळीं जे मनोविकार तप्त झाले ते १८४१ च्या सामान्य निवडणुकीच्या वेळीं व्हिगपक्षावर जी लाट उसळून त्यांस सपशेल फुकविती झाली, त्या लाटेनेंच निवाले.

सरकारच्या कामांत अडथळा आणून त्यास त्रास द्यावयाचा, ही जी विरुद्धपक्षाची एक युक्ति आहे, व जिचा होमरूलाच्या वेळीं ऐरिश सभासद एवढा फायदा घेत होते कीं त्यांनीं ग्लाडस्टनासारख्यास देखील थकविलें; त्या युक्तीचा उपयोग व्हिक्टोरियाराणी गादीवर बसण्या पूर्वींच्या व नंतरच्या तीन सेशनांत जेवढा टोरी लोकांनीं, व विशेषत: लार्डांच्या सभेंतील टोरी मुत्सद्यांनीं, केला, तितका कोणीं कधींच केला नसेल; व त्यांत त्यांस जितकें यश आलें, तितकें यशहि कधींच कोणास आलें नसेल. मेकाले लिहितो:—"लार्डांच्या सभेंत प्रधानांची स्थिति किती धोक्याची आहे, ह्याबद्दल लार्ड क्याडोगन मजपाशीं बरेंच बोलला. त्यांच्या काळचा पहिला वक्ता जो लार्ड ब्रूम तो त्यांजविरुद्ध आहे, शिवाय, ज्याची सन्मान्यता लोकांत आज एवढी आहे, तो ड्यूक आव वेलिंगटन ह्यांच्या विरुद्ध आहे; शिवाय लिंढर्स्ट, आबरडीन, एलेनबरो, आणि इतर हे आहेतच; आणि ह्यांपैकीं प्रत्येक जण आमच्या (व्हिग पक्षीय) बाजूच्या अगदीं उत्तम वक्त्याला देखील पुरून उरण्यासारखा आहे. आणि अशा रीतीचें वक्तृत्वविषयक श्रेष्ठत्व त्यांच्याकडे असून शिवाय त्यांस संख्याविषयक श्रेष्ठत्वाचा मागून हुजोरा आहे." हे जे दोन प्रकारचे फायदे टोरीपक्षाच्या बाजूस ह्या वेळेस होते, त्यांचा त्यांच्या अग्रणींनीं फार शिताफीनें लागून फारच फायदा करून घेतला. प्रश्न लहानच होता. ऐर्लंडांतील प्राटेस्टंट धर्म संस्थानांची जी मिळकत होती तिच्या व्यवस्थेंत सुधारणा केल्यामुळें कांहीं जास्त पैसे उत्पन्न व्हावयाचे होते; त्यांचा उपयोग त्याच देशांतील सार्वजनिक शिक्षणाकडे करावा, व ज्यांच्या शिक्षणाकडे ते पैसे खर्च करावयाचे ते कोणत्या धर्माचे आहेत, प्राटेस्टंट आहेत कीं रोमन क्याथलिक आहेत, इकडे पाहूं

नये, अशी प्रधानांनीं सूचना पुढें आणिली; त्यावर विरुद्ध पक्षानें अशी प्रतिसूचना आणिली कीं, ह्या चर्चचा पैसा चर्चच्याच अधिकाऱ्यांच्या स्वाधीन करावा, व त्याचा त्यांनीं पाहिजे तशी वासलात लावावी. हा वादप्रश्न टोरीपक्षाच्या लोकांस मोठा सोईचा होता, कारण आह्मी स्वदेश आणि स्वधर्म ह्यांच्या करितां भांडत आहों, असें दाखवून अज्ञानजनमत प्रधानांविरुद्ध करण्यास त्यांस चांगली संधि होती. (ह्या ठिकाणीं एक गोष्ट ध्यानांत ठेविली पाहिजे कीं, ऐर्लंदांत तीन चतुर्थांशांहून जास्त प्रजा जरी क्याथलिक धर्माची आहे तरी ह्या वेळीं तेथें जी सरकारी धर्मसंस्था होती ती प्राटेस्टंट होती, व तिचा खर्च अर्थात् कराच्या उत्पन्नांतून ह्मणजे मुख्यत्वेंकरून क्याथलिक लोकांनीं कररूपानें दिलेल्या पैशांतून भागत होता. शिवाय, तेथील युनिव्हर्सिट्या व कालेजें हींहि त्याच खर्चांतून चालत असून तीं प्राटेस्टंट धर्मीय असल्यामुळें तेथील बहुजनांस त्यांचा काडीचा उपयोग होत नसे; व त्यांच्या शिक्षणाची दुसरी कांहीं सोय नसे. हा अन्याय पुढें बरेच वर्षांनीं ग्लाडस्टन साहेबाच्या कारकीर्दींत मोडला गेला.) हा तंटा चार वर्षें चालल्यानंतर शेवटीं प्रधानांनीं हार खाल्ली, पण त्याच्या योगानें त्यांचें वजन व त्यांची अब्रू ह्यांस एवढा धक्का बसला कीं त्यांतून ते पुनः कधीं वर उठले नाहींत. पण विरुद्ध पक्षाला तरी हा जो जय मिळाला तो महागच पडला. कारण येणेंकरून समजूतदार लोकांचा ऐरिश धर्मसंस्थेवर जो कांहीं थोडासा विश्वास होता, व त्या लोकांमध्यें जो तिचा थोडा बहुत मान मरातब होता, तोहि कमी झाला. आणि त्यामुळें पुढें पुष्कळ वर्षांनीं (वर सांगितल्याप्रमाणें ग्लाडस्टनच्या कारकीर्दींत) त्या संस्थेचें सगळेंच घाबें खालीं आलें.

असो; पण, एवंच व्हिग प्रधानमंडळाला जी अशा रीतीनें

हार त्यांची लागली ह्मणून सांगितलें, त्या प्रसंगीं त्यांनीं आपली लोकप्रियता आतां कमी होत चालली आहे, व आपल्या हातून आतां देशाचें हित होण्याचा संभव नाहीं, असें जाणून आपल्या कामाचा राजीनामा दिला. तेव्हां अर्थात् तरुण राणीनें विरुद्धपक्षाचा अग्रणी जो सर राबर्ट पील, त्यास बोलावणें पाठविलें, व अधिकाराचीं सूत्रें हातीं घेण्याचा हुकूम त्यास केला. पण या वेळीं एक विलक्षण प्रश्न उत्पन्न झाला. तो असा; ज्या पक्षाचे प्रधान असतील त्या पक्षाचेच बहुतेक सर्व नवे लोक लागावयाचे, असा सामान्यतः नियमच आहे, तदनुसार व्हिक्टोरिया राणी गादीवर बसली, तेव्हां तिच्या तैनातीला ह्मणून ज्या बायांची ( सरदारांच्या बायका वगैरेंची वगैरे ) नेमणूक झाली होती, ती त्या वेळचा मुख्य प्रधान जो लार्ड मेल्बर्न त्याच्या पक्षाच्या ह्मणजे व्हिग पक्षाच्या लेडींचीच झाली होती. तेव्हां अर्थात्च तरुण राणीला गादीवर बसल्यापासून त्यांचा नित्य सहवास झाल्यामुळें त्या तीस फार आवडूं लागल्या होत्या. पण आतां जेव्हां तिनें पील यास नवीन प्रधानमंडळ बनविण्याविषयीं आज्ञा केली, तेव्हां तो रीतीप्रमाणें आपल्या पक्षाच्या बायांच्या नेमणुका राणीच्या सेवेशीं करूं लागला. राणी त्या वेळीं अगदीं लहानच होती. तिला यांतली गोम काय आहे, हें समजेना, व स्नेहामुळें ती आपल्या आजवरच्या मैत्रिणींस रजा द्यावयास व ह्या नव्या बाया ठेवून घ्यावयास कबूल होईना. पील यास असें वाटलें कीं, विरुद्ध पक्षाच्या ह्या राजकारणी बाया जर ह्या कोंवळ्या मनाच्या तरुण राणीजवळ अशाच राहूं दिल्या, तर त्या आपल्या विरुद्ध नेहमीं तिला शिकवतील, व आपलें कारभाराचें काम सुरळीत चालणार नाहीं; ह्मणून त्यानें नवीन प्रधानमंडळ तयार करण्याचें नाकारिलें, तेव्हां राणीनें लार्ड मेल्बर्न ह्यास पुनः अधिकारापन्न व्हावयास सांगितलें, व त्यानें तें मान्य केलें.

हें त्याचें करणें चुकीचें होतें; व त्याचीं फळें त्यास व त्याच्या पक्षास बरेच दिवस भोगावीं लागलीं. एकदा राजीनामा दिला कां, व पुन्हां परत घेतला कां, सगळाच पोरखेळ झाला. बहुमत साधारणपणें आपल्याविरुद्ध जाऊं लागलें ह्मणजे केवळ अधिकार किंवा द्रव्य यांच्या लोभानें जे प्रधानकीस चिकटून राहतात त्यांची कशी स्थिति होते हें सर राबर्ट वाल्पोल ह्याच्या उदाहरणावरून दुसऱ्या जार्जाच्या वेळीं व्यक्त झालें होतें. तें उदाहरण यांच्यापुढें असतां, व समयीं अधिकारावर लाथ मारिली तर तो आपल्यांत कर्तबगारी असल्यास आपल्याकडे पुनः चालून कसा येतो याचींहि दोघे मुत्सद्दी पितापुत्र पिट यांच्या संबंधानें उदाहरणें डोळ्यांपुढें असतां, लार्ड मेलबर्न यानें जें वार्धक्यजनित वेडाचें प्रदर्शन केलें, त्याचा परिणाम असा झाला कीं, पुढें दोन वर्षांनीं सर राबर्ट पील हा त्याच्या मानेवर पाय देऊन पुनः अधिकारारूढ झाला; व तो अधिकार त्यानें पुढें ५ वर्षें चालविला, व किती तरी महत्कृत्यें तेवढ्या अमदानींत करून टाकिलीं. असो.

पण अशा रीतीनें पुनः अधिकारारूढ झाल्यावर कामन्स सभेंत होतील तितके आपल्या बाजूचे हुशार व बोलके सभासद आणावे अशी मेलबर्न यास साहाजिक उत्कंठा झाली. यावेळीं एडिंबरोच्या एका सभासदास लार्ड केल्यामुळें कामन्स सभेंतील त्याची जागा रिकामी झाली होती; ह्मणून ती मिळविण्याची खटपट करण्यास प्रधानांनीं मेकालेस विनंती केली, व तो निवडून यावा ह्मणून बळकट खटपट केली, आणि तींत त्यांस यशहि आलें. कसेंहि झालें तरी व्हिगपक्षाची कांस आपण कधीं सोडणार नाहीं, असें मेकालेनें आश्वासन देऊन, व त्या पक्षाची महती गाऊन तेथील व्हिगमतदारांचीं मनें आपल्याकडे ओढून घेतलीं, व बहुमतानें तो निवडून आला.

निवडून आल्यावर प्रथम जें त्यानें कामन्स सभेंत संभाषण केलें, तें ग्रीक लोकांचा प्रसिद्ध इतिहासकार मि. ग्रोट यानें ब्यालट बिल पुढें आणण्याविषयीं परवानगी मिळावी ह्मणुन सूचना सभेपुढें आणिली होती, तिच्या संबंधानें होय. ही सूचना सुधारणेच्या इतर प्रश्नांप्रमाणें वार्षिक होऊन बसली होती, ह्मणजे दर वर्षी ती सभेपुढें यावी, व प्रत्येक वेळीं पराजित व्हावी. इतके दिवस अशी चाल होती कीं निवडणुकीचे वेळीं मतदारांनीं मतें द्यावयाचीं तीं चवघांसमोर द्यावीं. त्यामुळें योग्य माणसास मत द्यावें असें मतदाराचे मनांत असलें तरी भीडभाड, आग्रह, भीति इत्यादि कारणांनीं अयोग्य परंतु श्रीमान, किंवा वशिल्याच्या, अशा उमेदवारास मत द्यावें लागत असे. तर ही गैरसोय दूर व्हावी, व प्रत्येक मतदारास आपला अधिकार योग्य रीतीनें चालवावासा वाटल्यास त्याच्या मार्गांत अडचण येऊं नये ह्मणून ही नवी चाल पाडण्यास सुधारणेच्छू पाहत होते; हीहि सुधारणा पुढें ग्लाडस्टनच्या अमदानींतच अमलांत आली. ह्या वर्षी ह्या प्रश्नास जरासें नावीन्य येण्यासारखें कारण झालें होतें; लार्ड मेल्बर्नच्या क्याबिनेटास आपणास लोकप्रिय करून घेण्याची दुसरी कांहीं युक्ति न सुचल्यामुळें त्यांनीं आपसांत असें ठरविलें होतें कीं आपल्यापैकीं जे सुधारलेल्या मताचे प्रधान असतील त्यांनीं ह्या प्रश्नावर पाहिजे तसें मत द्यावें. ही मेकालेस ह्या वेळीं चांगली संधि सांपडली आणि ज्या प्रश्नांबद्दल प्रधानांचें ठरीव मत झालेलें नसेल अशा प्रश्नांच्या संबंधानें प्रधानमंडळांतील घटकांस त्यांच्या सदसद्विवेकबुद्धिप्रमाणें मत देण्याची व बोलण्याची मुभा असावी ही गोष्ट पूर्वकालापासून कशीं संमत झालेली आहे, ह्या बद्दल त्यानें ऐतिहासिक, व विशेषतः धाकट्या पिटच्या दीर्घकालीन कारभारांतून अनेक उदाहरणें दिलीं. हीं उदाहरणें देऊन त्यानें

विचारिलें:—" आणि ह्या ज्या गोष्टी घडल्या त्या तेव्हां जो मुत्सद्दी मुख्य प्रधान होता त्याच्या दुर्बलतेमुळें घडल्या काय! नव्हे. मि. पिट हा मनुष्य असा होता कीं त्याच्या अंगीं धैर्य व इतरांवर छाप बसविण्याची शक्ति हीं भरलेलीं होतीं ही गोष्ट त्याचे शत्रू देखील कबूल करितात. बरें, त्यानें अशी मोकळीक आपल्या सोबत्यांस दिली ह्मणून त्याचा कारभार ढिला पडला काय, किंवा त्याचे अनुयायी घाबरले काय, किंवा विरोधवाद्यांचे हल्ले परत करण्यास ते तेणेंकरून असमर्थ झाले काय? कांहीं नाहीं; उलट, त्याच्यासारखें प्रबल प्रधानमंडळ दुसरें कोणाचेंच झालें नसेल; आणि आपल्या घटकांस असलें स्वातंत्र्य दिल्यानें त्याचें बळ ज्यास्त वाढलें, ह्यांत मुळींच शंका नाहीं."

ह्या वेळीं मेकाले, लार्ड क्लैव याच्या कारकीर्दीवर लेख लिहिण्यांत चूर झाला होता; इतक्यांत तूं सेक्रेटरी एट वॉर (लष्करी खात्याचा सेक्रेटरी) हो, व तुला आह्मी क्याबिनेटांत घेऊं, अशी लार्ड मेलबर्न याजकडून यास सूचना आली; ती त्यानें लागलीच मान्य केली. पण जो माणूस द्रव्य, पदवी किंवा खाजगी आधार, ह्यां पैकीं कांहींहि नसतां राजकारणांत शिरून चाळिशीच्या आंतच क्याबिनेटांत आपला प्रवेश करून घेतो, त्यानें आपल्या विरुद्ध जें जें कांहीं ह्मणतां येण्यासारखें असेल तें ह्मणावयास लोक कधीं सोडावयाचे नाहींत, ह्या गोष्टीबद्दल आपल्या मनाची तयारी ठेविलीच पाहिजे. टैम्स वर्तमानपत्रानें सर राबर्ट पील याची तरफदारी आजपर्यंत सारखी चालविलेली होती; तेव्हां त्याचा व्हिग कारभाऱ्यांशीं अर्थात् तंटा होताच; त्यांत त्यानें नव्या प्रधानाच्या विरुद्ध खाजगी द्वेषाची आतां भर घातली. कित्येक आठवड्यांच्या आठवडे त्या वर्तमानपत्रानें ह्याला आपल्या मुख्य अग्रलेखांतून

मि. बॅब्लटंग मेकाले (बडबड्या जिभेचा मेकाले) ह्मणून ह्मणावें. पुढें ह्मास व शील ह्मास जेव्हां राणीचे प्रीव्हिकौंसिलर (विश्वासाचे मुत्सद्दी) नेमिलें, तेव्हां तर त्या वर्तमानपत्रास देहभानच उरलें नाहीं. "काय? हीं माणसें प्रिव्हिकौंसिलर! काय? विंडसर क्यासल (राणीचा वाडा) मध्यें असल्या माणसांचे लाड चालले आहेत काय? थू:! राणीसाहेबांच्या दोन आवडत्या माकडांच्या शोचनीय मृत्यूनें ज्या दोन जागा रिकाम्या झाल्या आहेत त्या भरून काढण्याची देखील यांची योग्यता असेल नसेल." तेव्हांच्या टैम्स पत्राच्या या भाषेंत व हल्लींच्या त्याच्या भाषासरणींत केवढा तरी फरक पडला आहे!

ह्मावेळीं मेकालेच्या हातून अशी एक गोष्ट चुकीनें घडली कीं, तेणेंकरून त्याची टर उडविण्यास त्याच्या द्वेष्टयांस एक जास्तच कारण सांपडलें. मी प्रधानकीची जागा पत्करिली आहे असें जेव्हां त्यानें रीतीप्रमाणें आपल्या एडिंबरो एथील मतदारांस कळविलें, तेव्हां तो विंडसरक्यासल येथें होता; ह्मणून साहजिक त्याच वाड्याचें नांव त्यानें आपल्या पत्राच्या शिरोभागीं घातलें. मग काय विचारतां! झालीच याच्या थट्टेस चोहोंकडून सुरवात! व त्यांत टैम्सचा पहिला नंबर!

ही त्याची नजरचूक त्यास पुढें कितीएक महिने पर्यंत भोंवली; त्याच्यावर ह्मासंबंधानें वर्तमानपत्रांतून, खुद्द पार्लमेंतांत, व इतर सभांतून, किती तरी टीकांचा व थट्टांचा सारखा वर्षाव चालला होता! खुद्द प्रसिद्ध कादंबरीकार थ्याकरे ह्मानें देखील ह्मा चुकीस आपल्या एका कादंबरींत स्थान दिलें; व त्यामुळें तिला ज्यास्तच आयुष्य आलें. पुढें मेकाले जेव्हां वारला तेव्हां ह्माबद्दल आपल्यास फारच वाईट वाटतें असें थ्याकरेनें त्याच्या मृत्यूस अनुलक्षून लिहितांना कबूल केलें.

मेकालेला ही जी मोठी जागा मिळाली तिनें तो फुगून गेला नाहीं, व त्यामुळें त्याला ज्या शिव्या मिळूं लागल्या त्यांसही तो डगमगला नाहीं. त्यानें आपलें सुख आपल्या हातांत ठेविलें होतें; त्यासाठीं तो लोकांच्या मेहरनजरेवर किंवा क्षमाशीलतेवर कधींच अवलंबून नसे. दिजंबर १८३९ त तो नेपियरला लिहितोः— "टैम्सचा तूं फारच बाऊ करितोस ! असल्या पत्रकारांनीं मला शिव्या दिल्या काय किंवा माझ्या ओंव्या गाइल्या काय ?—दोन्ही सारखींच ! त्यांच्या या उर्मट लिहिण्याला मी मुळींच भीक घालीत नाहीं. ह्यावरून त्यांचें प्राबल्य दिसत नाहीं किंवा वाढत नाहीं, इतकेंच नव्हे, तर उलट त्यांचें दौर्बल्य मात्र दिसतें व वृद्धिंगत होतें." या थट्टेची त्यानें बिलकूल दरकार केली नाहीं ही गोष्ट, त्याच्या दिनचर्या लेखांतून किंवा इतर कोणत्याहि पत्रांतून तीस मुळींच उल्लेख सांपडत नाहीं, ह्यावरून स्पष्ट होते.

लोकांनीं आपल्याशीं न्यायाचें बर्तन केलें काय, किंवा अन्यायाचें केलें काय, दोन्ही सारखींच, असें त्यास मानण्यास ह्या वेळीं एक विशेष कारण झालें होतें. आकस्मिक रीतीनें अशी एक गोष्ट घडून आली कीं तिनें त्याला पुष्कळ दिवस गृहसुखाचा चांगला उपभोग घेण्याची संधि प्राप्त झाली. तो हिंदुस्थानांतून परत गेला तेव्हां त्याजबरोबर त्याचा मेव्हणा फर्लोवर इंग्लंदास गेला होता हें मागें सांगितलेंच. त्याची रजा आतां संपत आली होती, व तो आपल्या बहिणीस पुनः तिकडे घेऊन जाणार, व अशा रीतीनें आपल्या सुखांत मोठीच खिंड पडणार, अशा चिंतेंत भरला होता. इतक्यांत सुदैवानें ट्रेव्हेल्यन यास तिजोरीवर असिस्टंट सेक्रेटरीची जागा सरकारांतून मिळाली. ह्या जागा कायमच्या असतात; प्रधानमंडळ बदललें तरी या जाग्यांवरील लोकांस लागलीच रजा मिळत

नसते. अशी सोय असल्यामुळें ही मंडळी आतां नेहमी तेथेंच राह-णार असा हा योग घडून आला. त्यामुळें मकालेस दुप्पट अवसान आलें, आणि तो लोकांच्या निंदांची व स्तुतींची बिलकूल पर्वा करीनासा झाला.

हें वर्ष जसें त्याला सुखाचें गेलें, तसेंच फार उद्योगाचेंहि गेलें. प्रधानकी पत्करिल्यामुळें इतिहासलेखनाचा उद्योग त्याला अर्थात् सध्या बाजूस ठेवावा लागला. त्यानें आपल्या खात्याचें काम पार्ल-मेंतांत इतक्या दक्षतेनें व इतक्या सभ्यतेनें चालविलें कीं, तेणेंकरून त्याच्या कामास फारसा व्यत्यय कधींच झाला नाहीं. शिवाय ती वेळच अशी होती कीं, लष्करी खात्याच्या प्रधानकीस कॉमन्स सभेकडून फारसा त्रास पोहोंचूं नये. कारण त्या वेळीं ह्या खात्या-कडे पार्लमेंत स्वतः फारसें लक्ष्य लावीत नसे, किंवा राष्ट्रांची फारसा पैसाही लावीत नसे. पुढील सालच्या खर्चाबद्दलचीं अंदाज पत्रकें जेव्हां त्यानें सभेपुढें आणलीं, तेव्हां काय तो एकदांच मतें घेण्याचा प्रसंग आला. तो जोसेफ ह्यूम ह्यानें आणिला होता, व यानें जितके मिलियन्स (दहा लाख) मागितले होते- तितकीं देखील मतें त्यास मिळालीं नाहींत. १४ मार्च १८४० रोजीं मेकाले एलिस यास लिहितोः—"मी आपल्या अंदाजपत्रकांतून चांगल्या रीतीनें पार पडलों. आंकडे व बारीक सारीक गोष्टी ह्यानें भरलेलें असें भाषण कोणत्याहि प्रकारची चुकी केल्याशिवाय किंवा अडखळल्याशिवाय मी केलें; सर्व प्रकारच्या प्रश्नांला समर्पक उत्तरें दिलीं; आणि दोन तासांच्या आंत सहा मिलियन पौंडांचा परवाना मिळविला. माझा हल्लीं बहुतेक सर्व वेळ सरकारी कामांत जातो, आणि जीं थोडींशी मिनिटें फुरसत मिळेल ती मी आपली बहीण व तिची मुलगी ह्यांच्याशीं घालवितों. तात्पर्य, पोषाक चढवणें व

उतरणें हें चाललें असतां जेवढा वेळ नाचावयास मला मिळेल, ( ह्या दोन व्यापारांना त्यांना बराच वेळ लागतो, व त्याची एक स्वतंत्र खोलीच असते ), त्या शिवाय मुळींच मिळत नाहीं. मला वाटतें कांहीं दिवस असें राहिल्यानें माझा फायदाच होईल. हिंदुस्थानांत असतां व परत येत असतां मी फारच 'बुकांतला किडा' बनून गेलों होतों. असें ह्मणतात कीं व्यायामानें अन्नपचनास मदत होतें; आणि ह्मणून कांहीं महिनेपर्यंत पार्लमेंटांत सपाटून काम केल्यानें कदाचित् माझें वाचन माझ्या मनास जास्त पोषक होईल."

पण बॅार आफिसच्या कामासंबंधानें मेकालेचें तारूं जरी याप्रमाणें संथ पाण्यांत स्वस्थपणानें चाललें होतें, तरी सामान्य राजकारणाच्या लाटांत जेव्हां तें सांपडलें, तेव्हां तें बरेंच डळमळूं लागलें. १८४० चें सेशन सुरु झालें नाहीं तों थोडक्याच दिवसांत सर जॉन यार्ड बुलर या गृहस्थानें प्रधानांवर आपला विश्वास नाहीं अशा अर्थाची सुचना कामन्स सभेपुढें आणिली. ह्या सूचनेस टोरीपक्षानें अर्थात् मत आणि कंठ ह्या दोहोंचा पूर्ण आश्रय दिला. मेकालेचें ह्मणणें सभेनें शांतपणें ऐकूं नये अशी ही पहिलीच—व शेवटलीच—वेळ येऊन ठेपली. ह्या सुचनेवर वादविवाद सुरू झाल्यापासून दुसऱ्या रात्रीं सर जेम्स ग्रेहाम ह्यानें आपल्या जुन्या पक्षाला इतकें लावून संभाषण केलें होतें, व 'विंडसर क्यासल' च्या गोष्टीचा उल्लेख करून त्या भाषणास इतका मीठमसाला लाविला होता कीं, विरुद्धपक्ष अगदीं शेफारल्यासारखें करूं लागला होता. जेव्हां मेकाले त्यास उत्तर द्यावयास उठला, त्या वेळेस विरुद्धपक्षाचें डोकें फिरून गेल्याचीं चिन्हें इतकीं स्पष्ट दिसून येत होतीं कीं, त्याला आपल्या भाषणास सुरवात करतांना, मेहरबानी करून मी काय बोलतों तें ऐकून तरी घ्या, अशी प्रस्तावनाच करावी लागली. पण

प्रथमच तो असें बोलून गेला; "र्‍हिग्यांचें प्रधानमंडळ विश्वासास पात्र आहे किंवा नाहीं हा प्रश्न आपल्यापुढें आहे. तेव्हां क्याबिनेटांतला पहिला प्रधान जो बोलावयास उठेल त्याला ज्या औदार्याबद्दल व सौजन्याबद्दल इंग्लिश लोकांची एकवेळ प्रसिद्धि होती, त्याचा थोडासा तरी भाग आपल्याकडून मिळेल अशी मी आशा करितों. "क्याबिनेटांतील पहिला प्रधान" हे शब्द त्याच्या तोंडांतून बाहेर पडले नाहीं तोंच विरुद्धपक्षाच्या सभासदांनीं "मुख्य प्रधान" असा त्यांच्या शब्दांचा भलताच अर्थ मुद्दाम करून अशा रीतीनें थट्टेच्या टाळ्यांचा गजर सुरू केला कीं, तो ऐकून खुद्द ओकॉनेल सारख्यानेंही घाबरून जावें. अशा रीतीनें "प्रथम ग्रासे मक्षिकापातः" अशी स्थिति झाल्यावर मेकाले जरी आपलें भाषण पुरें केल्याशिवाय खालीं बसला नाहीं, तरी त्याच्या भाषणांत उत्साह किंवा खाहजिकपणा कांहींच राहिला नाहीं.

नंतर कांहीं दिवसांनीं याची व सर जेम्स ग्रेहामची हाइड पार्कांत गांठ पडली; तेव्हां त्या प्रसंगीं आपल्या तोंडून कांहीं राग येण्यासारखें किंवा उद्धटपणाचें भाषण निघालें नाहीं ना! ह्मणून त्यानें यास विचारिलें. मेकाले ह्मणतो:—"कांहीं नाहीं. बाकी मला इतकेंच वाटतें कीं, 'विंडसर क्यासल' च्या पत्त्याबद्दल ज्या थट्टा वर्तमानपत्रांतून येत असतात, त्यांना आपल्या भाषणांत जर उल्लेख आला नसता, तर तें जास्तीच प्रशंसनीय झालें असतें." या वेळीं चीन देशाशीं लढाई सुरू झाली होती. ह्मणून एप्रिलच्या ७ वीस सर जेम्स यानें अशी सूचना स्वतःच सभेपुढें आणिली कीं, चीन देशाशीं इंग्लंदास लढाईस ओढून नेलें हें प्रधानांचें कृत्य गर्हणीय आहे. त्या वेळींहि मेकाले त्याच्या मागून उत्तर द्यावयास उठला; आणि ब्रिटिश सरकारच्या निशाणाची थोरवी गाऊन त्यानें

सगळ्या सभेकडून टाळी घेतली; कारण असलें भाषण कोणासही नेहमीं रुचावयाचेंच.

१८४० आणि १८४१ ह्या दोन सेशनांत ऐर्लंदांतील मतदारांच्या नोंदणीसंबंधानें अनेक लोकांनीं अनेक बिलें आणल्यामुळें त्यांच्यावर रागाचे व घोंटाळ्याचे अनेक वादविवाद झाले. ह्या वादविवादांत, मेकालेला हिंदुस्थानांत असतां जें कडकडीत कायदेशिक्षण प्राप्त झालें होतें तें उत्तम प्रकारें दिसून आलें. शिवाय ह्या ह्यांच्या भाषणांतून दृष्टान्त आणि अलंकार ह्यांचीहि नेहमीं प्रमाणें रेलचेल होती; परंतु दुर्दैवानें त्यांचे रिपोर्ट कोणी घेतले नाहींत.

असें चाललें होतें तरी एकंदरींत व्हिग प्रधानमंडळाचे दिवस भरावयास लागले होते. त्या मंडळाची आतां अशी चमत्कारिक स्थिति झाली होती कीं, त्यांना कारभारांत यापुढें राहण्यांत शोभा नव्हती, व तो सोडण्याची सोय नव्हती. ऐर्लंदांतील नोंदणीसंबंधानें जें त्यांचें मुख्य बिल तें दुसऱ्या वाचनाच्या वेळींच पालथें पडावयाचें, तें पुढें कमिटींत पडलें. १८४० सालीं राष्ट्राच्या अंदाजपत्रकांत खर्चापेक्षां उत्पन्नाची उणीव एका मिलियनपेक्षां कमी ह्मणून दाखविली होती, ती ह्या वर्षांत २ मिलियनवर जाऊन पोहोंचली; बरें, ह्या खडकांतून त्यांचें तारूं सुरक्षित नेण्यास लोकप्रियतेची लाट त्यांच्या उपयोगीं पडेल अशीहि या वर्षी आशा नव्हती. कारण प्रगति पाहिजे ह्मणून ह्मणणारे जे लोक होते, त्यांचा सगळा उत्साह व त्यांचा सगळा उद्योग हीं या वेळीं दुसऱ्याच एका कामाकडे खर्च होत होतीं; आणि त्यांचे जे पुरस्कर्ते होते ते प्रधानमंडळांत नव्हते, व फारसे पार्लमेंतांतहि नव्हते. तो उद्योग कोणता ह्मणाल तर धान्यावर कर बसविण्याच्या संबंधानें जे कायदे गेल्या पंचवीस वर्षांत पसार झालेले होते ते रद्द करून टाकणें हा होय. पण ह्या

प्रश्नाचें महत्व व या वेळची त्याची स्थिति हीं बरोबर समजण्यासाठीं त्याचा थोडासा पूर्व इतिहास देणें जरूर आहे.

१८१५ सालीं वार्टर्लूच्या रणांत नेपोलियन बोनापार्टीचा पराभव होऊन जें सरासरी २५ वर्षे फ्रान्साशीं चालू असलेलें महायुद्ध संपलें, त्यांत शेवटीं जरी इंग्लिशांस जय आला, तरी त्यांना त्याबद्दल विलक्षण खर्च झालेला होता. त्यामुळें करांचें ओझें वाढलेलें होतें; व्यापारधंदा बसला होता; उद्योग नाहींसा झाला होता; मजुरीचे दर कमी झाले होते, आणि जिनसांचे भाव वाढले होते. अशी स्थिति होती तरी जमीनदारांस खुश करण्यासाठीं त्या वेळच्या प्रधानमंडळानें असा कायदा पसार करून घेतला कीं, इंग्लंदांत गव्हाचा दर, दर कार्टरास ८० शिलिंग होईतोंपर्यंत बाहेरच्या मुलखांतून इंग्लंदांत धान्य कोणी आणूं नये. ह्याचा उद्देश अर्थात् बाहेर देशचें धान्य इंग्लंदांत न आल्यामुळें तेथल्या धान्याचे दर वाढून जमीनदारांना चांगली किफायत व्हावी हा होता. पण येणेंकरून गरीबगुरीबांची स्थिति फारच शोचनीय झाली; धान्याचे दर मनस्वी वाढले, व त्यांना जी अर्धीमुर्धी भाकर पूर्वी मिळत होती, तीहि मिळण्याची पंचाईत पडूं लागली. तेव्हां हा जुलमी कायदा रद्द व्हावा, व धान्याचा व्यापार अनिर्बंध चालावा, एतदर्थ कांहीं सज्जन लोकांनीं खटपट सुरू केली. त्यांच्या प्रयत्नास कांहींसें यश आलें, कारण १८२८ सालीं असा एक कायदा पसार झाला कीं, तेणेंकरून बाहेरून येणाऱ्या धान्यावर एक फिरता कर बसविला; व त्यासंबंधानें अशी तजवीज केली कीं, धान्याचा भाव जसजसा वाढत जाईल तसतसा तो कर कमी व्हावा, व कमी होईल तसतसा वाढत जावा.

या कायद्यानें १८१५ मध्यें घडलेल्या अन्यायाचें जरी अल्प

स्वल्प दूरीकरण झालें तरी फारसें झालें नाहीं. हें पाहून कांहीं वजनदार व परोपकार बुद्धीच्या गृहस्थांनीं 'धान्यावरील कराविरुद्ध खटपट करणारी मंडळी' म्हणून एक सभा १८३८ सालीं स्थापन केली. तिचा उद्देश, सभा भरवून, लहान लहान स्फुट लेख प्रसिद्ध करून, अर्ज करून, वगैरे कायदेशीर रीतींनीं ह्या धान्य विषयक कायद्याविरुद्ध लोकमत जागृत व सुशिक्षित करावें, हा होता. ते लोकांस असें शिकवूं लागले कीं, अप्रतिबंध व्यापार असणें हें सर्वांसच व सर्वच जिनसांच्या संबंधानें फार फायदेशीर आहे; पण धान्याच्या संबंधानें तर विशेष फायदेशीर आहे. कारण धान्याची जरूर श्रीमंतापासून तों गरीबापर्यंत सर्वांसच आहे. सरकारास खर्च भागण्यासाठीं जर एखाद्या मालावर कर बसविणें झालें, तर तो बाहेरून येणाऱ्या इतर मालावर अगोदर बसवावा, आणि अगदीं निरुपायच झाला, तर अखेरीस धान्यावर बसवावा.

हें म्हणणें अगदीं बरोबर असल्यामुळें, व गरीबांच्या आणि मध्यम स्थितीच्या लोकांच्या फायद्याचें असल्यामुळें, अर्थात् लोकांस तें रुचूं लागलें, आणि लोकमत तिकडे ज्यास्त ज्यास्त वळूं लागलें. ह्या मताचे मुख्य पुरस्कर्ते रिचर्ड कॉब्डेन व जॉन ब्राइट हे होते; आणि व्हिग पक्षाचे लोक जात्याच सुधारणेच्छु व प्रगतिप्रिय असल्यामुळें त्यांच्यांतील ज्यास्त ज्यास्त लोकांचा कल तिकडेच जात होता. उलट उलटपक्षीं, टोरीपक्षाकडे बहुतेक जमीनदार मंडळी असल्यामुळें, व त्यांना धान्यावरील कर रद्द होणें सहजच इष्ट वाटत नसल्यामुळें, ते ह्या मताविरुद्ध होते. ते म्हणत कीं धान्यावरील कर काढून टाकिल्यास बाहेरचें स्वस्त धान्य देशांत येऊन इंग्लंदांतील शेती बुडेल. त्यांचे प्रतिपक्षी अनिर्बंध व्यापारवादी म्हणत कीं, तसें न होतां प्रतिस्पर्धेच्या योगानें इंग्रजी शेतीमध्यें उलट सुधा-

रणा होईल; व धान्य सर्वांस स्वस्त, किंवा निदान शिस्तीच्या दरानें तरी, विकत मिळूं लागेल.

असो. अशी ह्या प्रश्नाची त्यावेळीं स्थिति होती. मेकालेचेंहि मन फार बंद करण्याकडे जाऊं लागलें होतें. १८३९ तच मेकालेनें आपल्या दिनचर्येंत असें लिहून ठेविलें होतें; "धान्याचा व्यापार अनिर्बंध असावा अशी जी ओरड हल्लीं सुरू आहे ती फारच जोरदार दिसते. टैम्स पत्र देखील त्याला अनुकूल झालें आहे. तें होईल ही मला खात्री होतीच. प्रधान जर आपला डाव आतां चांगला खेळतील तर ते एक जिंकतील, किंवा निदान अब्रूनिशीं तरी मानेवरचें जूं त्यांना काढून टाकितां येईल. त्यांच्या हातीं पानें फार उत्तम आलीं आहेत; मात्र तीं नीट कशीं खेळावीं हें त्यांना समजलें पाहिजे." हे जे मेकालेचे उदार विचार ते या वेळीं निरुपायामुळें प्रधानांपैकीं अत्यन्त भिभ्या प्रधानांस देखील संमत होऊं लागले होते; आणि अनिर्बंध व्यापारवादी या नात्यानें आतां आपण देशापुढें यावयाचें असा व्हिग लोकांनीं निश्चय केला. ३० एप्रिल १८४१ रोजीं नेपियरला लिहिलेल्या पत्रांत मेकाले ह्मणतो:—"आमच्या पक्षाचें बरें वाईट आज रात्रीं काय तें ठरावयाचें आहे. आमची चांगली सरशी होईल किंवा आमच्या अंगावर तरी बाजू येईल. काय होईल ह्मणून ह्मणावें तें मला समजतच नाहीं. माझी इच्छा ह्मणशील तर आमच्या पक्षाचा पराभव व्हावा अशी आहे. स्वातंत्र्य आणि स्वास्थ्य यासाठीं, भाषणस्वातंत्र्य आणि लेखनस्वातंत्र्य यासाठीं, मी झुरत आहे. मला पाहिजे तें सर्व मजपाशीं आहे; थोडेसें द्रव्य, गृहसुख, चांगली प्रकृति आणि मनाचा उत्साह. चाळीशीला जर हें जूं माझ्या मानेवरचें निघालें तर त्याला पुनः मान देण्यास मी कबूल होईन असें मला वाटत नाहीं." लष्करी सेक्रेटरीनें हे शब्द सकाळीं

लिहिले, आणि त्याच संध्याकाळीं लॉर्ड जॉन रसेल यानें कामन्स सभेमध्यें अशी नोटीस दिली कीं, मेच्या ३१ वीला मी अशी सूचना पुढें आणीन कीं, धान्याच्या व्यापारासंबंधाचे जे कायदे आहेत त्यांचा विचार करण्यासाठीं कॉमन्स सभेची कमिटी बसावी.

पण ३० एप्रिल आणि ३१ मे यांच्या दरम्यान पुष्कळ गोष्टी घडावयाच्या होत्या. त्या वर्षाच्या बजेटामध्यें एक मुख्य सूचना अशी होती कीं, परदेशांतून आपल्या देशांत येणाऱ्या साखरेवरचा कर कमी करावा. आतां साखर ही या वेळीं स्पेन देशाच्या वसाहतींतून गुलामांच्या मेहनतीनें तयार होत होती, आणि इंग्रजांच्या वसाहतींतून गुलामगिरी काढलेली असल्यामुळें, स्वतंत्र कामकऱ्यांच्या मजुरीनें तयार होत होती. अर्थात् परकी साखरेवरचा कर यांच्या वसाहतींतील लागवड करणारांच्या फायद्याचा होता; तो या सूचनेनें कमी व्हावयाचा होता. ह्मणून या सूचनेवर लार्ड सॅन्डन यानें उपसूचना आणिली; आणि ती अशा खुबीनें आणिली कीं, गुलामगिरी रद्द करणारे जे जे होते त्यांचा आश्रय तीस सहज मिळावा. या उपसूचनेवर आठ रात्रीं वादविवाद चालला. त्यांत ग्लाडस्टन साहेबानें फार नामी भाषण केलें; आणि शेवटच्या वाक्यांत असा कांहीं उल्लेख आणिला कीं, तो ज्याच्या विरुद्ध आणिला होता त्यालाच तो फार पसंत पडावा. पुढच्या त्याच्या वैभवाचीं चिन्हें हल्लींच्या त्याच्या उच्चतम सभ्यतेमध्येंच व्यक्त होत होतीं. तो ह्मणाला: “ परकी साखरेवरचा कर कमी करण्याचा विचार ज्या प्रधानमंडळानें केला आहे त्यांच्याशीं आणखी एका नांवाचा विलक्षण रीतीनें संयोग झालेला आहे. गुलामगिरी बंद करण्याकरितां जो एवढा उद्योग झाला त्याची माहिती मला अर्थात् ऐकिवच आहे; पण ती जर माझी माहिती चुकीची नसेल, तर त्या उद्योगामध्यें

अशा एका माणसाचें अंग होतें कीं जो विल्बरफोर्सचा या कामांत गुप्त जोडीदार आणि त्याच्या शक्तीचा केवळ खांबच होता; त्या माणसाचें औदार्य फार खोल होतें, बुद्धि फार तीक्ष्ण होती, उद्योग अश्रांत होता, आणि स्वभाव इतका अस्वार्थी होता कीं गुप्तपणें मेहनत करण्यांत, ऐहिक कीर्ति नको ह्मणण्यांत, आणि त्याबद्दल बक्षिस मिळावयाचें तें परलोकीं मिळेल असें मानण्यांतच त्यास संतोष वाटे. त्या माणसाचें नांव झशारी मेकाले असें होतें, आणि त्याचा मुलगा प्रस्तुत क्याबिनेटाचा एक घटक आहे. "

१९ मेच्या अगदीं पहाटेस लॉर्ड सॅन्डन ह्यांच्या उपसूचनेस ३६ मतें ज्यास्त मिळून ती पसार झाली; अर्थात् प्रधानमंडळाचा पुरा पराभव झाला. असा पराभव झाला ह्मणजे प्रधानांनीं आपल्या कामाचा राजीनामा द्यावयाचा ही गोष्ट साधारणपणें ठरल्यासारखीच आहे. तेव्हां तें वर्तमान प्रधानांच्या तोंडून ऐकण्याकरितां दुसऱ्या दिवशीं कॉमन्स सभेंत सभासदांची अगदीं गर्दी झाली. पण राजीनाम्याबद्दल तोंडांतून एकहि अक्षर न काढतां चान्सलर ऑफ् धि एक्सचेकरनें (जमाखर्च खात्याचा प्रधान-फडणीस) पुढें येऊन मुकाट्यानें अशी नोटिस दिली कीं, साखरेवरच्या जकातीच्या उत्पन्नाचा आंकडा जमाखर्चाच्या कमिटी समोर मी रीतीप्रमाणें मांडणार आहें; तेव्हां प्रधानांच्या शत्रूंना व मित्रांना दोघांनाहि पराकाष्ठेचें आश्चर्य वाटलें. श्रोतेमंडळीचें हें आश्चर्य जरा कमी होतें न होतें इतक्यांत लॉर्ड जॉन रसेलनें सभेपुढें अशी सूचना आणिली कीं, सभेचें काम आतां थांबून पुनः सोमवारीं सुरू व्हावें. तेव्हां अर्ल आव् डार्लिंग्टननें आश्चर्य व तिरस्कारयुक्त अशा एकाच वाक्यानें त्यास असें विचारिलें कीं धान्याच्या कायद्यांचा प्रश्न आपण कधीं पुढें आणणार ? 'चवथ्या जूनला' असें उत्तर मिळाल्यामुळें तो विषय तितकाच राहिला.

पण ह्या गोष्टीचा एवढ्यानेंच निकाल व्हावयाचा नव्हता. चवथे जूनला जो धान्यावरील करासंबंधानें वादविवाद सुरू व्हावयाचा तो एकीकडे राहून, प्रधानांवर आपला विश्वास नाहीं अशा प्रकारची सूचना सभेपुढें आधींच आलेली होती; व तिच्यावरील वादविवादाचा तो पांचवा दिवस होता; ती सूचना कॉन्सर्व्हेटिव पक्षाचा अग्रणी सर रॉबर्ट पील यानें अगदीं संथ व सप्रमाण असें भाषण करून पुढें आणिली होती; आणि तें भाषण त्याला व त्या प्रसंगाला अगदीं उचित असेंच होतें. मेकालेनें त्याचें हें मुद्देसूद व पूर्वीच्या अशा प्रसंगांच्या माहितीनें ओतप्रोत भरलेलें भाषण फारच लक्ष्यपूर्वक ऐकिलें होतें; त्याच रात्रीं तो त्यास उत्तर द्यावयास उठला, आणि त्यानेंहि लार्ड संडर्लंड, मि. पिट, आणि लार्ड लिव्हरपूल, या प्रधानांचा असाच पराजय झाला असतां त्यांनीं राजीनामाहि कसा दिला नाहीं, व पार्लमेंतहि बरखास्त कसें केलें नाहीं, हें मोठ्या खुबीदार रीतीनें दाखविलें. पण प्रधानमंडळ आज इतके दिवस दुर्बल झालेलें होतें, व लोकांमध्यें त्याची पत हल्लीं इतकी जलद जात चाललेली होती, कीं प्रत्यक्ष हालाम ( इंग्लंदच्या राज्यनीतीच्या तत्त्वांचा इतिहासकार ) यानें जरी असलीं पूर्वींचीं उदाहरणें गोळा केलीं असतीं, व कयानिंग सारख्या अप्रतिम वक्त्यानें जरी तीं सभेपुढें मांडिलीं असतीं, तरी देखील त्यांचा कांहीं एक उपयोग झाला नसता. पुढें जेव्हां सर जेम्स ग्रेहाम हा बोलावयास उठला, तेव्हां तर दोन्ही पक्षाच्या मुख्य वक्त्यांनीं जी परस्परविषयक क्षमाशीलता आतांपर्यंत राखिली होती तीहि नाहींशी आली; त्यानें तर भाषणाच्या शेवटीं शेवटीं शिव्या देण्यासच सुरुवात केली. पण प्रधानमंडळानें आपली पत अगोदरच इतकी कमी करून घेतली होती कीं, विरुद्ध पक्षाच्या चुकांनीं किंवा फाजील भाषणांनीं त्यांचा

कांहीं एक फायदा होण्याचा संभव राहिला नव्हता; शेवटीं भरगच्च सभागृहांत एक मत जास्त मिळून विरुद्ध पक्षाची ही सूचना पसार झाली.

तीन आठवड्यांच्या आंतच पार्लमेंत बरखास्त झालें, आणि प्रधान परदेशाच्या गव्हांवर एक कायमची जकात बसवावी अशी सूचना घेऊन राष्ट्रापुढें गेले. अशा सेशनामागून सामान्य निवडणूक झाली आणि असला एकच नेमळा प्रश्न घेऊन एकादी पार्टी राष्ट्रापुढें गेली, ह्मणजे तिचा निकाल काय व्हावयाचा हें ठरलेलेंच आहे; आणि ह्या प्रसंगींहि तो तसाच झाला. लार्ड मेलबर्न व त्याचे जोडीदार ह्मांनीं जो धान्याच्या कायद्यांचा प्रश्न हातीं घेतला होता तो फारच उशिरां घेतला होता, आणि त्यांच्या पूर्वींच्या इतिहासाकडे पाहतां तो पुनः फारच भीत भीत घेतला होता; आणि शिवाय, त्याचें ग्रहण करण्यास मतदारांच्या मनांची अद्यापि तयारी झालेली नव्हती. सगळ्या जमीनदार लोकांना हा प्रश्न ह्मणजे शत्रु होता; तेव्हां असा प्रश्न हातीं घेऊन प्रधानांनीं आपल्या साह्यकारी लोकांस मतदारांसमोर पाठविलें ह्मणजे पदरांत अपेश बांधून घेण्यासच पाठविलें. उत्तरइंग्लंदांत व्हिग लोकांनीं फारशा जागा गमविल्या नाहींत, पण दक्षिणइंग्लंदांत त्यांची पुर्तीच धूळधाण झाली. प्रधानांच्या अनुयायांचें बरोमध्यें ( शहरांमध्यें ) जें इतके दिवस पूर्ण प्राबल्य होतें त्यांतलें बरेंच कमी झालें, आणि कौंटींमध्यें तर प्रतिपक्ष्यांनीं यांना अगदीं हुसकूनच लाविलें. कांहीं कौंटींतून तर असें झालें कीं तेथें प्रतिनिधींची सगळी माळच्या माळच अनिर्बंधव्यापारशत्रूंची लागली. उदाहरणार्थ, ईसेक्स प्रांतांत असें झालें कीं शहरें व खेडेगांव यांतले दहाच्या दहा सभासद कान्सर्व्हेटिव्ह पक्षाचे निवडून आले; ऑक्सफर्डशायरच्या बारा प्रतिनिधींचा तोच कंपू. ऐर्लंदांतील निवडणु-

कींचा निकाल समजण्याच्या अगोदरच असें स्पष्ट होऊन गेलें कीं आणीबाणीच्या प्रसंगीं प्रधानांना निदान शंभर मतें तरी कमी यावीं. सारांश, १७८४ त धाकट्या पिटनें जेव्हां कोडबोल्या प्रबल पक्षाचा सामान्य निवडणुकींत अगदीं धुव्वा उडवून दिला होता, तेव्हांपासुन व्हिगपक्षाचा असा जबर पराजय कधींच झाला नव्हता.

इंग्लंदमध्यें धान्याच्या कायद्यांच्या सुधारणेविरुद्ध जी ही वावटळ उठली, तिजपासून नेहमीप्रमाणें स्काटलंद अलिप्तच होतें. तेथें जर उमेदवारांना कांहीं त्रास झाला असेल तर तो सुधारणाशत्रूंपासून नव्हे, तर तिच्या मित्रांपासूनच; कारण मतदारांचा कल तिकडेच ज्यास्त होता. मेकालेला ह्या वेळीं कोणी प्रतिस्पर्धीच उभा राहिला नाहीं; त्यामुळें त्याची निवडणूक सहजगत्या झाली. स्काटलंदच्या धर्मसंस्थेंत ह्यावेळीं दुफळी उत्पन्न झाली होती, व त्यांपैकीं एक फळी मेकालेविरुद्ध असून त्यांनीं ह्याला प्रतिस्पर्धी उभा करण्याची भीतिहि घातली होती. पण त्याप्रमाणें या प्रसंगीं तरी कांहीं झालें नाहीं. याजुनारास एलिसला लिहिलेल्या एका पत्रांत मेकाले ह्मणतो " मी कबूल करितों कीं मला आमच्या भावीस्थितीबद्दल अत्यंत आनंद वाटतो. विरुद्ध प्रबल पक्ष हीच गोष्ट मला पाहिजे होती. महाक्रांतीपासून हानोवर घराण्याच्या राज्यारोहणापर्यंतचा माझा इंग्लंदचा इतिहास लिहून होईतोंपर्यंत सद्याची स्थिति जर कायम राहिली तर मला मनापासून आनंद होईल. नंतर मग पुनः थोडींवर्षें अधिकारारूढ होण्यास माझी तयारी असेल. आह्मी सरासरी अगदीं ३०० च्या जवळ होऊं हें स्पष्ट दिसतें. हा माझा फार दिवसांचा अंदाज आहे. एडिंबरो एथें मी मोठ्या थाटानें विजयी झालों, व पुनः अगदीं थोड्या खर्चानें. मला वाटतें ह्या संबंधानें मी जी ऐट मारूं शकेन ती आपल्या ह्या देशांत दुसऱ्या कोणत्याच माणसास मारतां येणार

नाहीं. एकलाख चाळीस हजार यापेक्षां ज्यांची लोकवस्ती ज्यास्त अशा शहरांतून मी आजपर्यंत चारदां पार्लमेंटाचा सभासद निवडून आलों आहें; पण या चाऱ्ही निवडणुकींला मिळून मला पांचशें पौंड देखील खर्च पडलेला नाहीं."

निवडणुकीच्या मंडपांतून जें लोकमत दृग्गोचर झालें, तें अमलांत आणण्यासाठीं आगस्टच्या १९ वीस पार्लमेंत भरलें. राणीच्या मानपत्राची सूचना पुढें आली नाहीं, तोंच त्या मानपत्राच्या निम्यानें लांब अशी एक उपसूचना सभेपुढें आली. तिचा इत्यर्थ इतकाच होता कीं राणीसाहेबांच्या सध्याच्या मंत्र्यांवर राष्ट्राचा भरंवसा नाहीं. ही उपसूचना दोन्ही सभांपुढें एकदम आणिली. वादविवादाच्या पहिल्याच दिवशीं लार्डांच्या सभेंत तिला ७२ मतें ज्यास्त मिळून ती पसार झाली, आणि चवथ्या दिवशीं कामन्स सभेंत ९१ यांच्या बहुमतानें ती पसार झाली. मेकालेनें आपलें मत आपल्या जोडीदारांसारखेंच दिलें हें उघडच आहे. पण सार्वजनिक हिताच्या दृष्टीनें पाहतां जी गोष्ट लांबणीवर पडावी अशी त्याची इच्छा होण्याचा संभवच नव्हता, आणि खाजगी दृष्टीनें पाहतां जी होणार ह्मणून तो आज कित्येक दिवस उघड उघड आनंद मानीत होता, त्या गोष्टी विरुद्ध त्यानें आपला कंठ शिणविला नाहीं.

ह्या सुमारास नेपियरला लिहिलेल्या पत्रांत मेकाले ह्मणतो: "निवडणुकींच्या संबंधानें मला मुळींच वाईट वाटत नाहीं. माझा जसा अंदाज होता तशाच त्या बहुतेक झाल्या आहेत. कदाचित् माझा अंदाज सात आठ मतें आह्मास ज्यास्त मिळावीं असा होता; आणि अजांअंतीं तेवढीं मतें कदाचित् आह्मास मिळतीलहि. हल्लीं मी जितका सुखी आहें तितका मी गेल्या पुष्कळ वर्षांत कधीं नव्हतों असें मी सत्यपूर्वक ह्मणूं शकेन. मी हिंदुस्थानांत गेलों त्याच्या-

पूर्वी, प्रधानमंडळ बदलल्यास, स्वत: लेखणीच्या आधारावर रहावयाचें व बहिणींस खासगी शिक्षकिणींचा धंदा करावयास लावावयाचें ह्या शिवाय मला अन्य मार्ग नव्हता. हिंदुस्थानांत मी वनवासी होतों. तिकडून परत आल्यावर कांहीं दिवस मी स्वतंत्र होतों. पण थोड-क्याच महिन्यांत माझी बहीण व तिचीं मुलें यांचा माझा वियोग घडणार, व कदाचित् कायमचाच घडणार, अशी मला धास्ती होती. ती धास्ती पुढें नष्ट झाली; पण अत्यंत दुर्बल व केवळ 'जीवनार्थ कलह' करणाऱ्या अशा प्रधानमंडळाचा मी एक घटक असून राजसेवेची बिडी माझ्या पायांत होतीच. आतां मी मुक्त झालों आहें. आतां मी स्वतंत्र आहें. मी पार्लमेंतांत आहें, व तेथील माझी स्थिति जितकी सन्मानाची कोणाचीही असूं शकेल, तितकी आहे. माझें कुटुंब सुस्थितींत आहे. वाङ्मयाची सेवा करण्यास मला फुरसत आहे; तथापि पैशाकरितां लिहिलें पाहिजे अशीहि माझी अवस्था नाहीं. माणसाला ज्या ज्या प्रकारच्या स्थिती प्राप्य आहेत त्यांपैकीं पाहिजे ती निवडण्याची जर मला मुभा असती, तर हल्लीं जी स्थिति मला प्राप्त झाली आहे तिच्यापेक्षां दुसरी कोणतीहि स्थिति मला ज्यास्त पसंत पडती, असें मला वाटत नाहीं. खरोखरच मी पूर्णपणें संतुष्ट आहें."

# प्रकरण ७ वें.

## सभासदी व इतिहासलेखन.

प्रधानमंडळ बदललें ह्यापासून मेकालेचें बिलकूल नुकसान झालें नाहीं. त्याचा तोटा झाला तो काय तो पगाराचा; पण त्यामुळें त्याचें अडलेलें नव्हतें; आणि थोडक्याच दिवसांत तो तोटा किती पटींनीं तरी भरून यावयाचा होता. तो आपल्या वेळाचा मालक झाला, त्याचें स्वातंत्र्य त्यास मिळालें, वाटेल तें बोलण्याची, इच्छा होईल तेव्हां लिहिण्याची, आणि पसंत पडेल त्याप्रमाणें राहण्याची, त्यास मोकळीक प्राप्त झाली. त्यानें आतां जो आयुष्यक्रम ठरविला तो त्याच्या अभिरुचीस अत्यंत योग्य असा होता. १८४० च्या शेवटीं मिस्तर व मिसेस ट्रेव्हेल्यन हीं क्लॅफाम येथें रहावयास गेलीं होतीं; तीं निघून गेल्याबरोबर ग्रेट-जार्ज स्ट्रीट मधील आपलें बिऱ्हाड मेकालेनें मोडिलें, आणि आल्बनी चौकांत कांहीं चांगल्या विस्तृत खोल्या भाड्यानें घेऊन तेथें तो जाऊन राहिला. त्याच्या खोल्यांतून जिकडे तिकडे पुस्तकें ठेविलेलीं असून त्यांतलें सामान सुमान जरी श्रीमंती थाटाचें नसलें तरी सुखकारक असें होतें. त्यांत शोभेच्या वस्तू थोड्याच पण निवडक होत्या; थोडींशीं इटालियन चित्रें, एक मोठें व सुस्वर फ्रेंच घड्याळ, प्रसिद्ध फ्रेंच तत्त्वज्ञ व्हाल्टेर व रूसो यांचे लहानसे पुतळे, वगैरे. यांपैकीं शेवटच्या दोन चिजा लेडी हालंडनें आपल्या नवऱ्याचें स्मारक (तो याच्या अगोदरच निवर्तला होता) ह्मणून त्यास दिल्या होत्या.

आपणास मिळालेल्या स्वातंत्र्याचा मेकालेनें पहिला उपयोग जो केला तो टीकाकार या नात्यानें केला. ग्लीग नामक एका लष्करांतील धर्मोपदेकानें वारन हेस्टिंग्स याचें चरित्र लिहिलें होतें; तें अगदींच एक पक्षीय उतरलें होतें; ह्मणून त्याचा चांगला समाचार घ्यावा असें मेकालेच्या मनांत आलें होतें; परंतु त्या वेळीं हा लष्करी खात्याचाच सेक्रेटरी असल्यामुळें आपल्या हाताखालच्याच माणसावर हात उगारणें शोभणार नाहीं, तेव्हां काय करावें, ह्या विचारांत तो होता. इतक्यांत ग्लीगच्या दुर्दैवानें मेकाले ह्या बंधनांतून मोकळा झाला, व नंतर त्याजवर योग्य ताशेरा झाडण्यास त्यास चांगलें फावलें. लार्ड क्लैववरच्या निबंधाप्रमाणें हाहि त्याचा निबंध चांगला वठला, व लोकांस तो फारच आवडला. पण त्यामध्यें मेकालेच्या हातून एक भयंकर नजरचूक झाली होती, ती त्यास पुष्कळ दिवस पुढें नडली. ती अशी. ग्लीग यानें पूर्वीं कांहीं पुस्तकें लिहिलीं होतीं तीं साधारणपणें बरीं होतीं. प्रस्तुत काम त्यानें केवळ पोटासाठीं ह्मणून पत्करिलें होतें, तें घाणेरडें झालें. ह्या गोष्टीला अनुलक्षून मेकाले ह्या निबंधाच्या प्रस्तावनेंत असें लिहून गेला. "केवळ पैशासाठीं हेल टाकण्याचें काम ग्लीगपेक्षां जास्त प्रसिद्ध माणसांनीं जेव्हां जेव्हां हातीं घेतलें आहे, तेव्हां तेव्हां त्यांचेहि लेख याच्या सारखेच वाईट उतरलेले आहेत. 'व्हिकर आफ् वेक फील्ड' एवढ्याच ग्रंथावरून गोल्डस्मिथची किंमत करणें, किंवा नेपोलियनच्याच चरित्रावरून स्काटची किंमत करणें बरोबर होणार नाहीं; मि. ग्लीग हा गोल्डस्मिथ नाहीं, किंवा स्कॉटहि नाहीं. इ. इ."

या ठिकाणीं 'व्हिकर आफ् वेक फील्ड' ह्याच्या ऐवजीं 'इंग्लंदचा इतिहास' असें पाहिजे होतें. पण प्रथम लिहितांना

व मागून प्रुफें तपासतांना, कोन्ही वेळां ही नजरचूक त्याच्या लक्ष्यांत आली नाहीं. आणि रिव्ह्यूचा पुढचा अंक निघे तोंपर्यंत, ह्मणजे आणखी तीन महिने—"व्हिकर आफ् वेकफील्ड" वाईट ह्मणतो असा गाजरपारखी टीकाकार मेकाले हा आहे, अशा लोकापवादास त्यास पात्र व्हावें लागलें. ह्याबद्दल अर्थात् त्यास फारच वाईट वाटलें.

याच्या पुढचा निबंध त्यानें फ्रेडरिक धिग्रेट याच्यावर लिहिला. त्यांत कांहीं शब्द अनुचित आहेत, व कांहीं ठिकाणीं असावा तितका गंभीरपणा नाहीं, असें दोन दोष संपादकानें काढिले होते. दुसऱ्या दोषाच्या संबंधानें मकालेचें असें ह्मणणें पडलें कीं एकाद्या देशाचा इतिहास ग्रंथरूपानें लिहिणें, आणि एकाद्या चरित्रावर टीकात्मक लेख मासिकांतून लिहिणें, ह्या दोन गोष्टी अगदीं भिन्न आहेत. इतिहासासारख्या टिकाऊ ग्रंथांतून व गंभीर विषयांतून विनोदात्मक लिहिणें शोभणार नाहीं हें खरें आहे; पण ज्याचें आयुष्य चार सहा आठवड्यांच्या वर नाहीं अशा मासिकांतून किंवा त्रैमासिकांतून कांहीं भाग गंभीर तर कांहीं विनोदात्मक असें मिश्रण करणें व विषयास रुचि आणणें हें गैर होणार नाहीं. पहिल्या दोषाच्या संबंधानें तो ह्मणतो:—लिहिण्याचा प्रधान नियम, ज्या नियमाच्या मानानें इतर सर्व गौण होत, तो हा होय कीं लेखकानें जे शब्द योजावयाचे ते असे असावे कीं तेणेंकरून त्याच्या मनांतला अर्थ त्याच्या सर्व वाचकांना पूर्णपणें आणि स्पष्टपणें कळून यावा. लेखनशैली शुद्ध आणि भारदस्त ठेवणें ह्याबद्दलचे जे सगळे विचार आहेत ते हा विचार प्रथम साधून मग साधतील तितके साधावे. स्विफ्ट किंवा ड्रायडन यानें योजिला नाहीं तो शब्द आपण कसा योजावा अशा भीतीनें, ज्या लिहिण्याचा सगळा जोर वाचकास समजत नाहीं असलें लिहिणें, ह्मणजे, आथेन्स शहरांतील

वेधशाळेचें प्रमाण राखण्यासाठीं, जिच्यांतून वेध घेतां येत नाहींत अशी, ऑक्सफर्ड येथील वेधशाळेसारखी वेधशाळा बांधण्याइतकें विवेकशून्यत्वाचें आहे. एखादी कल्पना व्यक्त करण्यास जर एकादा शब्द योग्य असेल, ती कल्पना व्यक्त करण्यास जर उच्च आणि नीच सगळे लोक त्याची योजना करीत असतील, ती कल्पना त्या शब्दानें जितक्या पूर्णपणें व्यक्त होत असेल तितकी जर दुसऱ्या कोणत्याच एकेऱ्या शब्दानें होत नसेल, किंवा लांबलचक शब्द-समूहानेंहि होत नसेल, तर तो शब्द लिहिण्यांतून हांकलून लावणें ह्मणजे तेवढी शक्ति फुकट घालवणें असें मी समजतों. इ. इ."

या वेळीं याच्या निबंधांच्या तीन किंवा निदान दोन आवृत्ती अमेरिकेंत निघाल्या होत्या. त्या अर्थात् त्याच्या परवानगीशिवाय काढिल्या होत्या, व त्यांची विक्रीही चांगली होत होती. त्या जशाच्या तशाच छापल्या असल्यामुळें अर्थात घाईनें लिहिणें व घाईनें छापणें ह्यामुळें मुळांत झालेले जे दोष ते त्यांच्यांत जसेच्या तसेच अवतीर्ण झालेले होते. लांगमन नामक प्रसिद्ध पुस्तकप्रकाशकानें तीन वर्षांपूर्वींच ह्यास ते स्वतः एकत्र करून पुनः छापविण्यास सांगितलें होतें. पण तें तेव्हां याला पसंत पडलें नव्हतें. आतां ही बातमी ऐकिल्यावर पुनः त्यानें त्या गोष्टीचा विचार केला, व विचारांतीं ते स्वत: छापवावयाचे नाहींत असेंच ठरविलें. त्यास कारण त्यानें असें दाखविलें कीं मासिकांतील लेख, आणि नियमित ग्रंथरूपानें प्रसिद्ध होणारे लेख, ह्यांना लोकमत एकाच मापानें मोजीत नसतें. मासिकांतील लेखांत ढोबळ चुका असल्या, आत्म-विरोध असला, डोक्यापेक्षां शेपूट अवजड झालेलें असलें, एकादी गोष्ट मध्ये अर्धीच सोडलेली असली, तरी चालते. कारण कधीं कधीं त्यांचा लेखक आपल्या पुस्तकांपासून दूर अंतरावर असतो,

व जवळ जाई तोंपर्यंत थांबावें तर पोट निघून जातें. म्हणून कधीं कधीं हे लेख घाईनें लिहिणें उर्फ तासटणें भाग पडतें. पण लेखकाच्या लेखनशैलींत जर चटकदारपणा असेल, व त्याच्या लिहिण्यांत जर जीव असेल, तर या सर्व व्यंगांबद्दल मासिकांचे सुज्ञ वाचक त्यास क्षमा करितात. पण तेच निबंध त्यानें जर पुस्तकरूपानें छापण्याचें मनांत आणिलें, तर वाचकांची दृष्टि लाग- लीच फिरते. ते त्यास नव्या ताजव्यांत घालूं लागतात; व जर ते त्या ताजव्यानें चांगल्या ग्रंथाच्या वजनास उतरले नाहींत तर त्यास दोष देतात; व हें त्यांचें करणें योग्यच असतें. इ. इ.

वरील विचार त्यानें प्रदर्शितकरून सहा महिने झालें नाहींत तोंच त्याच्या कानीं असें आलें कीं अमेरिकेंत छापिलेले त्याचे निबंध तेथेंच खपतात असें नाहीं; तर त्यांच्या प्रती इंग्लंदांतहि येऊं लागल्या आहेत. तेव्हां ते इंग्लंदांत विकूं नये म्हणून काय- द्याकडे धांव घेणें, व स्वतः ते न छापणें, म्हणजे ' न तुला न मला ' असें करण्यासारखें होणार होतें. हा विचार मनांत आणून त्यानें आपला पूर्वीचा बेत फिरविला, व लॉंगमनच्या द्वारा ते त्यानें १८४३ त स्वतः प्रसिद्ध केले. तो निबंधसंग्रह लोकांस फार आव- डला; त्याच्या आवृत्ती वरचेवर निघूं लागल्या, व लाखोंप्रती खपूं लागल्या, व अजूनहि खपत आहेत. आपल्याकडे तर ते इतके प्रसिद्ध व लोकप्रिय आहेत कीं त्यांबद्दल विशेष लिहिणें मुळींच नलगे. इंग्लंदांत तर त्यांचा खप इतका नियमित व इतका सारखा आहे कीं, राष्ट्राच्या सामान्य भरभराटीच्या मानानें तो स्पष्टपणें कमी होतो व वाढतो; आणि कोळशाचा खप ज्या मानानें कमी जास्ती होईल त्या मानानेंच मेकालेच्या निबंधांचाहि होतो, असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं. पण ह्या ग्रंथाचा अशा रीं

तीनें जो हा विलक्षण जय झाला त्याचें केवळ व्यापारी दृष्टीनेंच महत्व आहे असें नाहीं, तर त्याच्यापेक्षांहि उच्चतर दृष्टीनेंच त्याचें महत्व मानिलें पाहिजे, आणि तेंच मोठें आहे. लाखों माणसांच्या मनांत वाङ्मयाबद्दल अभिरुचि आणि ज्ञानाबद्दल उत्कट इच्छा जागृत करणें, आणि भारदस्त विषयांचें काळजीपूर्वक व मनःपूर्वक विवेचन करणें हें काम विलक्षण बुद्धीच्या माणसास जितकें शोभतें तितकें दुसरें कोणतेंच शोभत नाहीं, असें स्वताच्या उदाहरणावरून सिद्ध करून दाखविणें, हा कांहीं लहानसहान पराक्रम नव्हे.

इकडे टोरी प्रधानमंडळाची स्थिति फारशी चांगली नव्हती. टोरी पक्ष जरी प्रबल होता तरी त्याच्यांतील एकोपा दिवसेंदिवस कमी होत चालला होता. ग्लाडस्टनप्रमाणें सर राबर्ट पील जरी त्या पक्षाकडे होता, तरी त्याचीं मतें हळूहळू निरनिराळ्या सुधारणांस अनुकूल अशीं होत चाललीं होतीं. त्यानें अधिकारारूढ झाल्यापासून दोन तीन वर्षांत जकातीच्या खात्यासंबंधानें बऱ्याच सुधारणा घडवून आणिल्या होत्या. आवक पदार्थांवर कर बसविणें, व विशेषतः कापसासारख्या कच्या मालावर ( ज्याच्यापासून पुढें कपडे वगैरे बनवावयाचें अशा मालावर ) कर बसविणें, हें देशांतील व्यापारास व कारखानदारीस एकंदरींत अपायकारक आहे अशी त्याची खात्री होत चालली होती; व त्यामुळें त्यानें असल्या बऱ्याच आयात जिनसांवरील जकाती अजीबात काढून टाकून किंवा कमी करून त्यांच्या ऐवजीं उत्पन्नावर कर बसविला होता. ही त्याचीं कृत्यें पुराणप्रिय जे त्याचे टोरी पक्षकार त्यांस कशींशींच वाटावयास लागलीं होतीं, व त्यांच्यापैकीं कांहींजण त्याच्याविरूद्ध बिथरावयासही लागले होते. तथापि धान्याच्या कायद्यांच्या संबंधानें त्याचें मत अद्यापि सुधारकांना प्रतिकूलच होतें; आणि तेवढ्यावर त्याचा पक्ष गम खाऊन राहिला होता; तथापि मनांतून कुरकुरतच होता.

असल्या ह्या अडचणीच्या प्रसंगीं त्याच्या एका तरी विरोध्यानें त्यानें मनांत आणलेल्या सुधारणा तडीस नेण्याच्या कामीं त्यास बरीच मदत केली. १८४१–१८४६ ह्या मुदतींत मेकालेनें जें वर्तन केलें तें, एकादा मुत्सदी अधिकारापासून दूर असला ह्मणजे त्यानें कसें वर्तावें, ह्याचा एक कित्ताच होता. तशाप्रकारचें वर्तन करण्यास त्याला एक तसेंच विशेष कारण होतें. आपल्या इतिहासावरील ग्रंथाच्या संबंधानें जो त्याचा सारखा व मन:पूर्वक उद्योग चाललेला होता, त्यांत त्याचें मन नेहमीं गुंतलेलें असे, आणि त्याच्या फुरसतीला कांहींतरी व्यवधान असे. असें असल्यामुळें कांहींतरी उद्योग करून वेळ घालविला पाहिजे अशी त्याची स्थिति नव्हती. आणि अधिकारच्युत मुत्सदी ज्या चुका करीत असतात त्यांतील निम्मेचें कारण, त्यांस कांहीं दुसरा चटकदार उद्योग नसतो, ह्मणून ते अधिकारारूढ मुत्सद्यांच्या कामांत ढवळाढवळ करूं लागतात, हें असतें. पक्षापक्षांचे जे ठरीव संग्राम वेळोवेळीं होत त्यांत तो फारच कचित् मिसळत असे, आणि अशा वेळीं तो बोलला तरी तें उत्तम वठतही नसे पण ज्या विषयांबद्दल त्यास विशेष ज्ञान असेल, व त्याचें मत कायम झालेलें असेल, असे विषय पुढें आले ह्मणजे मग त्या विषयांत तो मन घाली, व त्याच्या भाषणाचा परिणाम तावडतोब दृग्गोचर होई.

ह्या वेळच्या त्याच्या पार्लमेंतीय कारकीर्दीसंबंधानें कोणी असें ह्मटलें आहे कीं, कामन्स सभेच्या लायब्ररींत इतके पुष्कळ तास मोडून, आणि बैठकींतून इतके थोडे तास घालवून, यानें पार्लमेंताच्या कृतीवर जेवढा परिणाम घडवून आणिला, तितका याच्या सारख्या वृत्तीच्या दुसऱ्या कोणत्याहि सभासदानें कधींच घडवून आणिला नसेल. ह्याचें मुख्य उदाहरण ह्मटलें ह्मणजे १८४२ चा

कॉपीराइट आक्ट (पुस्तककर्त्यांच्या पुस्तकावरील हक्काचा कायदा) हा होय. १८१४ च्या कायद्यानें पुस्तकाच्या प्रती छापण्याचा सर्व हक्क पुस्तककर्त्यास प्रथम पुस्तक प्रसिद्ध झाल्यापासून २८ वर्षांचा दिलेला होता; पुढें तें पाहिजे त्यानें छापावें. ही मुदत थोडी आहे अशी ओरड ग्रंथकार व प्रकाशक ह्यांनीं सारखी चालविली होती, व सामान्यजनासहि त्यांची ही तक्रार बरोबर आहे असें आतां वाटूं लागलें होतें. उदाहरणार्थ, मिस मार्टिनो आपल्या इंग्लंदच्या इतिहासांत लिहिते:—" सर वाल्टर स्कॉट मेल्यानें त्याच्या कुटुंबाचें मोठें नुकसान झालें आहे खरें; पण त्या कुटुंबाची त्यानें आपल्या अप्रतिम व लोकप्रिय पुस्तकांच्या रूपानें तरतूद तरी करून ठेविली आहे, असें कोणास वाटेल; पण त्याच्या कादंबऱ्यांचा कापीराइट संपावयाच्या बेतांत आला आहे; आतां त्याचा तो हक्क निघून जाणार; हा केवढा अन्याय होणार आहे, हें कोणास समजत नाहीं असें नाहीं." वर्डस्वर्थ आणि सौदि ह्या कवींची स्थिति ह्याच्यापेक्षांहि चमत्कारीक होती. स्काटप्रमाणें त्यांचे ग्रंथ पहिल्यापासूनच लोकप्रिय नव्हते; तर आतां कोठें ते तसे व्हावयास लागले होते; तों त्यांतील बहुतेकांचा कापीराइट संपण्याच्या बेतांत आला होता.

पण, ह्या सर्वांपेक्षांहि अधिकाऱ्यांच्या मनावर ज्याचा विशेष परिणाम झाला, व ज्यानें त्यांच्या विचारशक्तीची विशेष खात्री पटली, तो टामस कार्लाइल्चा अर्ज होय. त्यांत पुढील आशयाचा मजकूर होता. " तुमच्या अर्जदारानें कांहीं सद्धेतु मनांत धरून निष्कपटबुद्धीनें कांहीं ग्रंथ लिहिले आहेत; त्या श्रमाबद्दल त्यास द्रव्याच्या रूपानें बहुतेक कांहींच मोबदला आजपर्यंत मिळालेला नाहीं; व पुढें कधींकाळींहि तसा मोबदला आपणास मिळेल कीं काय, ह्याबद्दल त्यास वानवाच आहे; आणि त्यास असें

वाटतें कीं, मोबदला कदाचित् मिळालाच, तर जेव्हां त्यास द्रव्याची वाण नसेल, व त्याच्या कुटुंबास असेल, अशाच वेळीं मिळेल; म्हणून तुमच्या अर्जदाराची तुम्हास अशी विनंति आहे कीं, त्याच्या अंगावर घेऊन केलेल्या उद्योगाशीं ज्या तिऱ्हाईत माणसाचा मुळींच संबंध नाहीं अशा माणसांस त्याच्या अल्पस्वल्प फायद्यांतून चोरून घेण्यास आपण निदान साठ वर्षेंपर्यंत तरी मनाई करावी. साठवर्षांनंतर आपण त्यांस मनाई न केल्यास त्यांनीं चोरण्यास खुशाल आरंभ करावा."

१८४१ च्या सेशनांत् सार्जंट टाल्फर्ड ह्यानें असें एक बिल पुढें आणिलं कीं तेणेंकरून ग्रंथकाराच्या मरणानंतर साठवर्षेंपर्यंत त्याच्या पुस्तकाचा कापीराइट त्याच्या वारसांकडे रहावा. मेकालेनें फारच सप्रमाण व दृष्टान्तप्रचुर असें नामी संभाषण करून पातळावलेल्या सभेंतहि तें बिल थोड्या मतांनीं ह्मणून पाडिलें. त्या वेळीं टाल्फर्ड यास अत्यंत वाईट वाटून तो यास असें लावून बोलला, कीं, वाङ्मयाच्या विश्वासू व परिचित व वाङ्मयाचें निमक खालेल्या अशा निकट मित्रानेंच त्याच्यावर आपली लाथ उगारिली आहे.

सार्जंट टाल्फर्डच्या अपजयानें सावध होऊन, पण न घाबरतां, पुढल्या वर्षी लार्ड मेहान यानें आपल्या व्यवसाय बंधूंचा पक्ष उचलिला, आणि वरील तत्त्व कमी आक्षेप्य अशारूपानें अमलांत आणण्याच्या उद्देशानें एक बिल पुढें आणिलें. त्यांत त्यानें असें कलम घातलें होतें कीं ग्रंथकर्त्यांच्या मरणा नंतर २५ वर्षेंपर्यंत त्याच्या ग्रंथांचा कापीराइट त्याच्या वारसांकडे रहावा; त्याची ही सूचना पसंत पडण्याच्या बेतांत आली होती; पण शेवटीं मेकाले उठला, व त्यानें अशी प्रतिसूचना पुढें आणिली कीं पुस्तकप्रसिद्धीपासून ४२ वर्षें पर्यंत त्याच्यावर पुस्तक कर्त्याचा कापीराइट रहावा. त्यानें आपल्या

ह्या सूचनेचें विवरण मुद्देसूद, खुबीदार, आणि जोरदार, अशा भाषणानें केलें; तें भाषण जसें मनोरंजक होतें तसेंच खात्रीकारकहि होतें. तो तें पुरें करून जेव्हां खालीं बसला, तेव्हां सर राबर्ट पील त्याच्याकडे मुद्दाम उठून आला, आणि त्यानें त्याला असें सांगितलें कीं, गेल्या वीस मिनिटांत कापीराइटसंबंधाचे माझे विचार अगदीं बदलून गेले आहेत. एकामागून एक पुष्कळ सभासद उठले आणि त्यांनींहि अशीच गोष्ट कबूल केली; आणि ह्या प्रश्नाचा कोणत्याहि पक्षाच्या हिताहिताशीं कांहीं संबंध नसल्यामुळें जितक्यांचे विचार अशा रीतीनें बदलले, तितकीं मतें ह्याच्या बाजूस आलीं. ह्याचा परिणाम असा झाला कीं, मेकालेच्या ह्मणण्याप्रमाणें लार्ड मेहानच्या बिलांत फेरफार केला, आणि ४२ वर्षांची मुदत बहुमतानें पसंत झाली.

दुसरी एक गोष्ट ह्या वेळीं अशीच घडली. तिच्यासंबंधानेंहि स्वतंत्र कार्यक्रमाचें अवलंबन करून, व मोठ्या हिमतीनें त्याच मार्गाची कांस कायमची धरून, मेकालेनें प्रथम आपल्या पक्षास, व शेवटीं सर्व राष्ट्रास, आपल्या मताच्या बाजूस ओढून आणिलें. अफगाणिस्थानांतील लढाई १८४२ च्या पावसाळ्यांत संपली होती. टोरीपक्ष असें ह्मणूं लागला कीं ह्या प्रसंगीं हिंदुस्थानचा बचाव केल्याचें श्रेय तेव्हांचा गव्हर्नर जनरल लार्ड एलेनबरो यास दिलें पाहिजे; इकडे विरुद्ध पक्षाचें असें मत होतें कीं त्यानें हिंदुस्थानचा बचाव करावा तें एकीकडेच राहिलें; पण उलट दुसरे लोक त्या देशाचा बचाव करीत असतां त्यानें त्यांस विघ्नें मात्र आणण्याची पुष्कळ खटपट केली. बहुतेक व्हिग लोकांचें असें मत होतें, आणि एक व्हिग माणूस प्रत्येक योग्य प्रसंगीं असें प्रतिपादण्यास तयार होता, कीं राष्ट्रानें वाखाणणी करावी असें कृत्य ह्या लाटसाहेबांच्या हातून

आजतागायत मुळींच झालेलें नाहीं. इतकेंच नाहीं, पण उलट पुढें ते काय करितील ह्याबद्दल अत्यंत काळजी उत्पन्न व्हावी अशा-प्रकारचीं कृत्यें मात्र त्यांच्या हातून बरींच झालीं आहेत. मेकालेची स्वताची अशी खात्री झालेली होती, आणि लोकांची तो आतां अशी खात्री करून देण्यास उद्युक्त झाला होता, कीं, लार्ड एलेनबरो जों-पर्यंत गवर्नर जनरलच्या कामावर राहील तोंपर्यंत हिंदुस्थानांत शां-तता ठेवण्याबद्दल सहामहिन्याची देखील हमी कोणी घेणार नाहीं.

२० फेब्रुवारीस कामन्स सभेस ह्या गव्हर्नर जनरलाचे आभार मानण्याबद्दल विनंती करण्यांत आली. त्याच्यावर जो वादविवाद झाला त्यांत विरुद्धपक्षाच्या अग्रणींनीं जीं भाषणें केलीं तीं, एकापक्षीं खोटें बोलण्याची किंवा दुसऱ्यापक्षीं कडू बोलण्याची ज्यांस मोठी पंचाईत पडली आहे, अशा मुत्सद्यांचीं जशीं असावीं तशाच नमुन्याचीं होतीं. आभारप्रदर्शक सूचना अर्थात् सर्वानुमतें पसार झाली; पण मजा काय तर तीनच आठवड्यांच्या आंत पाहवें तों बहुतेक सगळे व्हिग, जिचा गर्भित अर्थ लार्ड एलेनेबरोची प्रत्यक्ष व पुरी निंदा असा आहे, अश व्हर्नन स्मिथ ह्यानें आणिलेल्या एका सूचनेस, गरम अनुमोदन देण्यांत गुंतलेले ! लार्ड स्टानले ह्यानें अर्थात् ह्याचा चांगला फायदा घेतला, आणि सेशनची सुरवात आणि नाताळचा सण, एवढ्या ल्हान मुदतींत, ज्या पक्ष्यांनीं एका सरकारी नोकराचे त्याच्या 'सामर्थ्याबद्दल व शहाणपणाबद्दल' आभार मानले, व त्याचीच वर्तणूक "वेडेपणाची, असभ्य, आणि निंद्य" आहे असें सिद्ध करण्यासाठीं स्वर्गपाताळ एक केलें, त्यांच्या वर्तनांत किती मेळ आहे, हें सर्वांस बरोबर समजावें अशाबद्दल चांगली खबरदारी घेतली. दुर्दैवानें मेकालेचें मन त्यास ह्यावें अशा रीतीचें. त्यानें

कांहीं केलेलें नव्हतें. ह्मणून त्याचें जें ह्या प्रसंगीं भाषण झालें तें वक्तृत्व गुणांत गतपिढींत वारन हेस्टिंग्सची चवकशी चालली असतां बर्क, शेरिडन, व फॉक्स ह्यांची जीं भाषणें झालीं त्यांच्या अगदीं तोडींचें होतें.

ह्या सूचनेवर जेव्हां मतें घेतलीं, तेव्हां तिचा निकाल एकाद्याच्या अब्रूचें संरक्षण करण्याकरितां जेव्हां एकादें प्रबल प्रधानमंडळ आपली सर्व शक्ति खर्च करितें, तेव्हां जसा व्हावा तसाच झाला. १४ मार्चला ड्यूक ऑफ् वेलिंग्टननें लार्ड एलेन्बरोसास लिहिलें. " लार्डांच्या सभेंत जो वादविवाद झाला तो फारच समाधानकारक झाला; आणि मला असें समजलें आहे कीं कामन्स सभेंतही जो तितकाच समाधानकारक होत आहे." ड्यूक साहेबांच्या बातमीदारानें वरवरच पाहिलें असावें असें दिसतें. कारण लार्ड एलेनबरोच्या घोकेखोर क्षुल्लक बुद्धीबद्दल मेकालेनें ज्या मोजून सारख्या शिव्या दिल्या होत्या, त्या निरवधान कर्णावर पडल्या नव्हत्या. त्यानें एक भविष्य केलें होतें, निदान जाणिवलें होतें. " तें असें:—पुढच्या पोस्टानें कोणती माकडचेष्टा आपल्या कानावर येणार आहे हें आज कोण सांगूं शकेल? मला पक्की खात्री आहे कीं, त्या पोस्टाची येण्याची वाट प्रधानांनाहि स्वस्थ चित्तानें पहातां येणार नाहीं, किंवा ईस्ट इंडिया कंपनीच्या डिरेक्टरांनाहि पाहतां येणार नाहीं." त्यानें एक उपदेश करून ठेविला होता. तो असा:— " ईस्ट इंडिया कंपनीचें जे डिरेक्टर लोक येथें हजर आहेत त्यांना उद्देशून दोन शब्द बोलल्याशिवाय खालीं बसणें मला बरें दिसत नाहीं. त्यांच्या शिरावर जी जबरदस्त जबाबदारी आहे, तिचा विचार करण्याची मी त्यांस आग्रहपूर्वक विनंति करितों. लार्ड एलेनबरोला परत बोलावण्याचा अधिकार त्यांच्या हातीं आहे;

आणि मी अशा भरंवशावर राहतों कीं, ते त्याचा उपयोग कर- ण्यास कांहीं करणार नाहींत. " हें त्याचें भविष्य खरें ठरलें, आणि हा त्याचा उपदेश त्यांनीं शब्दशः स्वीकारिला. आणखी बारा महिने निघून जाण्याच्या अगोदरच लार्ड एलेनबरो पूर्वीपेक्षांहि अधिक वाईट खोड्या करतांना सांपडला. ह्या वेळीं हें काम स्वतःच हातीं घेण्याचा मेकालेनें निश्चय केला होता. कामन्स सभेच्या बुकांत त्याची नोटीस आधींच झळकूं लागली होती, आणि तिजवर करावयाचें भाषण त्याच्या डोक्यांत घोळूं लागलें होतें; इतक्यांत २६ एप्रिल १८४४ रोजीं सर राबर्ट पील यानें सभेस असें कळविलें कीं, कोर्ट आफ् डिरेक्टरर्सकडून राणीसाहेबांच्या प्रधानांना एक खलिता आला आहे; त्यांत त्यांनीं असें कळविलें आहे कीं, " हिंदुस्थानच्या गव्हर्नर जनरलास पाहिजे तेव्हां परत बोलाविण्याचा जो अधिकार कायद्यानें दिला आहे, त्याचा आह्मी उपयोग केला आहे. "

पार्लमेंतांत मेकालेची जी प्रसिद्धि होती, व जो अधिकार मानीत, तो वक्त्याच्या बाह्य गुणांमुळें मुळींच उत्पन्न झालेला नव्हता. ह्यासंबं- धानें रिपोर्टर लोकांना ज्या आठवणा आहेत त्या अगदीं स्पष्ट आहे- त; व सगळ्यांच्या जुळतात. टैम्स पत्राचा बातमीदार ह्मणतो: " तो हावभाव थोडकेच करी, व तेहि बेढब असत. त्याचा कंठ पूर्ण व उच्च असा असे; पण तयार झालेले वक्ते त्याच्यांत जो कमी जास्ती- पणा करितात तो त्याजपाशीं मुळींच नसे. त्याचीं भाषणें अत्यंत काळजी पूर्वक तयार केलेलीं असत, आणि एक शब्दहि न विस- रतां किंवा न गाळतां तो तीं बोलून दाखवीत असे. "

ह्यांतलें शेवटचें जें ह्मणणें आहे त्याचें थोडें स्पष्टीकरण करणें जरूर आहे. वेळाच्या स्फूर्तीवर मेकाले पुष्कळदां बोलत असे;

आणि कांहीं उत्तम जाणत्यांचें असें मत आहे कीं अशा प्रसंगीं त्याच्या भाषण शैलींत जी अलंकारांची उणीव असेल ती सजीवपणानें भरून येत असे. जो वादविवाद व्हावयाचा ह्मणून आधींच समजलेला असेल अशा वादविवादांत बोलण्यासाठीं देखील जेव्हां तो उठे, तेव्हां त्याच्या हातांत टिपण नसे, किंवा खिशांत लेख नसे. एखादा वाद पुढें व्हावयाचा असला ह्मणजे आपल्या खोलींतून फेऱ्या घालतांना, किंवा रस्त्यांतून भटकट असतांना, तो तो विषय आपल्या मनांत घोळवून ठेवी. प्रत्येक विचार जसा त्याच्या मनांत उभा राही, तसें त्यास योग्य शब्दांचें शरीर प्राप्त होई, आणि उपमा, दृष्टांत, व अवतरणें ह्यांचा योग्य पोषाक त्याजवर चढे; आणि त्याचें भाषण चाललें असतां जेव्हां तो विचार त्यास आठवे तेव्हांच, ज्या शब्दांच्या योगानें त्यास तिखटपणा व सौंदर्य यावयाचें, ते सर्व शब्द त्यास त्याबरोबरच आपोआप आठवत.

स्टांडर्ड पत्राचा एक बातमीदार ह्मणतो, "तो खोंटेवर जरा वळून उभा राही, आणि टेबलावर जरा ओथंबत असे; पण त्याच्यांत छाप पाडण्यासारखें किंवा नाटकी हावभावासारखें कांहीं नसे. तो फार जलद बोले; आणि त्याच्या ठिकाणीं स्वर बारीक मोठा होणें हें बहुतेक मुळींच नसे; तरी त्याचा स्वर जात्याच कांहीं कर्कश नसे. तो कांहीं अंशीं एकतान असे, व त्याच्यांत चढउतार क्वचित् होई. त्याचीं आरोहणें व अवरोहणें अल्प प्रमाणावर होत. त्याचा भाषणप्रवाह फारच अस्खलित असे, पण त्याच्यांत नेटदारपणा फारच थोडा असे, श्रोत्यांस जी मोहिनी पडे ती त्याच्या भाषणांतील अर्थावरून व शब्दांवरून विशेषतः पडत असे, भाषणाच्या शैलीवरून नव्हे."

डेली न्यूजपत्राचा बातमीदार लिहितो. " सार्वजनिक सभा, धर्मविषयक व्याख्यानस्थानें, कोर्टें, किंवा अस्खलित वाणी संपादन करण्याचीं जीं नेहमींचीं साधनें आहेत, तेथून कांहीं बोलण्याची कला शिकून मेकाले आलेला नाहीं हें स्पष्ट दिसे. त्याची बुद्धि जशी जोरदार तशीच खोलहि असल्यामुळें वक्तृत्व कलेची ओ. ळख करून घेण्याच्या ह्या ज्यापद्धती त्या त्यास पसंत पडण्याचा संभव नव्हता. जो त्याच्या मनाचा भरलेलेपणा निरनिराळ्या विष. यांच्या रूपानें उद्भूत होत असे त्याच्या योगानेंच तो कसलेला वक्ता बनलेला होता. विचाराचा जोर, भाषेचा जोर, हावभावाचा जोर, हे त्याचे विशेष गुण होते. श्रोत्याला जणू काय असें वाटावें कीं कल्पना आणि शब्द हे, प्रथम मला उद्गार मिळावा, प्रथम मला उद्गार मिळावा, अशा अहमहमिकेनें वक्त्याच्या घशांत बुड्बुड्च करीत आहेत. त्याच्यांत अंशाअंशानें कमजास्त होणारें किंवा राहून राहून सखल उंच होणारें असें कांहींच नव्हतें. तो प्रस्तुत विषयाच्या जीवास जाऊन एकदम भिडे, आणि त्याच्या उच्च स्वराचा खणखणीत वेग प्रारंभापासून शेवटापर्यंत सारखा चाले, त्यांत स्खलन होत नसे किंवा स्तंभन होत नसे. ह्या जोर आणि हा जोम ह्यांच्यामुळेंच मेकालेचा रिपोर्टरांना इतका बाऊ वाटे; आणि जेव्हां तो त्यांच्या नेहमींच्या अनुभवाच्या बाहे- रच्या विषयावर बोलावयास लागे, तेव्हां तर नांवें, आणि तारखा, आणि पदव्या, ह्यांच्या ओघाखालीं ते बहुतेक दडपूनच जात. तो लांब चऱ्हाट वळीत बसणारा वक्ता नव्हता. वास्तविक पाहतां त्याची मनःपूर्वकता इतकी मोठी असे कीं, फारच लांब भाषण करूं झटल्यास ती तशी टिकलीच नसती. थोडक्या शब्दांत पुष्कळ विचार दाबून भरण्याची शक्ति ह्याच्या अंगीं पूर्ण असे आणि ती प्रत्येक मोठ्या वक्त्याच्या अंगीं असावयाचीच."

एक चवथा साक्षीदार आपल्या जोडीदारांच्या साक्षीस होकार देऊन शेवटीं असें ह्मणतो; " मेकालेची छाप कामन्स सभेंत विलक्षण रीतीची पडत असे. त्याचें प्रत्येक वाक्य श्रोते अगदीं बकाबक गिळून टाकीत. "

१८४३ चें सेशन खलास झाल्यावरोबर मेकाले ल्वॉर नदींतून वर व खालीं फेरी करून येण्यासाठीं निघाला. ऑर्लीन्स पासून नेन्ट्स् पर्यंत, व परत नेन्ट्स् पासून ऑर्लीन्स् पर्यंत आगबोटींतून बसून जाऊन, नदीचा प्रवास व नदीचा देखावा ह्याबद्दलची जी त्याची आवड, आणि ज्या शहरांत चिरस्मरणीय गोष्टी घडून आल्या असतील तीं शहरें पाहण्याची जी त्याची हौस, ती त्यानें हवी तितकी पुरी करून घेतली. या फेरीच्या वेळीं त्यानें आपल्या बहिणीस जीं पत्रें लिहिलीं आहेत त्यांवरून असें चांगलें सिद्ध होतें कीं, त्यानें जर मनांत आणिलें असतें, तर ती कला मुद्दाम शिकल्या शिवाय, मध्यफ्रान्साचें ऐतिहासिक हस्तपत्रक बऱ्याच चांगल्या रीतीचें त्यानें तोंडानेंच बोलून दाखविलें असतें.

ऐर्लंदांत धर्मसंस्थांच्या संबंधानें एकंदर स्थिति त्या वेळीं कशी शोचनीय होती हें मागें दर्शविलेंच आहे. ह्यावेळीं त्या देशांतील क्याथलिक धर्मोपदेशकांना कांहीं पगार मिळावा किंवा नाहीं, ह्या प्रश्नाची चर्चा चाललेली होती. दोन्ही पक्षांचे मुजाण मुत्सदी त्यांस कांहीं तरी द्यावें ह्या गोष्टीस अनुकूल होते, व तें थोडें सरकारी किंवा प्राटेस्टंट धर्मसंस्थेच्या फंडांतून द्यावें असें व्हिगपक्षाच्या मुत्सद्याचें मत होतें; पण दोन्हीपक्षांची सटर फटर मंडळी अंधवत् प्राटेस्टंट धर्माभिमानी असल्यामुळें ते ह्या दोन्ही गोष्टींस प्रतिकूल होते. मेकाले फ्रान्सांतून परत आल्यावर त्यास नेपियरनें एडिंबरो येथें येऊन आपल्या मतदारांपुढें या विषयावरील आपले विचार

मांडावयास लिहिलें. त्यावर मेकालेनें असें उत्तर पाठविलें कीं असें करणें सध्या उचित दिसत नाहीं. माझें मत क्याथलिक धर्मोपदेशकांस पगार द्यावे, व ते द्यावयाचे ते प्राटेस्टंट धर्मसंस्थेच्या फंडांतून द्यावे असें आहे. पण ह्यांतील एकहि मत माझ्या मतदारांस रुचणार नाहीं. ते माझ्या बोलण्यानें चिडून त्याच्याविरुद्ध उगीच जास्त चळवळ करूं लागतील, व तें पाहून इतर शहरांतील लोकहि त्यांचें अनुकरण करूं लागतील. अशा रीतीनें सर राबर्टपील व सर जॉन रसेल ह्यांच्या एकेकट्याच्या, किंवा दोघांच्या मिळून, पुढारीपणानें असला कायदा पार्लमेंटात पसार होण्याचा जर थोडा बहुत संभव असेल, माझ्यामतें नाहींच, तर तो मात्र नष्ट होईल. आतां असें बिल्च जर पार्लमेंटांपुढें आलें तर मी त्याला आपलें अनुकूल मत देईन, मग त्यामुळें मला माझी जागा गमावण्याचा प्रसंग आला तरी बेहत्तर आहे. पण या वेळीं एडिंबरो येथें जाऊन हा वाद उगीच डंवचून. काढावा अशी माझी इच्छा नाहीं.

ह्या वेळीं बारेर नांवाच्या एका फ्रेंच गृहस्थानें आपल्या आठवणी ह्मणून एक स्वचरित लिहिलें होतें. फ्रान्सांत मोठी राज्यक्रांति झाली, तेव्हांपासूनच्या गोष्टी त्यांत त्यानें दिल्या होत्या, पण त्यांत खोटें फार लिहिलें होतें. त्याच्यावर १८४४ च्या प्रारंभीं मेकालेनें एक झणझणीत लेख लिहिला व त्याची फजिती करून टाकिली. मेकालेनें एकाद्यावर हात उगारिला ह्मणजे तो त्यास कसें करीत असे ह्याचें उदाहरण ह्या लेखांत चांगलें सांपडतें. तो ह्मणतो:—
"हलक्या सलक्या गोष्टी लिहावयाचा बंद झाला ह्मणजे हा खोट्या गोष्टी लिहावयास सुरुयात करितो. आणि काय त्या खोट्या गोष्टी! जो माणूस उष्णकटिबंधांत कधीं गेलेला नाहीं, त्याला गडगडाट व

वादळी पाऊस ह्मणजे काय हें कळत नसतें; ज्या माणसानें नायगारा नदीकडे पाहिलेलें नाहीं त्याला धबधबा ह्मणजे काय ह्याची बरोबर कल्पना नसते; आणि ज्यानें बारेरचें चरित्र वाचलेलें नाहीं, त्यास खोटें बोलणें ह्मणजे काय याची कल्पना व्हावयाची नाहीं, असें ह्मटलें तरी चालेल." आणखी एक "ज्या ज्या गोष्टी खोट्या आहेत, ज्या ज्या गोष्टी अप्रमाणिकपणाच्या आहेत, ज्या ज्या गोष्टी अन्यायाच्या आहेत, ज्या ज्या गोष्टी वाईट ह्मणून प्रसिद्ध आहेत, जर दुर्गुण ह्मणून कांहीं असेल, आणि जर बदनामी ह्मणून कांहीं असेल, तर ह्या सर्व गोष्टी बारेरच्या ठिकाणीं मिश्र झालेल्या आहेत." हें वाचून तो "म्हातारा सोदा आपल्या थडग्यांत देखील कांपूं लागला असेल" ह्यांत शंका नाहीं ?

ह्यानंतर त्यानें ह्याच वर्षी 'बर्कचें चरित्र व लेख' या पुस्तकावर टीकात्मक निबंध लिहावयास हातीं घेतला होता. पण 'रात्र थोडी, सोंगें फार,' 'पट लहान, चित्रें पुष्कळ,' अशी स्थिति झाल्यामुळें त्यास तो सोडावा लागला. कारण हा विषय ह्मणजे त्याच्यावर ग्रंथच लिहावयास पाहिजे असा होता. पण ह्यानें त्या लेखासाठीं जी माहिती तयार केली होती, तिचा उपयोग लार्ड चाटाम (थोरला पिट) याच्यावर एक निबंध लिहिण्याच्या कामीं त्यानें केला.

सन १८४४ आणि १८४५ या दोन सालीं मेकालेनें पार्लमेंटांत बरींच वरचेवर भाषणें केलीं. युनिटेरियन्स (एकेश्वरवादी) ह्मणून जो ख्रिस्ती धर्माचा एक फांटा आहे त्याचे आभार मिळविण्यासारखें एक कृत्य त्यानें या वेळीं केलें. त्यांचीं प्रार्थनेचीं खासगी देवळें, व त्यांच्या खासगी स्मशानभूम्या, ह्यांच्यावर मालकी कोणाची? सरकारची किंवा त्यांच्या पंथाची?—असा एक प्रश्न या वेळीं

निघाला होता. त्यांत यानें त्यांचा पक्ष उचलून खरा ह्मणून सिद्ध करून दाखविला, व त्याप्रमाणें ते विजयी झाले.

दुसऱ्या एका प्रकरणांत ह्या वेळीं अशीच एक कामगिरी यानें बजाविली. माझिनीनामक एक इतालींतील स्वदेशभक्त होता, त्याच्यावर कांहीं संशय असल्यामुळें त्याचीं पत्रें प्रधानांपैकीं एक सर जेम्स ग्रेहाम यानें फोडिलीं होतीं. त्याबद्दल त्याच्या विरुद्ध सूचना कामन्स सभेपुढें येऊन वादविवाद सुरू झाला. त्यांत ह्यानें त्याच्यावर असा ताशेरा ओढिला कीं त्याचा परिणाम 'दारूखान्यांत कुल्पी गोळा' सोडल्याप्रमाणें सभेच्या मनावर झाला, व सर जेम्सच्या विरुद्ध ती सूचना पसार झाली.

त्याप्रमाणेंच मेनूथ नामक आयर्लंदांतील रोमन क्याथलिक शिक्षणसंस्थेस पैशाची जी मदत आजपर्यंत होत होती ती ज्यास्त करावी ह्मणून एक सूचना पुढें आली होती; तिच्यावर मोठा वादविवाद झाला. त्या वादविवादांत मेकालेनें त्या सूचनेस अनुकूल असें जोरदार भाषण केलें होतें. त्यांत त्याचे शेवटचे शब्द हे होते; " होय, महाराज, ह्या बिलास, आणि ज्या ज्या बिलाच्या योगानें इंग्लंद व ऐर्लंद यांच्या खऱ्या ऐक्याची वृद्धि होण्यासारखी असेल अशा प्रत्येक बिलास, मी आपला टेंका देईन; मग त्यामुळें माझी निंदा होवो, किंवा पार्लमेंतांतील माझी जागा जाण्याची भीति उत्पन्न होवो. कारण अशा प्रकारची निंदा ह्मणजे खरी स्तुति आहे असें मी समजावयास लागलों आहें; आणि माझ्या विषयीं स्पष्टपणें स्वमत बोलून दाखवावयाचें ह्मणाल, तर अशा लज्जास्पद अटीवर ती कधीं आपण पत्करावयाची नाहीं असा मी निश्चयच केला आहे; आणि मला खात्री आहे कीं ती अशा रीतीनें गमावणें जितकें भूषणास्पद आहे, तितकें दुसरें कोणतेंच असणार नाहीं. "

जागा गमावण्याची ज्यास मुळींच भीति नाहीं, आणि धैर्य व निर्लोभता ह्याचें सहज सोंग आणिलें ह्मणजे जी खात्रीनें टाळी मिळते तिच्याविषयीं जो उत्सुक आहे, अशा स्वहितसाधु वक्त्याचे हे शब्द नव्हते. तर ते तो अगदीं मनापासून बोलला होता, आणि पुढेंमागें आपल्या जाग्यास धोका येणार (आणि तसा तो लवकर आलाच) अशीं स्वप्नें त्यास पडलीं असतांच तो तें बोलला होता.

ही सूचना ह्या वेळचा मुख्य प्रधान सर राबर्ट पील यानेंच आणिली होती, व ती त्याच्या पक्षकारांना जरी आवडत नव्हती तरी त्यांचीं अनुकूल मतें घेण्याची फार खटपट चालली होती. वरील भाषणानें जरी मेकालेनें तीस आपलें अनुमोदन दिलें होतें तरी त्याच भाषणांत तो सर राबर्ट पील यास त्याच्या दुटप्पी वर्तनाबद्दल खरमरीत दोष लाविल्याशिवाय राहिला नाहीं. मेकाले ह्मणाला; " ज्या गृहस्थानीं ( टोरीपक्षीय ) राइट आनरेबल बारो-नेटवर ( सर राबर्टवर ) दुसऱ्यानदां विश्वास ठेविला, त्यांची आतां दुसऱ्यानदां फसगत झाल्यामुळें ते त्यास शिव्या देतात त्या उगीच नाहींत. हे ब्यारोनेट साहेब विरुद्ध पक्षाला असले ( टोरी व व्हिग ह्या दोन पक्षांपैकीं जो अधिकारच्युत असेल त्यास विरुद्ध पक्ष--' ऑपोझिशन '--असें ह्मणतात ) ह्मणजे त्यांच्या अनुयायांच्या ज्या प्रबल मनोवृत्ती त्यांना मुळींच आवडत नसतील, व त्यांच्या ज्या पूर्वग्रहांबद्दल त्यांना स्वतःला अत्यन्त तिटकारा असेल, अशा मनोविकारांचा व पूर्वग्रहांचा वरचेवर फायदा घेत असतात. पण तेच अधिकारापन्न झालें कीं लागलेंच त्यांचें वर्तन बदलतें. ज्या साधनांनीं त्यांनीं स्वकार्य साधून घेतलें असेल तीं साधनें ते लाग-लींच फेकून देतात. ज्या शिडीनें ते वर चढले असतील ती ते लाथेनें खालीं फेंकून देतात.......रोमन क्याथिलक लोकांचें विशेष

हक तुह्मी कांहीं तरी कमी कराल ह्मणून उत्सुक, भोळ्या, व गरम डोक्याच्या अशा प्राटेस्टंट लोकांनीं तुह्मास अधिकारारूढ केलें. त्याच रोमन क्याथलिक लोकांस सरकारी तिजोरींतील पैसा देण्याचें तुह्मी सुचवितां हें पाहून ते प्राटेस्टंट लोक विस्मित झाल्यास व कुरकुरूं लागल्यास त्यांत आश्चर्य आहे काय ? देशाच्या ह्या टोंकापासून त्या टोंकापर्यंत चळवळ उडावी व ओरडा सुरू व्हावा, आणि प्रत्येक रात्रीं बर्फवृष्टी झाल्याप्रमाणें आमचीं ही बांकें अर्जांनीं शुभ्र होऊन जावीं, ह्यांत नवल तें काय ? आह्मी ( मेलबर्न प्रधानमंडळ ) जेव्हां अधिकारारूढ होतों तेव्हां ज्या लोकांनीं मेनूथच्या जुन्या देणगीसच आक्षेप घेतला होता, त्याच लोकांनीं जर आतां त्यापेक्षांहि ज्यास्त देणगीस त्यांचें अनुमोदन घेण्यासाठीं तुमचे व्हिप लोक ( मतें गोळा करणारे ) ओढून आणूं लागले, तर तें पाहून बाहेरच्या लोकांस राग आला तर त्यांत नवल तें काय ? आपल्या कृतीचे हे साहजिकच परिणाम आहेत. हीं जीं सगळीं भुतें आह्मास त्रास देण्यासाठीं तुह्मी हुकेहुके करून उठविलींत, तींच आतां तुह्मावर फिरलीं आहेत व तुह्मास त्रास द्यावयास लागलीं आहेत....पण ह्यांत नवल तें कोणतें ? जे लोक बरोबर आहेत असें तुह्मांस माहीत होतें, त्यांस तुह्मी कित्येक सेशनांत सारखे अडवीत व शिव्या देत गेलां, आणि जे लोक चूक आहेत ह्मणून तुह्मास माहीत होतें त्यांस जय आणण्यासाठीं जेव्हां तुह्मी त्यांची फाजील स्तुति करीत गेलां, तेव्हां तुह्मास असें वाटलें होतें कीं, काय कीं ह्याच्या प्रायश्चित्ताचा दिवस कधीं येणार नाहीं ? तो दिवस आतां आला आहे; आणि कित्येक वर्षांच्या कपटीपणाबद्दल प्रायश्चित्त भोगीत ते आपण तेथें बसला आहां. ”

अशा रीतीनें मेकालेस सध्या हौस आव् कामन्सचें काम व इति

हासलेखनाचें काम अशीं दोन कामें असल्यामुळें निबंध लिहिण्यास त्यास बिलकुल फुरसत सांपडत नसे. १८४५ च्या आरंभीं आरंभींच वर्तमानपत्रांतून अशी अफवा उठली कीं मेकालेनें एडिंबरो रिव्ह्यूशीं आपला संबंध तोडिला आहे. तेव्हां ती आपण उठविलेली नाहीं असें त्यानें नेपियरास लागलेंच कळविलें; पण त्याबरोबर त्यानें त्यास असेंहि कळवून ठेविलें कीं इतिहासाचे पहिले दोन खंड पुरे होई तोंपर्यंत आपण दुसऱ्या कशास शिवणार नाहीं. वास्तविकरीत्या पाहतां त्यानें यापुढें रिव्ह्यूंत कधींच लिहिलें नाहीं.

सर राबर्ट पील व त्याच्या पक्षाचे लोक ह्यांच्यामध्यें मतभेद कसा वाढत चालला होता, याचें दिग्दर्शन येथवर दोन चार वेळां झालेंच आहे. तथापि इतके दिवस धान्याच्या कायद्याच्या संबंधानें तरी त्याचें मत त्याच्या पक्षकारांच्या मताहून फारसें भिन्न नव्हतें. पण तेंहि आतां ( १८४५ च्या अखेरीस ) बदललें. यास कारण ऐर्लंदाची स्थिति ही झाली होती. त्या वर्षी आयरिश लोकांचें मुख्य खाद्य जे बटाटे त्यांस कीड लागून त्यांचें पीक अगदींच बुडालें होतें; आणि धान्याच्या कायद्यामुळें बाहेरून धान्य आणण्याची सोय व शक्ति नव्हती. अशी स्थिति असल्यामुळें आयर्लंदांत पुरा दुष्काळ उडून गेला; लोक सहस्रशः मरूं लागले; पुष्कळांनीं देशत्याग केला, व बरेच जण अमेरिकेंत रहावयास गेले. एकंदरींत त्या देशाची लोकसंख्या एक चतुर्थांशापेक्षां जास्तीनें कमी झाली. ही स्थिति पाहून धान्यावरची जकात कायम ठेवणें अगदीं गैर आहे अशी पीलची खात्री झाली. त्यानें १८४२ सालीं १८२८ सालच्या धान्याच्या कायद्यांत कांहीं फेरबदल करून लोकांस इष्ट अशी कांहीं सुधारणा केलीच होती. तेव्हांपासूनच त्याचे अनुयायी त्याजवर कुरकुरावयास लागले होते. आतां जेव्हां तो धान्या-

वरील कर अजीबात काढून टाकण्याचा विचार करूं लागला, तेव्हां त्याच्या जोडीदार प्रधानांपैकीं देखील कांहीं त्याच्यावर बिथरले; खुद त्याचा परमस्नेही ड्यूक आव् वेलिंग्टन त्याला मदत करीतनासा झाला; व लार्डांची सभा तर अगदीं चवताळून गेली.

हें पाहून निरुपाय होऊन त्यानें मुख्य प्रधानकीचा राजीनामा दिला. तेव्हां राणीनें लॉर्ड जॉन रसेल ( व्हिग पक्षाचा अग्रणी ) यास बलावून नेलें, व त्यास मुख्य प्रधानकी देऊं करून नवीन प्रधान-मंडळ बनवावयास सांगितलें; त्यानें मी आपल्या सोबत्यांस विचारून मग काय तें नक्की कळवितों असें सांगितलें. त्या वेळची स्थिति मोठी बिकट होती. कारण कामन्ससभेंत बहुमत टोरीपक्षाचें होतें. तेव्हां यांनीं प्रधान होण्याचें कबूल केलें तरी राज्यकारभार हाकलावा कसा? बरें, हें पार्लमेंत बरखास्त करून नव्या निवडणुकी करवाव्या, तर आपल्या पक्षाचेच जास्त सभासद निवडून येतात असा काय नियम ?

ह्या सर्व गोष्टींचा विचार करून त्यांनीं शेवटीं असें ठरविलें कीं धान्यावरील कर काढून टाकण्या पुरता ह्मणून आपण आपल्या हातीं सध्या अधिकार घ्यावा. तसें केल्यास राबर्ट पील व जेम्स ग्रेहाम ह्यांनीं त्यांस मदत करण्याचें वचन दिलें होतें. तें वचन त्यांनीं पाळिलें तरी लार्डांची भीति होतीच. तथापि यत्न करून पहावयाचा असा त्यांनीं निश्चय केला, व मुख्य मुख्य पुढाऱ्यांनीं सभा करून कोणाला कोणता अधिकार द्यावयाचा हें ते ठरवूं लागले. या व्यवस्थेप्रमाणें मेकालेस पे मास्टर आव् धि फोर्सेस ( सैन्याचा पगार वांटणारा प्रधान ) ही जागा द्यावयाची असें ठरलें. ती त्यास फार सोईवार होती. कारण सही करण्यापलीकडे काम नसून पगार वर्षाचा दोन हजार पौंड होता. पण फॉरेन सेक्रेटरी ( परराज्याशीं व्यवहार

करणारा प्रधान) कोणीं व्हावें ह्याविषयीं तंटा पडला. लार्ड ग्रे ला तो हुद्दा पाहिजे होता, व लार्ड पामर्स्टन यालाहि तोच हुद्दा पाहिजे होता. पामर्स्टन हा भांडखोर व उतावळी आहे अशी समजूत असल्यामुळें, व फॉरेन सेक्रटरीचा परराष्ट्रांशीं संबंध येत असल्यामुळें तें नाजुक काम याचे हातीं देण्यास लार्ड जॉन रसेल खुशी नव्हता. पण त्याचें पार्लमेंतांत वजन फार असल्यामुळें त्याला नाखुष करणें हेंही इष्ट नव्हतें. त्याला होम सेक्रटरी, वसाहतींचा सेक्रेटरी, नौकाखात्याचा मुख्य प्रधान, इत्यादि अनेक जागा देऊं केल्या; पण तो ऐकेना, व लार्ड ग्रेहि आपला हेका सोडीना. तेव्हां निरुपाय होऊन लार्ड जॉन रसेलनें राणीकडे जाऊन मुख्य प्रधानकीचें काम नाकारिलें. अर्थात् सर राबर्ट पील पुनः स्वस्थानीं विराजमान झाले.

ह्या इतक्या घालमेलींत मेकालेवर एक नवीच घोरपड येऊन पडली. तो प्रकार असा. एडिंबरो येथील त्याच्या मतदारांपैकीं म्याकफर्लेन नांवाचा कोणी त्याच्या विशेष विश्वासांतला होता. त्यानें राणीकडे रवाना करण्यासाठीं एडिंबरो एथील लोकांचा एक अर्ज याजकडे पाठविला होता. त्यांत बाहेरून धान्य आणण्यास हल्लीं जे प्रतिबंध आहेत ते सर्व काढून टाकावे अशी विनंति केली होती. मेकालेनें त्यास उत्तर देतांना प्रारंभीं असें लिहिलें. “ नवें प्रधानमंडळ बनवण्याचा जो यत्न आह्मीं केला होता त्याचा शेवट काय झाला, हें तुह्मांस समजलेंच असेल. आमचे सगळे बेत लार्ड ग्रेनें फुकट घालविले. मी आशा करितो कीं सार्वजनिक हिताचें येणेंकरून नुकसान न होवो. या प्रश्नाचा निकाल करण्याचें काम आतां सर राबर्टनेंच आपल्या शिरावर घेतलें पाहिजे. तो त्याचा निकाल करूं शकेल हें खचीत आहे. आह्मी त्याचा निकाल करूं शकलों असतों, असें तितक्या खात्रीनें सांगतां येत नाहीं. कारण

आह्मीं प्रत्येक जण त्याला साहाय्य करूं; पण हल्लीं जे अधिकारापन्न आहेत त्यांपैकीं बऱ्याच जणांनीं आह्मांस साहाय्य करण्याचें नाकारिलें असतें. ह्या एकंदर व्यवहारांत माझा जो स्वताचा भाग आहे, त्याचा विचार केला ह्मणजे मला समाधानच वाटतें, वाईट वाटण्यासारखें माझ्या हातून कांहींच झालेलें नाहीं. पहिल्यापासून मी लॉर्ड जॉन यास असें सांगून ठेविलें होतें कीं मी तुमच्यापासून एवढेंच वचन मागतों कीं तुह्मी धान्याचे कायदे एकदम अजीबात रद्द करावे; तुह्मीं जर ह्मणाल कीं आह्मी हळूहळू रद्द करूं, तर त्यास माझी अनिवार्य हरकत आहे. पण एवढा जर. करार तुह्मी माझ्याशीं कराल, तर बाकी सर्व गोष्टींत तुह्मी सांगाल तें मी ऐकेन. तुमच्या सोईप्रमाणें मी कोणतीही जागा पत्करीन, किंवा नको असल्यास तसाच राहीन; मला अमकीच जागा पाहिजे किंवा प्रधान मंडळांत तमकाच माणूस नको असें ह्मणून तुह्मांस कोणतीही अडचण कधींच करणार नाहीं. जर इतर प्रत्येकजण अशा रीतीनें वागला असता, तर ह्या वेळीं लिबरलप्रधानमंडळ अधिकारारूढ असतें. तथापि, मी वर ह्मटलेंच आहे त्याप्रमाणें, झालें तें कदाचित् ठीकच झालें."

दुर्दैवानें असें झालें कीं, आपला प्रतिनिधि कट्टा अनिर्बंध व्यापारभक्त आहे हें सिद्ध करून दाखविण्याची इतकी चांगली संधि साधण्याची जी म्याकफर्लेन यास उतावळी झाली तिच्याभरांत शहाणपणा व युक्तायुक्त विचार या दोहोंची भूल पडून त्यास असें वाटलें कीं, इतकें चांगलें पत्र आपल्याशींच ठेवणें चांगलें नाहीं. सारांश, तें स्काट्स्मन नामक पत्रांत प्रसिद्ध झालें, आणि देशांतील सर्व वर्तमानपत्रांनीं तें घेतलें. याबद्दल मेकालेस अंतःकरणपूर्वक वाईट वाटलें, व मरेपर्यंत तो तें विसरला नाहीं. आपल्या एका

फार दिवसांच्या मित्राचे व बरोबरीनें काम केलेल्याचे दोष दाखविणारा या नात्यानें आपलें जगापुढें प्रदर्शन झालें, हें पाहून त्यास फार दुःख झालें.

सपाटून तडाके ओढण्याचा मेकालेचा स्वभाव या वयांतहि कायमच होता; पण सार्वजनिक हिताकडे योग्य नजर देऊन व वेळ पाहून तो ते तडाके ओढीत असे. जानेवारी १८४५ मध्यें त्यानें नेपियर यास असें लिहिलें होतें. "गेल्या सेशनाविषयीं तुह्मीं जें आपलें मत लिहिलें त्याबद्दल मी आपला फार आभारी आहें. मी जेव्हां जेव्हां बोललों आहें तेव्हां तेव्हां कामन्स सभेला माझें भाषण पसंत पडलेलें आहे. मी ज्या वर्तनक्रमाचें अवलंबन केलें आहे, त्याबद्दल मला मुळींच वाईट वाटत नाहीं. पुष्कळ शुद्ध मनाच्या माणसांचें असें मत आहे कीं, राजकीय कामांत मागच्या गोष्टी उकरून काढूं नयेत. माझें दृढमत झालेलें आहे कीं, हें त्यांचें ह्मणणें चुकीचें आहे. आणि मला असें खास वाटतें कीं, माणसांच्या मागच्या कृतीकडे जर काणाडोळा केला, तर तें नीतीविरुद्ध होईल, आणि तेणेंकरून सर्व सार्वजनिक नीतिमत्तेची इतकी राखरांगोळी होऊन जाईल कीं, पील यानें ज्या गोष्टी केल्या आहेत, त्यापेक्षांहि जास्त चांगल्या गोष्टी तेणेंकरून साधत असल्या तरी नकोत."

हें मेनूथ कालेजच्या संबंधाचें व पीलच्या आजपर्यंतच्या इतर कृतीबदल झालें. पुढच्या गोष्टीच्या संबंधानें आणि धान्याच्या कायद्याच्यासंबंधानें तो लिहितो: "पीलच्या धडधडीत परस्परविरुद्ध वर्तनाबदल मला जें कांहीं ह्मणावयाचें आहे, तें मला हें बील (धान्याचे कायदे रद्द करण्यासाठीं पीलनें या वेळीं आणलेलें बिल) पार पडे तों तसेंच थांबवून ठेविलें पाहिजे. मेनूथ प्रश्नाच्या वेळीं त्याचा पराजय होण्याची धास्ती नव्हती; ह्मणून मी त्या वेळीं त्याच्यावर

हात उगारण्यास मागेंपुढें पाहिलें नाहीं. पण तो जमीनदारांविरुद्ध लढाई करण्यांत गुंतला असतां, त्याजवर जोरानें ठोंसे लगावणें हें बरोबर होणार नाहीं. आह्मीं त्याला यावेळीं होईल तितकें साहाय्य केलें तरच त्याचा या लढाईत जय होणार आहे. मागच्या गोष्टी-कडे नजर फेंकण्यास पुढें संधि येईलच. हल्लीं आमचें कर्तव्य ह्मटलें ह्मणजे आपलें राष्ट्र जें या मोठ्या विकट व धोक्याच्या प्रसंगांत सांपडलें आहे त्यांतून त्यास पार नेणें हेंच आहे. "

पण हा प्रसंग पार पडल्यानंतर सर राबर्ट पील यास त्याच्या प्रतिपक्षांनीं कितीहि निष्ठापूर्वक मदत केली, तरी तो अधिकारारूढ राहिला नाहीं. १८४६ च्या २६ जूनला धान्याच्या कायद्याविषयींचें बिल लार्डांच्या सभेंतून पार पडलें; आणि तीच रात्र निघून जा-ण्याचा अगोदर प्रधान मंडळास कामन्ससभेंत अखेरचा ठोंसा मिळाला. तेव्हां लार्ड जान रसेल यास नवें प्रधानमंडळ बनविण्या-बद्दल पुनः आज्ञा झाली. आपल्या इतिहासलेखनाच्या कामांत अत्यंत अल्पव्यत्यय आणणारें ह्मणून जें काम त्यास सर्वांत पसंत होतें, तेंच मेकालेस मिळालें. आणि अशा रीतीनें तो सैन्याचा पेमास्तर जनरल झाल्यावर रीतीप्रमाणें पुनः निवडून येण्यासाठीं एडिंबरो येथें गेला. ९ जुलै रोजीं रॉयल हाटेलमधून मिसेस ट्रेव्हेल्यनला त्यानें असें लिहिलें. " मी एडिंबरो येथें काल रात्रीं येऊन पोहोंचलों, आणि पाहतों तो शहरांत सर्वत्र वावटळ उठलेली. डिसेंटर लोक (स्था-पिलेल्या धर्मसंस्थेपासून भिन्न झालेले प्राटेस्टंट लोक) व फ्रीचर्चचे लोक यांनीं मेनूथ कालेजसंबंधी माझ्या मतावरून मजविरुद्ध काहूर उत्पन्न केलें आहे, आणि सर कलिंग अर्डली स्मिथ यास निमंत्रण केलें आहे. तो आज सायंकाळीं येथें यावयाचा आहे. मजा अशी व्हावयाची आहे कीं, तो माझ्याच हाटेलांत उतरणार आहे; पण

हॉटेलचा मालक, तेथील चाकर लोक, बिछाने घालणारी बाई, आणि बूट साफ करणारा पोर, हे सर्व माझ्या बाजूचे आहेत. निकाल काय होणार, याबद्दल मला मुळींच शंका नाहीं. निवडणाऱ्या लोकांची आज मोठी जंगी सभा आह्मी भरविली होती. लार्ड प्रॉव्हस्ट (एडिंबरो येथील मुख्य माजिस्ट्रेट) अध्यक्षस्थानीं होता. चांगला पोषाक केलेले सरासरी ३००० लोक हजर होते; पैकीं बहुतेक मतदार होते. मी एक तासपर्यंत बोललों—आणि लोक ह्मणतात, माझें भाषण अधिक चांगलें कधींच झालें नव्हतें. माझ्या भाषणाची छाप बरीच पडली यांत शंका नाहीं. टाळ्यांचा गजर फारच झाला, त्यांत थोडें थोडें हिसफिसचें मिश्रण होतेंच. जेव्हां हात वर करावयास सांगितलें, तेव्हां माझ्या वतीनें किती तरी हात वर झाले, हातांचें तें एक बानच दिसत होतें; विरुद्धपक्षाच्या वतीनें पन्नास हात देखील उठले नाहींत. माझी प्रकृति फारच उत्तम आहे, आणि मला उत्साह फारच वाटतो. लेखनाच्या स्वस्थपणाच्या व फुरसतीच्या योगानें मी जरासा क्षीण झालों होतों. माझें रक्त आतां इतकें गरम झालें आहे कीं तू आतां मला ओळखणार देखील नाहींस. बारा वर्षांपूर्वी सॅडलरशीं जेव्हां मी लीडस् येथें लढलों तसला मी आतां झालों आहे." लढाईबद्दल मेकालेला जी ही बाहुस्फूर्ति झाली ती सर चर्लिंग अर्डलीला फार नडली. मेकालेपुढें त्याचें कांहींच चाललें नाहीं. कारण त्याच्या भाषणापुढें याच्या भाषणाचें कांहींच तेज पडेना. आणि जेव्हां मतें गोळा केलीं तेव्हां मेकालेला त्याच्या दुप्पट मतें मिळालीं. आणि या प्रसंगीं मेकालेचे जरी बरेच पैसे खर्च झाले तरी या तरतरी आणणाऱ्या संभ्रमांतून तो मोठ्या विजयश्रीनें लंदनास परत आला.

रोमच्या साम्राज्याच्या अवनतीचा प्रसिद्ध इतिहासकार जो

गिबन त्यानें आपल्या अत्यन्त मनोरंजक आत्मचरितांत असें लिहिलें आहे कीं, मंडळीकडे जाण्यायेण्याची गर्दी व पार्लमेंताचें सेशन हीं असलीं ह्मणजे माझे मनास जितका उत्साह वाटे, व माझें लेखन जितकें उत्तम वठत असे, तितकें दुसरें केव्हांच नाहीं. गिबन हा त्या वेळीं कमिशनर आफ् ट्रेड ऍन्ड प्लान्टेशन्स् ( व्यापार व वसाहती ह्यांचा कमिशनर ) असून त्या हुद्याचीं कामें करण्यांत आणि सरकारी पैशाच्या काटकसरीबद्दल बर्कनें सुचविलेल्या उपायांवर जे वादविवाद होत त्यांत, त्याच्या मनाला चांगलें उत्तेजन व योग्य मनोरंजन हीं प्राप्त होत. त्याचप्रमाणें पेइपीसाचें ठरीव काम करणें, आणि तिजोरीकडच्या प्रधानांना कामन्स सभेंत प्रश्नांना जीं उत्तरें द्यावीं लागतात तीं देणें, याच गोष्टी मेकाले हा मन्मथच्या ड्यूकाची स्वारी आणि १६८८ ची क्रांति ह्यांचें वर्णन करण्यांत गुंतला असतां त्यास फायदेशीर वाटत. या नवीन पेमास्टर–जनरलाला त्याचें काम जितकें हलकें आहे ह्मणून कळलें होतें त्यापेक्षांहि तें जास्त हलकें आहे, असें त्याच्या अनुभवास आलें. चेल्सी येथें बोर्डाची बैठक कधींकधीं असेल तेव्हां जावयाचें, पेन्शनरांच्या नांवाच्या याद्या बरोबर आहेत कीं नाहींत त्या पहावयाच्या, आणि पेन्शनांच्या देणगीपत्रांवर सह्या करावयाच्या ! एवढेंच काय तें काम त्याजकडे असे; आणि त्या कामांत त्याच्या कालाचा व शक्तीचा जो खर्च होई तो फारच अल्प असे; शिवाय पार्लमेंतांत ह्याचे सभासदबंधू ह्याला सन्मानपूर्वक बोलण्याची गळ घालीत, व ती गळ तो फारच क्वचित् मोडीत असे. १८४६ व १८४७ या दोन सेशनांत तो कायतो पांचदां बोलला; पण त्यानें केव्हांहि व कोणत्याहि विषयावर तोंड उघडिलें ह्मणजे, हान्सार्ड चाळून पाहतां, त्याला बसल्यावर किंवा उठतांक्षणींच टाळ्यांचा गजर झालेला सर्वत्र दिसून येतो.

ज्या माणसानें कांहीं मोठ्या गोष्टी केल्या आहेत, व ज्याच्या हातून त्याहूनही एकदी ज्यास्त मोठी गोष्ट होण्याचा संभव आहे, अशा माणसास पार्लमेंटांत, समाजांत, आणि सर्व ठिकाणच्या ग्रंथ-कर्त्यां व ग्रंथभोक्त्या लोकांत आणि राजकारणी पुरुषांत, जशा प्रकारचा मान मिळतो, व त्याजविषयीं जशा प्रकारची भक्ति उत्पन्न होते, तशा प्रकारचा मान व तशा प्रकारची भक्ति हीं मेकाले यास आतां मिळूं लागलीं होतीं. पण सर्व राज्यांत एक शहर मात्र हल्लीं असें होतें कीं तेथली त्याची लोकप्रियता नष्ट झाली होती; आणि दुर्दैवेंकरून तें शहर एडिंबरो हें होतें. ह्या गोष्टीची कांहीं कारणें बाह्य व अल्प वेळ टिकणारीं अशीं होतीं, पण कांहीं त्याच्या खुद्द स्वभावावरूनच उत्पन्न झालेलीं असल्यामुळें कायमचीं अशीं होतीं.

१८४७ सालीं स्कातलंद देशांतील धर्मसंस्थेची फाटाफूट पूर्ण होऊन गेलेली होती, व त्याबद्दल आतां कोणाचा वादही नव्हता; पण त्या भयंकर प्रसंगीं उत्पन्न झालेला जो कडूपणा तो मात्र अद्यापि शिलक राहिला होता. स्काटलंदांतील लोकांच्या धर्मविषयक मतांकडे इंग्लंदांतील व्हिग लोकांनीं व मुत्सद्यांनीं इतकें दुर्लक्ष केलें होतें कीं, तेणेंकरून स्काच लोकांचें त्यांच्यावरचें प्रेम उडून गेलें होतें. मेकाले हा व्हिग पक्षाचा एक अग्रणी असून स्काटलंदांतील एका शहराचा पार्लमेंतांतील प्रतिनिधि होता. ह्मणून त्याच्या एकंदर जोडीदारांच्या पापाबद्दल त्यास आतां शिक्षा भोगावयास लागली. त्यानें जर लांगूलचालन केलें असतें, तर हें त्याच्यावरचें अरिष्ट टळलें असतें; व्यावहारिक शहाणपणानें निदान त्याचा परिणाम तरी इतका वाईट झाला नसता. पण मेनूथ कालेजा-संबंधानें त्याला जेव्हां हा किंवा तो पक्ष प्रसिद्धपणें स्वीकारण्याचा प्रसंग आला तेव्हां धर्मविषयक देणग्यांसंबंधी जीं त्याचीं मतें होतीं

तीं त्यास प्रसिद्धपणें प्रतिपादणें भाग पडलें. बरें, तें मतप्रदर्शन गोड गोड व दुटप्पी अशा शब्दांनीं होईल तितकें मऊ करावें कीं नाहीं ? पण तेंही नाहीं. कारण तें त्याच्या स्वभावाच्या अगदीं उलट होतें. त्याला सर्व जगाला असें समजावण्याची इच्छा होती कीं, धर्मखात्याच्या विषयांकडे धर्मसंस्थेच्याच दृष्टीनेंच पहावयाचें अशी माझ्या मतदारांची जरी कितीही इच्छा असली, तरी माझी इच्छा त्या विषयांकडे राजसंस्थेच्याच दृष्टीनें पहावयाचें अशी आहे, व तशीच नेहमी असणार.

शिवाय, दुसरी एक गोष्ट अशी होती. स्काटलंद देश हा नेहमींचाच इंग्लंद, आयर्लंद व वेल्स ह्या तीन भागांपेक्षां ज्यास्त राडिकल ( मूळापासून सुधारणा करूं पाहणारा ) असा आहे, व तसा त्या वेळींही होताच; व सर्व स्काटलंदांत एडिंबरो शहर तर फारच राडिकल. आतां मेकाले पडला लिबरल किंवा व्हिग ( नेमस्त सुधारक ); तेव्हां त्याला कॉबेट, हंट इत्यादि जे जलाल सुधारक त्यांच्यांत आपली गणना होईल कीं काय अशी भीति नेहमीं असे. १८४२ च्या मे महिन्यांत पीपल्स चार्टर ह्मणून जो राडिकल लोकांचा अर्ज कामन्स सभेपुढें आला, व ज्यांत वार्षिक पार्लमेंटें, सर्वांना मत देण्याचा हक्क, पार्लमेंटाच्या सभासदांस पगार, इत्यादि कित्येक जलाल सुधारणा करण्याविषयीं विनंती केली होती, त्या अर्जाविरूद्ध मेकाले यानें सणसणीत भाषण केलें होतें; व त्यांत असें स्पष्ट ह्मणून दाखविलें होतें कीं, ह्या अर्जासंबंधानें जर मी मुकाट्यानें अनुकूल मत दिलें, तर एडिंबरो एथील चार्टिस्ट लोक मजवर खुश राहतील, हें मला ठाऊक आहे; पण असें करणें जरी फार सोईवार असलें, तरी तें माझ्या मनाला शुद्ध वाटत नाहीं.

पण या वेळीं जी गोष्ट मेकालेला सर्वांत ज्यास्त नडली ती त्याच्या स्वभावांत व्यावहारिकपणाचा भाग कमी, व तात्त्विक-पणाचा भाग ज्यास्ती, होता ही होय. पार्लमेंताच्या सभासदांना ज्या साधारण गोष्टी कराव्या लागत असतात, त्या करण्याची सफाई याला मुळींच नसे. उदाहरणार्थ, याचे साह्यकारी मतदार जर याच्या-कडे कांहीं एकादी सूचना घेऊन आले, तर ती सर्व ऐकून घ्यावी, मग मुकाट्यांनीं काय करावयाचें तें करावें, हें देखील त्याला साधत नसे. त्यांचें बोलणें ऐकून घ्यावयाचें तें एकीकडेसच राहिलें, पण उलट हाच त्यांना व्याख्यान द्यावयास लागे.

शिवाय, पैशाच्या कामांत मेकालेचें आपल्या मतदारांशीं मोठें कंजूष माणसासारखें वर्तन असे. एरवीं तो उदार असे व कधीं कधीं तर फाजील उदार असे; पण एडिंबरोहून कांहीं मागणी आली कीं ह्याचे हात आंखडले. आणि याचें कारण असें कीं असें केल्यानें लांच दिल्याचा अपराध आपल्या हातून होईल कीं काय अशी त्याला भीति पडे. एकदा त्याला एका शर्यतीसाठीं वर्गणी भर-ण्यासाठीं तेथून विनंति आली होती; ती त्यानें बेलाशक नाकारिली; आणि उलट असें लिहून पाठविलें कीं, "तुह्मी माझ्यावर जो विश्वास टाकिला आहे, त्याबद्दल पार्लमेंतांत तुमची नोकरी बजावणें एवढाच मी तुह्मास मोबदला देईन. आतां हें खरें आहे कीं, तुमचीं जीं मोठीं औदार्याचीं कामें आहेत त्यांना जे काय दोन पैसे माझ्यानें देववतील ते मी मोठ्या खुशीनें देईन; पण ते तरी मी देईनच अशी हमी देत नाहीं. एकाद्या इस्पितळासाठीं किंवा शाळेसाठीं देखील तुमच्या टौन कौंसिलानें मजजवळ पैसे मागावे हें मला बरोबर दिसत नाहीं; पण सध्याची तुमची मागणी इतकी गैर आहे कीं ती मान्य करण्यापेक्षां सभासदीचा राजीनामा देणें

मला जास्त पसंत पडेल, असें मी तुम्हांस स्पष्ट सांगून ठेवितों."

वाग्देवीच्या भक्तांच्या अंगीं जीं व्यंगें असावयाचींच अशी प्रसिद्धि आहे त्यांपैकीं कांहींचा अभाव मेकालेच्या ठिकाणीं इतका पूर्ण होता कीं, ज्या लोकांचा त्याच्या वेळावर व मदतीवर हक्क असे त्यांपैकीं पुष्कळांना, हा किती झाला तरी ग्रंथकर्ता आहे ह्या गोष्टीचा विसर पडलेला दिसे. त्याची जेव्हां भरज्वानि होती तेव्हां मोठमाठ्या गर्दीत मिसळणें, अनोळख्यांशीं खाणें पिणें, इत्यादि गोष्टींत त्याला मजा वाटत असे; पण त्याच्या वयाला जसजशीं ज्यास्त वर्षें होत चाललीं, आणि त्याचा उत्साह जसजसा कमी होत चालला, व प्रकृतीचा पहिला जोम जसजसा कमी होऊं लागला, तसतसें लोकांत मिसळणें हें त्यास ज्यास्त ज्यास्त कठीण वाटूं लागलें. श्रमांचा वीट त्याला कधींच येत नसे; तरी दगदगीचें काम आतां आपल्यास थोड्याच दिवसांत पडणार आहे असा रंग आला म्हणजे तो वाजवीपेक्षां फाजील अस्वस्थ होऊन जाई. पुढें याला जो भयंकर रोग व्हावयाचा होता, व ज्यांत त्याचा अंत व्हावयाचा होता, त्याचें हें पूर्वलक्षण होतें. इतिहासलेखनाचें काम तो नेहमीच शक्ती बाहेर करीत असल्यामुळें (आणि जें काम जीवापेक्षां एकाद्यास ज्यास्त प्रियकर वाटतें तितकें अतिश्रमाचें वाईट काम दुसरें कोणतेंच नाहीं), एडिंबरो एथें गेला असतां जे त्याला समाजांत मिसळण्याचे, बोलण्याचे वगैरे श्रम पडत, आणि जी त्याची लोक सारखी बारीक रीतीची टेहेळणी करीत, किंवा करीत म्हणून त्याला वाटे, ती सोसण्याची शक्ती त्याच्या अंगीं आतां राहिलेली नव्हती. यासंबंधानें मेकालेनें नेपियरास एकदा असें लिहिलें होतें: "एडिंबरोचे लोक जर माझे मतदार नसते, तर थोडे दिवस घालविण्यास त्या शहरासारखी मला ह्या आपल्या सगळ्या बेटांत दुसरी कोणतीच

जागा दिसत नाहीं; पण तेथें मी आलों तर मला इतके सारखे श्रम पडतात, व नेहमी इतकें अगदीं जपून बेतानें वागावें लागतें, कीं तेथें येण्यापासून मला आनंदहि होत नाहीं, किंवा त्यांत शहाणपणा हि दिसत नाहीं. ”

एडिंबरोचा प्रतिनिधि या नात्यानें मेकालेचीं व्यंगें कितीहि असोत, व त्याचीं मूळकारणें कांहींहि असोत, १८४७ त जो त्याच्यावर यासंबंधानें मोठा प्रसंग आला, त्याला तात्कालिक कारण तरी त्याच्या कांहीं हितशत्रूंचा स्वार्थसाधूपणा हें होतें; त्यांनीं या खऱ्या व खोट्या, हंगामी व कायमच्या, बाह्यकारणांचा चांगला फायदा घेतला. पण या गोष्टीबद्दल त्यानें तोंडांतून कधीं ‘ ब्र ’ काढिला नाहीं. अशा लोकांनीं याच्यावर जे आरोप आणिले, त्यां पैकीं एक तर इतका चमत्कारिक होता कीं, तो येथें सांगितल्या-वांचून रहावत नाहीं. तो इतका हास्यास्पद व खोटा होता कीं, तो नुसता सांगितला ह्मणजे त्यांतील शुष्कता वाचकांच्या लक्ष्यांत ताबडतोब येणार आहे. तो आरोप हा कीं, धान्याच्या कायद्यांच्या संबंधानें ह्याचें मत ते एकदम रद्द करावे असें निखालस नव्हतें. येथवर ज्या गोष्टी नमूद केल्या आहेत, व जे पत्रांतील उतारे वगैरे दाखल केले आहेत, त्यांवरून हा आरोप ह्मणजे शुद्ध मत्सरजन्य होता, त्यांत तथ्य कांहीं नव्हतें, ह्याबद्दल पूर्ण खात्री कोणाचीहि होणार आहे.

१८४७ च्या उन्हाळ्यांत पार्लमेंत जेव्हां बरखास्त झालें, तेव्हां राजकारणामुळें, धर्मकारणामुळें, आणखी खाजगी द्वेषामुळें किंवा आपस्वार्थीपणामुळें, जे जे याचे शत्रू झाले होते ते सर्व सर फलिंग अडलीच्या पूर्वीच्या कमिटीच्या निशाणासभोंवती गोळा झाले. पण स्कॉच लोकांमध्यें जे समजूतदार लोक होते ते त्यांस

न मिळाल्यामुळें ही चळवळ लवकरच आगच्या जागीं जिरली; आणि तिचा परिणाम एवढाच झाला कीं, धर्माचें जें पवित्र नांव तें जरा कांहीं दिवस विटाळल्यासारखें झालें; आणि मेकालेचे इतिहासावरील ग्रंथाचे पहिले जे दोन खंड त्यांच्यावर शेवटचा हात मारण्याकरितां जी फुरसत त्याला अवश्य पाहिजे होती, ती त्यास मिळाली.

ह्या चळवळीचे जे अग्रणी होते त्यांना असें वाटलें कीं, मेकालेच्या विरुद्ध उमेदवार उभा करावयाचा तर तो सर कलिंग अर्डलीपेक्षां ज्यास्त जोरदार पाहिजे. ह्मणून त्यांनीं चार्लस कोवान नामक एका गृहस्थास पुढें केलें. हा गृहस्थ एडिंबरो एथील एका अत्यंत सन्मान्य गृहस्थाचा पुत्र असून, स्वतः त्याचें वर्तनहि फार थोर असे होतें, जरी त्याला सार्वजनिक कामाची माहिती फारशी नव्हती. ज्या गृहस्थानें कोवान याची त्याच्या पहिल्या सभेला ओळख करून दिली त्यानें ती ह्या स्पष्ट मुद्यावर दिली होती कीं, " ख्रिस्ती माणसांनीं ख्रिस्ती माणसांसच निवडलें पाहिजे. " पण ह्या नमुनेदार हेतूंनीं प्रेरित होत्साते लोक जेव्हां एकदा या चळवळीस लागले, तेव्हां यांच्यापेक्षां अधिक ऐहिक व नश्वर हेतूंचे लोक त्यांस जाऊन मिळावयास फारसे विचारांत पडले नाहींत. दारूचा व्यापार करणाऱ्या लोकांचें एक डेप्युटेशन मेकालेकडे आलें, व त्यांनीं त्यास अशी विनंती केली कीं आमच्या व्यापाराला ज्यास्त बरकत येईल अशा प्रकारचा दारूवरील जकातींत फेरबदल करण्याबद्दल आपण खटपट करावी. या गोष्टीस त्यांनीं जीं कारणें दाखविलीं तेणें करून मेकालेची खात्री झाली नाहीं. तेव्हां यानें त्यांला असें स्पष्ट सांगितलें कीं मी तुमच्यासाठीं या बाबतींत कांहीं एक करूं शकणार नाहीं, व बहुधा तुमच्या विरुद्धच मला कांहीं तरी करावें लागेल. या असमाधानकारक प्रश्नोत्तरांचा तात्कालिक परि-

णाम असा झाला कीं, त्यांनीं ब्ल्याकबर्न म्हणून कोणी एक नवाच उमेदवार पुढें आणिला. त्याचें नांव ज्यानें प्रथम लोकांपुढें आणिलें, त्यानें त्याचें असें वर्णन केलें कीं, हे गृहस्थ " दारूच्या व्यापाराचे हितचिंतक म्हणून पुढें आले आहेत, त्यावरून त्यांचें अंतःकरण लोकांसाठीं कळवळणारें असें आहे, हें अगदीं उघड होत आहे. "

ह्यासंबंधानें शेवटचा संग्राम झाला तो थोडकाच वेळ झाला, पण झपाट्याचा झाला. दहा दिवसपर्यंत एका अंगानें छापलेल्या पांढऱ्या रंद छाप्यांनीं यांच्यांत निरनिराळ्या उमेदवारांच्या गुणदोषांचें वर्णन, आपल्या बाजूची स्तुति, विरुद्धाला शिव्या–गद्यात्मक व बहुधा पद्यात्मक, असें चुरचुरींत असावयाचें व लावण्या, कटाव वगैरे म्हणणारांच्या मधुर (!) स्वरांनीं शहराचे निरनिराळे भाग शुभ्र होऊन व वाजून गेले होते. विरोध चालला होता तो बाहेरून पूर्वीच्या दोन्हीं सभासदांविरुद्ध (मेकाले व क्रेग) चालला होता; पण सगळ्या शिव्यांचा भडिमार मेकालेस उद्देशून आहे हें उघड होतें. पण ह्या दिव्यांतून तो एकहि वार न घेतां निभावून आला. कारण, साधूला किंवा भोंदूला, कोणाल्राहि ह्याच्याविरुद्ध जो अत्यन्त घाणेरडा म्हणून आरोप आणतां आला तो हा कीं, मेकाले हा निबंधलेखकच फार आहे, आणि राजकारणी पुरुष फार थोडा आहे. निवडणुकींच्या वेळचीं जीं कवनें ह्याच्याविरुद्ध रचलीं होतीं त्यांतील निम्मे कवनांचा निष्कर्ष हा होता कीं मेकालेनें एक काव्य रचलेलें आहे ( लेज् ऑफ् एन्शन्ट रोम–जुन्या रोमनगरीचें कवन–नामक एक उत्तम छोटेंसें काव्य); आणि दुसरें असें कीं ज्याला जुन्या रोमची इतकी चांगली माहिती त्यास नव्या आथेन्सचा ( एडिंबरोचें लाडकें नांव ) अभिमान असण्याचा संभवच नाहीं ! उमेदवारांच्या नेमणुका करण्याची तारीख

२९ जुलई ही होती. त्यावेळीं निवडणुकीच्या मंडपाच्या समोरची जागा स्वस्त व्हिस्कीच्या भक्तांनीं गच भरून गेली होती. ब्लाकबर्नचें नांव सुचविलें त्यास अनुमोदन देण्यास एक प्रोफेसर शिंगें मोडून आले होते, त्यांस मनमुराद टाळ्या मिळाल्या; पण त्याच लोकांनीं मेकालेशीं इतकें पशुवत् आचरण केलें कीं–मेकालेच्या चरित्रकार ह्मणतो—तें वाचून वाईट वाटतें, व तें येथें नमूद करणें ह्मणजे केवळ निरुपयोगी आहे असें नाहीं, तर त्याच्याहून पलीकडचें आहे. मतांची नोंद त्याच्या दुसऱ्या दिवशीं झाली. तिचा परिणाम कोवान पहिला, क्रेग दुसरा, मेकाले तिसरा, ब्लाकबर्न चवथा, हा झाला. अर्थात् पहिले दोन निवडून आले.

# प्रकरण ८ वें.

## एकान्तवास व इतिहासलेखन.

कांहीं रात्री स्वस्थ झोंप घेतल्यावर कांहीं आणि दिवस पुस्तकांमध्यें स्वस्थपणानें घालविल्यावर, मेकाले या संग्रामाच्या श्रमांपासून व पराजयाच्या दुःखापासून पूर्णपणें मुक्त झाला. ६ आगष्ट १८४७ रोजीं तो आपली बहीण फॅनी हीस लिहितो, “मी हल्लीं एकांतवासांत वाचन व लेखन ह्यांच्यांत गर्क झालेला आहें, व तेणेंकरून मला फार समाधान वाटतें. माझें टेबल सांत्वनाच्या पत्रांनीं, आणि जेथले सभासद अजून निवडले गेले नाहींत अशा जाग्यांपैकीं अर्ध्या जागच्या निमंत्रणांनीं, भरून गेलें आहे. आयर, बायटन, आक्स्फर्ड शायर, इतक्या ठिकाणांहून उमेदवार होण्याबद्दल मला बोलावणीं आलीं आहेत. शेवटल्या दोन ठिकाणांवर माझ्या परवानगीशिवाय माझें नांव देखील सुचविण्यांत आलें होतें, आणि माझ्या पाठिंब्यांना मजकरितां मतें देण्यास मतदानस्थळीं जाण्यापासून आवरण्यास मोठी मारामार पडली.......क्रेग मला असें लिहितो कीं एडिंबरो येथें मोठी धामधूम उडून गेली आहे; आणि ज्या लोकांनीं माझ्याविरुद्ध मत दिलें होतें त्यांस लाज वाटूं लागली आहे, आणि मी परत निवडून यावें अशी त्यांस इच्छा होऊं लागली आहे. माझ्या एडिंबरो येथील मित्रांनीं मला राजकारणांतून हुसकून दिलें तोंपर्यंत मी केवढा थोर मुत्सद्दी आहें हें मला माहीत नव्हतें...”

खासगी आयुःक्रमापासून जितक्या समाधानाच्या गोष्टी प्राप्त होण्यासारख्या असतील त्या मेकालेस यावेळीं हव्या तितक्या होत्या. त्याला जीं समाजसुखें मिळत होतीं तीं अत्यन्त आनंदकारक अशीं होतीं. कारण प्रसिद्ध व विद्वान अशा एका मित्रमंडळापैकीं हा एक असून त्यांचे याच्यावर व एकमेकांवर फार मोठें प्रेम असे. मेकालेचा चरित्रकार ह्मणतो, ह्या मोठ्या माणसांचीं भाषणें किती तेजस्वी असत ह्याबद्दल इतक्यांतच दंतकथा होऊन बसली आहे; त्यांच्या भाषणांचा रिपार्ट अजून प्रसिद्ध झालेला नाहीं, व बहुधा कोणी घेऊनहि ठेविलेला दिसत नाहीं. खाजगी दिनचर्या पुस्तकांतून इकडे तिकडे बारीक सारीक त्यांजबद्दल कांहीं उल्लेख सांपडतात, तेवढेंच कायतें शिल्लक राहिलें आहे. त्यांपैकीं एक लॉर्ड कार्लाईल ह्याच्या दिनचर्यालेखावरून मेकालेचे हे मित्र कोण होते एवढें तरी समजतें. ह्यांपैकीं लार्ड लँड्सडौन, लार्ड मेहॉन, लार्ड जॉनरसेल, हेनरी हालाम, चार्लस आस्टिन, व मिल्मन हे प्रमुख होते असें दिसतें.

सार्वजनिक वक्ता ह्या दृष्टीनें मेकालेच्या हावभावामध्यें कितीहि व्यंगें असोत, खासगी संभाषणाच्या वेळीं त्याची मुद्रा व त्याची बोलण्याचालण्याची ऐट हीं फारच छाप बसण्यासारखीं असत. तो अगदीं ताठ बसलेला असावयाचा, व त्याचे हात खुर्चीच्या हातांवर टेकलेले असावयाचे; किंवा हातांतील काठीच्या मुठीवर गुंडाळलेले असावयाचे; ज्या विषयावर त्याचें बोलणें चाललें असेल, तो जर बोलतां बोलतां मनांत विचार करण्यासारखा असला, तर त्याच्या भिवयांना वळकुट्या पडावयाच्या, आणि जेव्हां एखादा विनोदात्मक उल्लेख यावयाचा असेल, तेव्हां कपाळापासून खालीं खालीं चेहरा तेजस्वी होत जावयाचा. त्याचे ते मोठमोठाले नाकडोळे व त्याची ती प्रामाणिकपणाची डोळ्याची चमक, हीं त्याच्या त्या मजेदार व

मोठ्या आवाजानें बाहेर पडणाऱ्या पाणीदार व शहाणपणाच्या विचारांशीं आणि त्याच्या त्या चटकदार व अत्यंत सुगम अशा वाणीशीं फारच उत्तम जुळत. त्याच्या बोलण्याचा अर्थ समजण्यास ऐकणारास दोनदां विचार कधींच करावा लागत नसे, व खरोखरच वेळहि क्वचित्च मिळत असे. आणि त्याला आपल्या विचारांबद्दल व मतांबद्दल जरी इतकी जबर व पूर्ण खात्री असे, आणि तीं बोलून दाखविण्यास जरी तो इतका सोत्कंठ असे, तरी आपल्या बोलण्यापासून ऐकणारास कोणास काय वाटेल, या गोष्टीचा फार विचार करून तो बेतानें बोलत असे; ह्मणजे त्याच्या अंगीं जो हा सभ्यपणा होता तो केवळ बाहेरचा नव्हे तर अगदीं अंतःकरणाच्या देंठापासून होता. वादविवाद कितीहि झपाट्यानें चाललेला असो, व तो कितीहि वेळ लांबो, मंडळीपैकीं कोणास ह्याच्या संबंधानें हा कधीं असें वाटूं द्यावयाचा नाहीं कीं, मेकाले हा असा एक शब्द न वापरता, हा एक अशा प्रकारचा स्वर न काढता, किंवा ही एक अशा प्रकारची नजर न करता, तर बरें झालें असतें. बरें, आपले विनोदहि तो फार वेळ सुचवीत बसला आहे असेंहि कधीं होत नसे. कोणाच्या तोंडांतून कांहीं वाक्य निघालें, व त्याच्यावर कांहीं योग्य विनोद करण्यासारखा असला, कीं तो ह्याच्या मुखावाटे झट-कन् बाहेर पडलाच.

तुझी स्मरणशक्ति किती आहे ती पाहूंरे ह्मणून कोणी त्याला स्नेहबुद्धीनें आव्हान केलें, तर तें ग्रहण करण्याची त्याची सर्वदा तयारी असे. एके दिवशीं ब्रिटिश म्युझियम (सर्वपदार्थसंग्रहालय) मध्यें सर डेव्हिड डंडस यानें त्याला लार्ड आबर्डीन याच्या हातीं एक फुल्स्केप कागदाचा ताव देतांना पाहिलें; त्याच्या चाऱ्ही पानांत तीन तीन सारखे कालम पाडिलेले असून ते सर्व भरलेले

होते. हा लेख, ज्याची शाई अद्यापि ओली होती, तो तो पहातो तों केंब्रिज येथील सीनियर रँग्लरांची गेल्या शंभर वर्षांची युनिव्हर्सिटी क्यालेंडरावरहुकूम, तारीखवार व कालेजवार, बरोबर यादी! दुसऱ्या एका प्रसंगीं सर डेव्हिडनें विचारिलें. "मेकाले, तुला आजपर्यंतच्या पोपांचीं नांवें बरोबर आठवतात काय?" "छे, इनोसेंट नामक पोपांच्या नांवांचा माझा नेहमीं गोंधळ होतो." पण तूं क्यांटर्बरीच्या आर्चबिशपांचीं नांवें अनुक्रमानें सांगूं शकशील काय रे!" मेकाले उत्तर करितो, "क्यांटर्बरीच्या आर्चबिशपांचीं नांवें आजपासून सुरवात करून मागें मागें पाहिजे त्या 'ढ' ला घेतां येतील." असें ह्मणून त्यानें नांवें घेण्याचा धडाका सुरू केला, आणि ती नामावळ चालली असतां एक आर्चबिशप बॅन्क्रॉफ्ट तर एक आर्चबिशप सॅन्क्राफ्ट, असे दोन विलक्षण रीतीनें सारख्या नांवाचे आर्चबिशप या मालिकेंत आहेत एवढें ह्मणण्यासाठींच कायतो मध्यें एकदां खळला; शेवटीं आर्चबिशप क्रान्मरपर्यंत जेव्हां तो मागें मागें नांवें घेत गेला, तेव्हां सर डेव्हिडनेंच त्यास पुरे ह्मणून त्याचें तोंड बंद केलें.

त्याचे अगदीं निकटचे मित्र व आप्त ह्यांच्या मंडळाच्या बाहेर त्यास काढण्याची मोठी पंचाईत पडे. लंदनमध्यें श्रीमंतांकडे जे मोठमोठाले मेळे जमत असतात, तेथें कोणाला बलावलें असेल व कोणाला नाहीं याचा नेम नसतो; अशा मिसळ मेळ्यांतून जाण्याचा जो त्याला स्वाभाविकच कंटाळा असे तो वर्षानुवर्षे ज्यास्तच वाढत गेला. लेडी ट्रॅव्हेल्यन ह्मणते, "मंडळींत त्याला कंटाळा फारच लवकर येई. अत्यंत उत्तम व अत्यंत आवडत्या अशा कुटुंबांतून देखील हा पाहुणा गेला असतां बोलावलें असेल तितका वेळ राहण्याचा त्याला द्वेष असे. लोकांकडे नुसतें जेवावयास जाण्याचें

देखील त्यास अवघड जाई. आणि बाहेर जाण्यापेक्षा घरीं रहाणें त्यास किती आवडे, व केवळ एकांतवासी बनून जाऊं नये ह्मणून त्याला आमंत्रणें घ्यावयास लावतांना मला किती त्रास होई, याची, त्याचें तें पाणीदार भाषण जे ऐकत असत त्यांपैकीं थोड्यांसच कल्पना असे. पण अशा रीतीनें मिश्रसमाजांत जरी तो लवकर थाके, तरी तो एकटा असला किंवा त्याच्या प्रियकर आप्तांच्या मेळ्यांत असला, ह्मणजे तो कधीं कंटाळत नसे. पुष्कळ लोकांना मुलें फार आवडत असतात, पण मुलांशीं कितीहि वेळ असला तरी कंटाळावयाचा नाहीं, असा दुसरा माणूस मीं कधीं पाहिला नाहीं..... ”

मेकालेचा भाचा ह्मणतो, “ मेकाले मुलांमध्यें असला ह्मणजे त्याला किती आनंद होई, किंवा मुलांना तो किती आनंदवी, ह्याची अतिशयोक्ति करणें अशक्य आहे. खरोखरच तो उत्तमांतला उत्तम खेळगडी असे. नवे नवे खेळ शोधून काढण्याच्या कामीं त्याच्यावर कोणासहि कडी करतां येत नसे; आणि तेच तेच खेळ पुनः खेळण्याचा त्यास कधींहि कंटाळा नसे. त्याच्या भाच्यांच्या करमणुकीसाठीं त्याच्याजवळ अतोनात लहान लहान नाटकें तयार असत. त्यांत त्यानें कितीतरी सोंगें आणावीं, व त्यांची बतावणी इतक्या चतुराईनें करावी कीं निदान त्याचें तें श्रोतृमंडळ तरी गार होऊन जावें. जेव्हां तो त्याच्या छोट्या संवगड्यांपासून दूर असे, तेव्हां तो त्यांना लांबलचक पत्रें वरचेवर पाठवून व त्यांजकडून मागवून त्यांचें व आपलें समाधान करून घेत असे. असलीं पत्रें १८४२ पासून ह्मणजे त्याची भाची मार्गारेट, जिला तो कलकत्याच्या अयांच्या भाषेवरून ‘ बाबा ’ ह्मणून लडिवाळपणानें ह्मणे, ती पांच वर्षांची झाल्यापासून—आढळून येतात.

मेकालेला अहंकार इतका नसे, आणि ज्यांच्या संगतीस तो राही त्यांजपासून आपल्यास बहुमान मिळावा व त्यांनीं आपले शब्द नेहमीं झेलीत असावें, अशी त्यास इतकी अल्प इच्छा असे, कीं मेकाले हा कोणी मोठा माणूस आहे हें त्याच्या भाचाभाचींच्या कित्येक वर्षे स्वप्नांतहि नव्हतें. त्याचा भाचा ह्मणतोः–" आमच्या मामामध्यें अहंकार इतका कमी असे कीं त्याला जग फार थोर समजतें हें आमच्या ध्यानांत फार फारा दिवसांनीं आलें. माझा एक मामा आहे, व तो इंग्लंदाचा इतिहास दोन खंडांनीं लवकरच छापून प्रसिद्ध करणार आहे, व त्या प्रत्येकाचीं ६५० पृष्ठें व्हावयाचीं आहेत, असें मीं आपल्या शाळासोबत्यांस सांगत असे, असें मला अजून आठवतें; पण ह्या पुस्तकांतून त्यांच्या लांबीशिवाय दुसरा कांहीं विशेष गुण आहे, हा विचार त्या वेळीं माझ्या मनांत कधींच आला नाहीं. जशजशीं जास्त वर्षे जात चाललीं, तसतसें त्याला थोर माणूस ह्मणून ह्मटलेलें जेव्हां आमच्या कानांवर जास्त जास्त वारंवार येऊं लागलें, तेव्हां आह्मास विलक्षण व कसेसेंच वाटूं लागलें; आणि टॉम मामा हा इतरांपेक्षां जसा जास्त मायाळू आहे, तसा जास्त हुशारहि आहे, ही समजूत हळू हळू, व बहुतेक आमच्या इच्छेविरुद्धच, आमच्या मनावर बळावत चालली. "

खेळावयाचें ह्मणजे मनापासून खेळावयाचें, आणि काम करावयाचें ह्मणजे कांहीं तरी हेतु साध्य करण्याकरितां ह्मणून करावयाचें, असें ज्यांचें असतें त्या इतर सर्व लोकांप्रमाणें मेकालेला काम आणि खेळ यांच्यामधील भेद चांगला माहीत असे. मध्यें मध्यें, किंवा जे सुंदर स्फूर्तीचे सुखकारक क्षण असतील तेव्हां, प्रयत्न करावयाचा, अशा रीतीनें त्यानें आपल्या आयुष्यांतलें रेखलेलें काम कधीं केलें नाहीं. त्याची कीर्ति झाली तीस तो पात्र होता कीं

नाहीं ह्याबद्दल लोकांनीं आजपर्यंत शंका घेतलेल्या आहेत, व पुढेंहि सारख्या घेत राहतीलच; पण ज्यानें ज्यानें ह्मणून स्वतः ग्रंथ रचले असतील तो तो त्यानें अशी कीर्ति मिळण्यासारखे श्रम केले याबद्दल मात्र कधींहि शंका घेणार नाहीं. ह्यासंबंधानें थाकरे ह्मणतो "निबंधसंग्रह किंवा इतिहास याचीं पाहिजे तीं तीन पानें घ्याः तर, वाचकहो! तुह्मी जे एक सामान्यवाचक, त्या तुह्मांला, कथाप्रवाहाच्या बुडीं, तुह्मांस माहीत आहेत अशा ऐतिहासिक गोष्टींस, पात्रांस, गद्यग्रंथांतील गोष्टींस, किंवा पद्यग्रंथांतील गोष्टींस, एक, दोन, तीन, किंवा अर्धा डझन, उल्लेख केलेले झळकताहेत, असें दृग्गोचर होतें. तुमचा शेजारी, ज्यानें तुमच्या प्रमाणेंच आपण स्वतः वाचलेल्या ग्रंथांतील मुद्या मुद्याच्या गोष्टी आपल्या मेंदूंत सांठवून ठेविल्याच आहेत, तो, आणखी कांहीं मुद्याच्या गोष्टी, उल्लेख, सुंदर विनोद, त्यांतून शोधून काढितो. याच्यावरून ह्या गुरुवर्याची विशाळ स्मरणशक्ति, व विस्तृत विद्वत्ता, एवढींच दिसून येतात असें नाहीं, तर या महापंडिताचा विलक्षण उद्योग, व त्याचे अंतःकरणपूर्वक व नम्रबुद्धीनें केलेले दीर्घ पूर्वश्रम, हेहि दिसून येतात. एक वाक्य लिहिण्यासाठीं तो वीस पुस्तकें वाचतो; एक ओळ वर्णन लिहिण्यासाठीं तो शंभर मैल प्रवास करितो."

ही स्तुति जरी फार आहे तरी फाजील नाहीं, ही गोष्ट त्याचा इतिहासग्रंथ तयार होत असतांचे जे त्याचे कागदपत्र आहेत, त्यांवरून पाहिजे तितकी सिद्ध होते. ८ फेब्रुवारी १८४९ रोजीं, त्याच्या इतिहासाचे पहिले दोन खंड प्रसिद्ध झाल्यावर, तो आपल्या दिनचर्यालेखांत लिहितोः "माझ्या इतिहासग्रंथाचा जो एकंदर प्लान तो आतां सर्व बदलण्याचा माझा निश्चय झाला आहे. प्रथम

मला तो सगळा विषय माहीत करून घेतला पाहिजे; ह्मणजे वाचून आणि प्रवास करून विलियमच्या (तिसऱ्या) कारकीर्दीची पूर्ण माहिती करून घेतली पाहिजे. हें करण्यास मला अठरा महिने लागतील असा माझा अंदाज आहे. मला हॉलंद, बेलजम, स्काटलंद, ऐर्लंड, व फ्रान्स इतके देश पाहून आलें पाहिजे; डच लोकांचीं व फ्रेंच लोकांचीं दफ्तरें धुंडाळिलीं पाहिजेत. दुसऱ्या देशच्या सरकारी कागदांच्या दफ्तरांतून कांहीं मिळण्यासारखें आहे किंवा नाहीं हें पाहिलें पाहिजे. बॉइन्, लंडनडेरी, आघ्रिम, लिमरिक, किन्सेल, नामूर, लाण्डेन, स्टेन्कर्क (वरील देशांतील शहरें) पाहिलीं पाहिजेत. शेंकडों, हजारों पाम्फ्लेटें (राजकीय वगैरे विषयांवरील तात्कालिक व हंगामी छोटे लेख) चाळलीं पाहिजेत. लाम्बेथ,बोडलियन, व दुसऱ्या ऑक्सफर्ड येथील लायब्रया, डेव्हन शायरमधील कागदपत्र, ब्रिटिश म्युझियम, इत्यादिकांतून गेलें पाहिजे, आणि टांचणें करून घेतलीं पाहिजेत; आणि इतकें सगळें झालें कीं, मी आपल्या कामाला लागणार..." हे सगळे बेत त्यानें अगदीं जसेच्या तसे तडीस नेले.

त्यानें जो असा प्रचंड उद्योग केला त्याचें फळ त्यास मिळालें. त्यानें ज्या ज्या गोष्टी केल्या, पाहिल्या, वाचल्या, त्याच ज्यांना पुन: करणाऱ्याचा, व वाचण्याचा प्रसंग आला आहे, अशा विद्वान् व शुद्ध मनाच्या गृहस्थांनीं त्याच्या ज्ञानाच्या विस्तृततेबद्दल व याथार्थ्याबद्दल स्तुतिच केली आहे. प्रत्येकाला, ज्याच्या त्याच्या विशिष्ट उद्योगक्षेत्रांत, मेकालेच्या उद्योगाची मोठी किंमत दिसून येते;' आणि सुसंस्कृत अशा विशेष विषयज्ञाच्या शिफारशीप्रमाणें मोल्यवान् शिफारस दुसरी कोणतीच नाहीं. 'इकानामिस्ट' पत्राचा तेव्हांचा संपादक प्रसिद्ध अर्थशास्त्रज्ञ बेजिहाट ह्यानें अशा प्रकारची प्रशंसा मेकालेची उदारबुद्धीनें केली आहे. त्यानें 'लॉम्बर्ड स्ट्रीट'

( लंदनमधील मोठमोठ्या पेढ्यांचा रस्ता ) नामक मोठा मजेदार ग्रंथ लिहिला आहे; त्याच्या एका भागाच्या प्रारंभीं असें वाक्य घातलें आहे: " ब्यांक ऑव् इंग्लंद हिची उत्पत्ति कशी झाली ही गोष्ट मेकालेनें ( आपल्या इतिहासांत ) निवेदन केली आहे, आणि त्यानें जी गोष्ट इतक्या उत्तम रीतीनें सांगितलेली आहे, तीच पुनः सांगावयास लागणें हें सामान्य लेखकांस शहाणपणाचें कधीं होणार नाहीं." ह्या त्याच्या लिहिण्यांत जर कांहीं दोष असेल तर, त्या विद्वान् लेखकाची विनयबुद्धि एवढाच काय तो आहे. आणि धकलचा जो " सुधारणेचा इतिहास " ह्मणून प्रसिद्ध त्रिखंडी ग्रंथ आहे, त्या ग्रंथाच्या एका अत्यंत मनोहर भागाखालीं तो अशी टिप्पणिका देतो. " दुसऱ्या चार्लस राजाच्या कारकीर्दींत धर्मोपदेशक लोकांबद्दल जो तिरस्कार उत्पन्न झाला, त्याबद्दल मेकालेनें जें लिहिलें आहे, तें अगदीं यथार्थ आहे; आणि मी जो पुरावा गोळा केला आहे, त्यावरून मला असें समजून आलें आहे कीं, या हुशार लेखकानें त्या गोष्टीची अतिशयोक्ति तर केली नाहींच, पण कदाचित् अतिन्यूनोक्तिच केलेली आहे. कित्येक विषयांवर माझा मेकालेशीं मतभेद होऊं शकेल; पण त्याचा अश्रांत श्रम, गोळा केलेली माहिती व्यवस्थित रीतीनें लावण्याच्या कामांतील त्याचें विलक्षण नैपुण्य, आणि त्याच्या सर्व ग्रंथांना जीव आणणारी त्याची स्तुत्य स्वातंत्र्यप्रीति, ह्यांबद्दल त्याची वाखाणणी केल्याशिवाय माझ्यानें राहवत नाहीं...."

मेकालेला जी ही गोष्ट इतकी साधली त्याचें मुख्य इंगित हें होतें कीं त्याच्या वाणीचा व लेखणीचा प्रवाह विलक्षण रीतीनें अस्खलित चालत असून, शिवाय, त्याच्या अंगीं धिमेपणानें सूक्ष्म, आणि दीर्घ असा उद्योग करण्याची शीलता होती. कोणतीहि गोष्ट घाईनें करणें

आणि चांगली करणें ह्या दोन्ही गोष्टी कधीं साधावयाच्या नाहींत हें चॉसर ( इंग्लंदांतील आद्यकवि ) यासहि पूर्ण माहित होतें. ग्रंथरचनेची त्याची ही जी सरणी असे, तीच जर सर्वत्र अमलांत आली, तर पुस्तकें हल्लींपेक्षां चागली निघतील, व आंखूड तर खचित होतील. त्याच्या इतिहास ग्रंथांतील एकाद्या विशेष गोष्टी बद्दलची सर्व माहिती एकदा त्याच्या डोक्यांत आली ह्मणजे तो लागलाच बसे, आणि फारच मोठ्या झपाट्यानें ती सगळी गोष्ट एका बैठकीस खरडून काढी; ह्मणजे प्रथम जी गोष्टींची कल्पना डोक्यांत बनली असेल, तिच्या स्फूर्तीखालीं त्या गोष्टींच्या मुख्यमुख्य मर्यादांची रेखाटणी एकदम करून टाकी; आणि प्रत्येक कल्पना, नांव, आणि शब्दांची ठेवण, त्याच्या तप्त मेंदूतून झपाट्यानें चालणाऱ्या त्याच्या बोटांत जशी उतरली असेल, तशी ती पांढऱ्या कागदावर काळें करून एकदाची सांठवून काढी. अशा स्थितींतल्या त्याच्या हस्तलेखाकडे जर कोणी पाहिलें, तर त्याच्या खेरीज इतरांच्या डोळ्यांना फांटे आणि आडव्या रेघा ह्यांखेरीज सर्व कागदभर दुसरें कांहीं ओळखत नसे; त्यामध्यें शब्द ह्मणजे एका टोंकाला एक अर्धवट वर्ण व दुसऱ्या टोंकाला दुसरा अर्धवट वर्ण व मध्यें एक आडवी ओळ इतकेंच असावयाचें. तो निवर्तल्या नंतर विलियमच्या शेवटच्या दिवसांचा वृत्तांत लेडी ट्रेव्हेल्यननें जो लावून तयार केला, तो असल्या कावळ्या कोंवड्याच्या पायांतूनच होय.

अशा रीतीनें त्याचा एकदां स्थूल लेख तयार झाला, ह्मणजे मग दररोज सकाळीं फूलस्केपच्या सहा बाजवा, अशा रीतीनें तो त्या वरून कायमचा लेख लिहून काढी; व अक्षर एवढें मोठें लिही व खोडाखोड इतकी करी कीं छापलेल्या सरासरी त्यांची अष्टपत्री सा-

त्याचीं दोन पृष्ठें भरत. एवढ्या ह्या लिहिण्यास तो आपलें टास्क (ठरीव काम) असें ह्मणत असे. व तेवढें रोज पुरें झाल्याशिवाय त्यास चैन पडत नसे. ह्याच्यापेक्षां ज्यास्त काम तो फारच क्वचित् करी; कारण पुष्कळ दिवसांच्या अनुभवावरून त्याला असें कळून आलें होतें कीं, ह्यापेक्षां ज्यास्त काम केलें तर त्यावर कांहीं आपलें मन बरोबर लागत नाहीं; आणि कंटाळा आला ह्मणजे कांहीं तरी काम करण्यापेक्षां मुळींच न करणें बरें, असें त्याचें मत असे. ता. ६ मार्च १८५१ च्या दिनचर्यालेखांत तो ह्मणतोः—"लिहिण्याकडे माझें आज मनच घेईना. ह्या कामांत कदाचित् मी जरा आपल्या तब्यतीची फारच प्रतिष्ठा ठेवितों असें असेल; तथापि माझे लेख जे लोकमान्य झाले आहेत त्यांचें बरेंच कारण तब्यत लागेल तेव्हां लिहिणें, आणि विचार व शब्द ह्यांचा प्रवाह जलद वाहण्याचा बंद झाला कीं लागलेंच थांबणें, हें आहे असें मी समजतों.

मेकाले कोणतेंहि वाक्य आपल्या हातून होईल तितकें चांगलें केल्याशिवाय पुढें जात नसे. एकंदर विषयरचना जास्त विशद करण्यासाठीं एकादें सगळेंच्या सगळें प्रकरण पुनः लिहून काढावयाचें ह्याचें त्यास कांहींच वाटत नसे. नेपोलियन जरी कोठें असला, नाटक पहावयास गेलेला असो, किंवा निजावयास गेलेला असो, नेहमी फौज व स्वाऱ्या ह्यांचे विचार त्याच्या डोक्यांत घोळत असावयाचे; तसें मेकालेचें त्याच्या इतिहाससंबंधानें असे. पण इतिहासाचा विचार त्याच्या डोक्यांत किती सारखा घोळत असे, हें त्याच्या संभाषणांत कधीं दिसत नसे. पुष्कळ ग्रंथकारांचें असें असतें कीं, ते एकादा ग्रंथ तयार करीत असतील तेवढा काळ आपल्या कुटुंबाला तें एक प्रायश्चित्त भोगावयास, ते लावीत अस-

तात; कारण तोंपर्यंत त्यांचें नेहमी भाषण त्या विषयावर निघावयाचें. हा जो आपल्पोटेपणाचा फार सूक्ष्म प्रकार आहे, त्यापासून मेकाले अगदीं अलिप्त असे. असें जरी होतें तरी त्याचा ग्रंथ नेहमीं त्याच्या डोक्यांत असे यांत संशय नाहीं. कारण ह्यानें कोणताहि ग्रंथ चाळला, व आपल्या कामाला उपयुक्त असें त्यांतून कांहीं निवडून घेतलें नाहीं, असें क्वचित् होत असे.

पुनः पुनः वाचून पाहून, व फेरबदल करून, याचा एकादा लेख तयार झाला ह्मणजे, दुसऱ्यांना मोठ्यानें वाचून दाखविणें ही जीस गळ्यांत अति कठीण कसोटी, तिला तो तो लावून पाही- आतां हा प्रयोग त्याच्या कुटुंबांतील माणसें व त्याचा परमस्नेही मि. एलिस ह्यांच्या व्यतिरिक्त इतर मंडळींत करण्याचा धीर जरी त्यास कधीं होत नसे, तरी तेवढ्या त्या अल्पमंडळांत त्याला श्रोते आपखुशीनें मिळत असतील ह्यांत संशय नाहीं. दिजेंबर १८४९ मध्यें तो ह्मणतो: " मी आपल्या इतिहासाचा कांहीं भाग हाना व ट्रेव्हेल्यन यांस वाचून दाखविला. तो त्यांस फार आवडलासें दिसलें, हाना तर रडायलाच लागली, व ट्रेव्हेल्यनला झोंप आली नाहीं. हल्लीं मी जें लिहीत आहें, तें माझ्या पहिल्या ग्रंथाइतकेंच चांगलें वठलें आहे, असें मला वाटतें; आणि एलिसचेंहि मत तसेंच आहे. "

जेव्हां जेव्हां त्याचा एकादा ग्रंथ छापून निघत असेल, तेव्हां तेव्हां प्रूफ वगैरे तपासणें हें जें लेखकाच्या धंद्यापैकीं अतिशय म्हारकीचें काम आहे, तें तो अतिशय बारीक रीतीनें व काळजीपूर्वक अश्रांत मेहनत करून करीत असे. जीं कामें पुष्कळ ग्रंथकार आपल्या अनुभवी व काळजीच्या प्रकाशकांकडे मोठ्या खुशीनें सोंपवित असतात, तीं हा किती तरी मेहनत घेऊन स्वतः करीत

असे. ओळी अगदीं केंसा इतक्या देखील समान्तराच्या बाहेर नाहींत, व एका स्वल्प विरामाची देखील चूक नाहीं, इतकें पाहिल्या शिवाय तो स्वस्थ बसावयाचा नाहीं; प्रत्येक प्यान्याच्या शेवटीं चटकदार वाक्य जेव्हां येईल, आणि प्रत्येक वाक्याचा प्रवाह जेव्हां वाहत्या पाण्याप्रमाणें दिसूं लागेल, तेव्हां याचें समाधान व्हावें. एवढी सगळी खटपट तो करी याचें कारण त्याची मनापासून अशी इच्छा असे कीं, जे आपलें पुस्तक हातीं घेतील, त्यांचा आनंद होईल तितका जास्त वाढवावा, व त्यांच्या अडचणी होतील तितक्या कमी कराव्या. इतिहासावरील ग्रंथ लिहिण्यास सुरवात करण्याच्या पूर्वीच त्यानें मनांत असा घांट घालून ठेविला होता कीं, पुस्तक तयार करावयाचें तर असें करावयाचें कीं, तें पुढें आलें, तर तरुण बायांनीं जें अगदीं नवें कादंबरीचें पुस्तक त्यांच्या टेबलावर असेल, व सर्वतोमुखी असेल, तें एकीकडे सारावें, व माझें पुस्तक हातीं घ्यावें. आणि इतिहासावरचा त्याचा ग्रंथ तसाच बठला आहे कीं नाहीं, हें त्या ग्रंथाची ज्यांना थोडी ह्मणून देखील ओळख आहे, त्यांना सांगावयास नकोच.

१८४८ च्या उन्हाळ्यांतील व पावसाळ्यांतील पत्रव्यवहारांत त्याच्या ह्या मोठ्या ग्रंथाला पुष्कळ उल्लेख सांपडतात. त्याचे पहिले दोन खंड त्यानें त्या वेळीं प्रकाशकाच्या स्वाधीन केले होते. पुस्तक लोकांस पसंत पडेल किंवा नाहीं ह्याबद्दल अर्थात् त्याला फार काळजी होती. जेफ्री, एलिस, हाना, लॉंगमन (प्रकाशक), वगैरे सर्व मंडळीस त्याबद्दल मुळींच काळजी नव्हती, पण ह्याला बरीच वाटत असे. मात्र दुसऱ्यांचे इतिहासावरील लोकप्रिय ग्रंथ पाहून यास धीर येई; कारण त्यांच्यापेक्षां आपला ग्रंथ चांगला उतरला आहे, अशी त्याला खात्री होती.

पण ह्याच्या ह्या शंका विनाकारण होत्या. ग्रंथ प्रसिद्ध झाल्यापासून तीन दिवसांच्या आंतच तो लोक प्रिय होणार, ही गोष्ट ठरून गेल्यासारखी झाली. त्याचा ग्रंथ पाहून सगळ्याच राष्ट्राला इतका अभिमान व समाधान वाटलें कीं तें पाहून त्याच्या मित्रांस आनंद झाला; व त्याचे जुने जे राजकारणांतील प्रतिपक्षी त्यांपैकीं बहुतेक याच्यावरचा राग विसरावयास लागले. लार्ड हालिफाक्स त्यास लिहितो: " मी तुझ्या ग्रंथाचा दुसरा खंड वाचून पुरा केला. सत्याच्या सर्व भक्तांस, स्वातंत्र्याच्या सर्व भक्तांस, आणि शांतता व रीतीची मोकळीक ह्यांच्या सर्व भक्तांस, तूं १६८८ च्या आमच्या महाक्रांतीचा इतिहास लिहिलास, याबद्दल तुजविषयीं किती कृतज्ञता वाटली पाहिजे हें मला तुला सांगतां येत नाहीं.... " लार्ड जेफ्री, लिहितो: " तुझी हल्लीं जी ही पूर्वीपेक्षां ज्यास्त शाश्वत कीर्ति एकदम झाली आहे, ती ऐकून मला जितका आनंद व अभिमान वाटतो, त्यापेक्षां ज्यास्त आनंद व अभिमान, ज्या आईनें तुला जन्म दिलें ती जर आजमितीस जीवंत असती, तर तिलाहि वाटला नसता. "

पण मेकालेला जीं हीं सर्वांकडून स्तुतिपर पत्रें येऊं लागलीं त्या सर्वांपेक्षां ज्या गोष्टीनें त्यास विशेष सुख झालें ती ही कीं, ज्या मराया एजवर्थ बाईच्या पुस्तकांपासून त्याला आज ४० वर्षें इतका आनंद झाला होता, तिच्या त्या उपकारांची आपल्या पुस्तकानें कांहीं फेड झाली असें त्यास कळलें. त्या बाईला या वेळीं ८३ वें वर्ष लागलेलें होतें, व पुढें ती थोड्याच महिन्यांनीं निवर्तली. तिनें डा० हालंड यांस या वेळीं एक पत्र लिहिलें होतें, त्यांत ती ह्मणते:—" आणि आतां, माझ्या प्रियमित्रा, मी तुला इतकेंच ध्यानांत ठेवावयास सांगतें कीं, मेकालेच्या ग्रंथाची जी ही मी इतकी स्तुति केली आहे तिला कारण एका टिपेंत त्यानें माझें

नांव घातलें असल्यामुळें जें आत्मसमाधान, जो अहंकार, गर्व, किंवा विस्मय मला वाटत आहे तो नव्हे, !!!! मेकालेविषयीं जें माझें मत आहे तें मी ती टीप वाचण्यापूर्वींच झालें होतें, व तें मी इतरांस अगोदरच व्यक्त करून दाखविलें होतें...."

मेकालेचा ग्रंथ जास्त जास्त लोकप्रिय कसा होत गेला, हें त्याच्या दिनचर्या लेखांवरून स्पष्ट दिसतें. पण त्यांत जे उल्लेख आले आहेत ते विशेषतः किती दिवसांत किती प्रती खपल्या ह्या बद्दलच आहेत. तथापि त्याचा ग्रंथ लोकांस किती पसंत पडला होता याबद्दल ह्या पुराव्या व्यतिरिक्त देखील जास्त पुरावा रोज रोज त्याच्या कानावर येत असे. ह्याबद्दलचीं कांहीं उदाहरणें फार चमत्कारिक आहेत. चांगल्या कुळांतील एका लष्करी अंमलदारास व एका पोलीसास लाथ मारून खालीं पाडल्याबद्दल पंधरा दिवस तुरुंगांत पाठविलें होतें; त्या वेळीं तेथील अधिकाऱ्यांनीं त्याच्या फ्रेंच कादंबऱ्या काढून घेतल्या; पण त्याचें बैबल व मेकालेकृत इतिहासांचें पुस्तक एवढीं त्याच्यापाशीं राहूं दिलीं. म्यांचेस्टरजवळ एक गृहस्थ राहत होता; त्यास वाटलें कीं हें इतकें उत्तम पुस्तक आपण एकट्यानेंच वाचिल्यास तो एक मोठा आपलपोटेपणाच होईल. ह्मणून रोज संध्याकाळीं काम संपलें ह्मणजे तो आपल्या गरीब शेजाऱ्यांस बोलावीत असे, व अशा रीतीनें त्यानें तो सर्व इतिहास अथपासून इतिपर्यंत मोठ्यानें वाचून दाखविला. ह्या वाचनसमातीच्या दिवशीं, श्रोत्यांपैकीं एकजण उठून अशी सूचना करिता झाला कीं, सामान्य कामकरी लोकांस समजेल असा इतिहास लिहिल्याबद्दल मेकालेचे सर्वांनीं आभार मानावे.

इंग्लंदापेक्षां अमेरिकेंत ह्या पुस्तकाचा खप फारच जास्त झाला. ह्याचें कारण त्या वेळीं इंग्लंदांतील पुस्तकांबद्दल तेथें कापीराइट

नसल्यामुळें तेथील प्रकाशकांना ह्याच्या नव्या आवृत्त्या काढून अगदींच स्वस्त दरानें विकतां आल्या. ता. ४ एप्रिल १८३९ रोजीं मेसर्स हार्पर्स ह्या प्रसिद्ध अमेरिकन प्रकाशक मंडळीनें मेकालेस लिहिलें:—" तुमच्या ग्रंथाच्या आमच्या स्वस्त आवृत्तीची आम्हीं एक प्रत तुम्हांस नजर करीत आहों तिचा तुम्हीं मेहरबानीनें स्वीकार करावा. आमच्याशिवाय आणखी तीन प्रकाशक मंडळ्यांनीं आपल्या ग्रंथाच्या आणखी तीन आवृत्त्या काढिल्या आहेत, आणि चवथी तयार होत आहे. अशा रीतीनें बाजारांत सहा निरनिराळ्या आवृत्त्या होतील. आम्हीं आधींच ४०००० प्रती विकल्या आहेत. आणि आमचा अजमास आहे कीं, आणखी सुमारें ६०००० प्रती विकण्याची व्यवस्था लागली आहे. बहुधा आजपासून तीन महिन्याच्या आंत दोन लाख प्रती खलास होतील. आमचा सर्व देश तुमच्या ह्या पुस्तकाप्रमाणें दुसऱ्या कोणत्याहि पुस्तकाला बहुधा एकदम लुब्ध झालेला नसेल." पारिस आणि ब्रुसेल्स ह्या ठिकाणीं कांहीं अंशीं अशीच स्थिति झाली.

मेकालेच्या आंगचा एक विशेष गुण ह्या ठिकाणीं सांगण्यासारखा आहे. तो हा कीं, त्याच्या ग्रंथाचा शेवटचा प्रूफशीट छापणारांकडे रवाना झाला नाहीं, तोंच तो हिरोडेटसपासून तों सगळ्या इतिहासकारांचे ग्रंथ वाचावयास त्यानें सुरवात केलीच. वर्तमानपत्रकारांनीं व मासिककारांनीं त्याच्या ग्रंथांवर जे प्रतिकूल मतलेख लिहिले असतील त्या सर्वांपेक्षां, थ्युसिडैडिसचे ग्रंथ वाचून आपला ग्रंथ त्याच्याहून कमी योग्यतेचा आहे असें जें त्यास वाटलें तेंच, त्यास जर कांहीं वृथा अहंकार उत्पन्न झाला असेल, तर तो जाण्यास कारण झालें असेल. राजकारणी पुरुष या नात्यानें त्याच्या अंगाची कातडी जितकी जाड असे, त्यापेक्षांहि इतिहासकार ह्या नात्यानें जास्त जाड असे. आपल्याला

जितकें उत्तम करतां येत होतें तितकें आपण केलें आहे, अशी एकदां त्याच्या मनाची खात्री झाली, ह्मणजे मग तो प्रतिकूल टीका पाहून फारसा क्रुद्ध होत नसे, किंवा आपल्याच ग्रंथाच्या गुणदोषाबद्दल वादविवादांत शिरून आपली वेळ व शक्ति ह्यांचा अपव्यय करीत नसे. डाक्टर जॉनसन प्रमाणें " आपल्या स्वतःच्या अनुभवावरून, व ग्रंथकर्तृत्वाच्या त्यानें फार वाचलेल्या इतिहासावरून, तो असें शिकला होता कीं, लोकमताच्या सरणींत पुस्तकाची जी किंमत, ती त्याबद्दल काय लिहिलेलें असेल त्यावरून लागत नसते, तर त्यांत जें लिहिलेलें असेल त्यावरून लागत असते; आणि ज्या ग्रंथकाराचे ग्रंथ जिवंत राहण्याचा संभव असेल तो जर ज्या निन्दकांचे ग्रंथ नष्ट होण्याचा संभव आहे त्यांच्यांशीं भांडत बसण्याच्या हलक्या कामास लागला, तर तो त्यांत आपला मूर्खपणा मात्र व्यक्त करितो." दिजंबर १८४९ ह्या वेळच्या एका पत्रांत मेकाले लिहितोः—" एकाद्या माणसावर कोणी हल्ला केल्यानें त्याचें कांहीं नुकसान माझ्या कधीं आढळांत आलेलें नाहीं. दुसऱ्या लोकांनीं त्याच्या विरुद्ध लिहिलेल्या फार उत्तम प्याम्प्लेटांनीं त्याचें जितकें नुकसान होतें त्यापेक्षां त्यानें स्वतः मूर्खपणाची एकहि ओळ लिहिल्यानें जास्त होतें."

त्याचा चरित्रकार ह्मणतोः आतां हें एथें सांगितलेंच पाहिजे कीं, निदान त्याच्या इतिहास ग्रंथाच्या संबंधानें तरी त्याला आपल्या समाधानरूपी तत्वज्ञानाचा फारसा उपयोग करण्याचा प्रसंग आला नाहीं. नापसंती व निंदा ह्यांचे थोडेसे बारीक सुर कांहीं कांहीं ठिकाणीं निघाले. पण प्रशंसेचा जो मोठा दुदुंभि वाजला त्याचें स्वारस्य कमी करण्यास ह्या बारीक सुरांची शक्ति कांहींच झाली नाहीं; आणि सर्वांत जो मोठा नापसंतीचा कर्णा

वाजला तो इतका कर्कश व बेसुर होता कीं, ऐकणारांना तो कानीं पडतांच कानांवर हातच ठेवणें बरें वाटलें. पुष्कळांची अशी समजूत झाली होती कीं आपल्या जुन्या प्रतिपक्ष्याचा सूड घेण्याइतकें आपणास आयुष्य द्यावें म्हणून क्रोकर साहेब आज पुष्कळ दिवस ईश्वराची प्रार्थना करीत आहे. त्याला आतां इष्ट संधि सांपडली होती. तेव्हां ती तो लवकरच साधून घेईल, व मेकाले आणि त्याचा ग्रंथ ह्यांच्या विरुद्ध जें कांहीं म्हणण्यासारखें असेल तें लवकरच आपल्या कानीं येईल, या आशेनें लोक मेकालेचा मनोरम ग्रंथ ज्यास्तच शांत चित्तानें वाचीत होते. पण ह्या ठिकाणीं देखील मेकालेचें सुदैव त्याला साहाय्यकारी झालें. त्याला जर आपला प्रतिपक्षी, व त्यानें हल्ला करावयाचीं शस्त्रें, हीं निवडण्याची परवानगी कोणी दिली असती, तरी देखील ह्यापेक्षां चांगल्या रीतीनें तो त्या हल्ल्यांतून निभावून आला नसता. आपली दुरुकणी तयार करण्याच्या कामीं चार महिने अगदीं फुकट घालविल्यानंतर, क्रोकरनें ती असल्या कद्रु, मूर्खपणाच्या, व विशेषतः कंटाळवाण्या निबंधाच्यारूपानें फोडिली कीं, ती फारच थोड्यांनीं पुर्ती ऐकिली असेल; व तिच्या योगानें खात्री तर कोणाचीच झाली नाहीं. त्याच्या ह्या क्वार्टर्ली रिव्ह्यूंत प्रसिद्ध झालेल्या निबंधाचा परिणाम एवढाच झाला कीं, क्रोकरच्या बासवेल कृत जानसन चरित्राच्या आवृत्तीवरचा जो मेकालेचा टीकात्मक लेख होता तो वाचण्याची स्फूर्ति मात्र लोकांस पुनः झाली. ती अशासाठीं कीं, १८ वर्षांनंतर अश जरठ लेखकास, राजकारणी पुरुषास, व व्यवहारांत, वागणाऱ्या माणसास, सामान्य अक्कल, सामान्य प्रामाणिकपणा, आणि सामान्य सभ्यपणा, यांचा इतका विसर पाडण्यासारखें मेकालेच्या लेखांत झोंबण्यासारखें होतें तरी काय तें पाहवें.

टैम्स व स्काट्समन आदिकरून सगळीं व्हिगपक्षीय वर्तमानपत्रें इतिहासकर्त्याच्या रक्षणार्थ धांवतीं झालीं; आणि टोरी पत्रें देखील क्रोकरचें हें करणें आह्मांस संमत नाहीं ह्मणण्यास निदान तितक्याच औत्सुक्यानें पुढें सरसावलीं. मेकालेनें तर स्वतः असल्या लिहिण्यांची फारशी पर्वा कधींच केली नाहीं. त्याची विचारशक्ति जेव्हां एकदां पक्क झाली तेव्हांपासून, "मनुष्याची स्वताच्या लिहिण्या व्यतिरिक्त लिहिण्यांनीं कमी किंमत कधींच होत नाहीं;" हें जें बेंटलेचें वचन त्याप्रमाणें सदासर्वकाळ व कितीही मोह पडला तरी तो वागावयास लागला होता.

मेकालेची जास्त चांगली माहिती होती असा एक सूक्ष्मदृष्टि गृहस्थ ह्मणतोः—"स्वभाव विलक्षण तऱ्हेचा जोरदार, इच्छा फार प्रबल, आणि क्रियाशक्ति बहुत, हीं सर्व असून तीं व्यावहारिक कामाकडे खर्च न करितां केवळ वाग्देवीला समर्पण करणारा असा काय तो बहुतेक मेकालेच एकटा विलक्षण माणूस दिसतो;" आणि असें दिसतें खरेंच कीं, इतिहासकार या नात्यानें मेकालेचे जे कांहीं गुण व्यक्त झाले त्यांच्या जोरावर तो बहुतेक पाहिजे त्या उद्योगक्षेत्रांत यशस्वी झाला असता. साध्यासाठीं साधनांचा त्याग करणें; एक विस्तृत आणि फार कष्टाचें कांहीं कृत्य मनांत रेखाटून शंका मनांत न आणतां व कधीं न थांबतां त्याच्या मागें एकसारखें लागणें, मनाचें उलट दिशेनें आकर्षण करणाऱ्या सर्व गोष्टी दूर ठेवणें, मग त्या मनास कामावरून उडवणाऱ्या सुखरूपी असोत किंवा, किंवा तितक्याच योग्यतेच्या अन्यकर्तव्यरूपी असोत;— अशा प्रकारचे गुण, उच्च प्रकारचें, व येथून तेथून सारखें सुंदर, असें एकादें कलेचें कृत्य साधावयाचें असेल, तर अवश्यमेव लागत असतात, कारण जार्ज इलियट आपल्या सुंदर भाषेंत

ह्मणते त्याप्रमाणें, असें कृत्य आपलेसें करून घेण्यास उद्योग व विचार आणि लहान सुखांचा निश्चयपूर्वक त्याग, हींच साधनें होत. ज्या वेळीं मेकाले हजर असणार आहे, एवढ्या केवळ अफवेवर लंदनांतील पाहिजे त्या गृहस्थाचा दिवाणखाना सभ्य स्त्रीपुरुषांनीं गच्च भरून गेला असता, अशा वेळीं मेकाले असल्या मेळ्यांतून प्रथम प्रथम कमी जावयास लागला, आणि मागून मुळींच जाईनासा झाला; तो केवळ एवढ्यासाठीं कीं, आपण हातीं घेतलेल्या कामाकडे आपली सर्व शक्ति आपणास लावितां यावी. जी कामन्स सभा त्याच्या भाषणांच्या पहिल्याच वाक्या-बरोबर गुपचुप होत असे, आणि पहिल्या पांच मिनिटांत भरून वहावयास लागत असे, त्या कामन्स सभेचा देखील त्यानें त्याग केला. जीं माणसें तो हजर असतां त्याच्याविरुद्ध आपला हक दाखविण्यास कधींच धजलीं नसतीं, तीं माणसें एकामागून एक राष्ट्रकारभाराच्या शिखरावर जाऊन पोहचलेलीं तो सारखा पाहत होता; पण त्याला तें पाहून कधीं किंचित् देखील वाईटहि वाटलें नाहीं, किंवा मत्सराचा स्पर्शहि झाला नाहीं. सर जेम्स ग्रेहाम ह्मणाला, "मेकालेला इतकें यश आलें आहे, याबद्दल मला मनःपूर्वक आनंद वाटतो. वाग्देवीला त्यानें जे बळी दिले आहेत त्यांबद्दल त्याला लहान सहान विजय मिळून चालणारच नाहीं; आणि आजचे मुत्सद्दी जेव्हां विसरले जातील तेव्हां देखील महा-क्रांतीच्या इतिहासकाराचें स्मरण कायमच राहील." वाग्देवीच्या भक्तांपैकीं असे कांहीं होते कीं ज्यांस मेकालेच्या ग्रंथाची ही जी एवढी कीर्ति झाली, ती त्याच्या योग्यतेपेक्षां जास्त झाली असें वाटलें; पण पार्लमेंतांतील त्याचे पूर्वीचे प्रतिस्पर्धी व जोडीदार, या सर्वांना, ज्या ह्या महाकृत्यासाठीं, लोकांस जितकें कधीं मिळव-

ष्याची देखील आशा असणार नाहीं, त्यापेक्षां जास्त त्यानें गमाविलें होतें, त्या त्याच्या कृत्यांत त्यास पूर्ण सिद्ध आलेली पाहून, आनंदच वाटला.

१८४८ नवंबर १८ रोजीं मेकाले आपल्या दिनचर्यालेखांत ह्मणतो: " आज नवांपेक्षां ज्यास्त वर्षांनीं मी आपली दिनचर्या लिहिण्यास पुन: सुरवात करीत आहें. तेवढ्या मुदतींत केवढा फरक होऊन गेला आहे. तेव्हांपासून मी दोन पार्लमेंतांचा व दोन क्याबिनेटांचा सभासद होऊन गेलों आहें. कित्येक ग्रंथ छापून त्यांत यश मिळविलें आहे. आतां हल्लीं मी पार्लमेंताच्या दगदगींतून मोकळा झालों आहें, व आपल्या तब्यतीस उत्तम रुचेल अशा रीतीनें कालक्रमण करीत आहें. लंदनमध्यें राहून कालेजासारखा आयु:क्रम मला करतां येत आहे; शिवाय, गृहसुखांचीं साधनें जवळ आहेतच; कारण हाना आणि तिचीं मुलें जवळच राहत असून मला तीं फारच प्रिय वाटतात. पैसाहि मला बराच मिळाला आहे. माझ्या इतिहासाचे पहिले दोन खंड पुरे झाले आहेत. कालच शेवटचें प्रूफशीट अमेरिकेस गेलें, आणि पंधरा दिवसांच्या आंतच तो ग्रंथ लंदनमध्यें प्रसिद्ध होईल अशी मला आशा आहे. मला तो बराच आवडतो. अगदीं उत्तम ग्रंथाच्या कसास लावला तर तो चांगला नाहीं. परंतु असल्याच इतर पुस्तकाशीं तुलना करून पाहतां मला तो बरा वाटतो. जगाचें मत काय आहे तें लवकरच समजेल. गेले तीन महिने इतिहास पुरा करण्यांत व प्रूफशीट तपासण्यांत अत्यन्त श्रम झाल्यामुळें आज मला मोकळा झाल्यासारखें वाटतें..... "

ह्या वेळीं मेकाले जरी पार्लमेंताचा सभासद नव्हता, तरी त्याला तेथें काय चाललें आहे ह्याबद्दल कमी कळकळ वाटत होती असें

नाहीं. ह्यावेळीं व्हिगपक्षाचें प्रधानमंडळ अधिकारारूढ झालेलें होतेंच, आणि लार्ड पामर्स्टन यास शेवटीं फारेन सेक्रेटरी करणें मुख्य प्रधानास भाग पडलेंच होतें. सर्व मुत्सद्यांमध्यें पामर्स्टन हा मेकालेस अत्यन्त आवडे; आणि सालीं १८४८-४९ जेव्हां आणीबाणीचे प्रसंग येऊन गेले, त्या मुदतींत तर तो त्यास फारच आवडूं लागला होता. ह्याचें कारण पामर्स्टनची वर्तणूक अशी होती कीं जेथें जेथें स्वातंत्र्याला व लोकहिताला धोका येण्याचा प्रसंग येईल, तेथें तेथें आपली लेखणी, व प्रसंग पडल्यास इंग्लदाची तरवार, ह्या दोहोंचें साहाय्य दुर्बल पक्षास करावयास तो मागें पुढें पाहणारा नव्हता. ही त्याची नीति मेकालेस फार आवडे; पण त्याच्या प्रतिपक्ष्यांपैकीं कित्येकांस हा फ्रान्सांतील वगैरे लोकसत्ताकांशीं सभ्यपणानें वागतो हें बिलकूल पसंत नसे; ह्मणून राणीला मानपत्र देण्याची सूचना जेव्हां १८४९ च्या सेशनाच्या प्रारंभीं पार्लमेंतापुढें आली, तेव्हां त्यांनीं दोन्हीं सभांत अशी उपसूचना पुढें आणिली कीं, राणीसाहेबांच्या राज्यकारभाराची स्थिति अभिनंदन करण्यासारखी नाहीं. लार्डांच्या सभेंत लार्ड स्टानले यानें बहकून जाऊन असें कांहीं मनसोक्त वक्तृत्व केलें कीं, त्यानें भुलून जाऊन लार्डांनीं प्रधानमंडळाचा अगदीं पराभव करावयाचा बेत आणिला; तेथें दोनच व्होटें प्रधानांस काय तीं ह्या उपसूचनेविरुद्ध मिळालीं. आणि परराष्ट्रांत तर प्रसंग ह्या वेळीं असा होता कीं, एव्हां प्रधानांची अदलाबदल झाली असती तर एक मोठें अरिष्टच कोसळलें असतें. पण कामन्स सभेंत लार्ड पामर्स्टन ह्यांनें ह्या उपसूचनेविरुद्ध असें कांहीं पाणीदार भाषण केलें कीं तेणेंकरून ह्या वादविवादाचा निकाल काय होणार तें ठरल्यासारखेंच झालें; हा वादविवाद पुढच्या दिवसापर्यंत तहकूब ठेवावा ह्मणून जी विरुद्धपक्षा-

कडून सूचना आली तिचाच पराजय ८० स २२९ ह्या बहुमतानें झाला. तेव्हां ती पुढें आणणारा जो टोरीपक्षाचा अग्रणी मि. डिझ्रायली ( हाच पुढें लार्ड बीकन्सफील्ड ह्मणून प्रसिद्धीस आला, व ह्याच्याच मुख्य प्रधानकीच्या वेळीं १८७७ त राणीसाहेबांनीं हिंदुस्थानची बादशाहीण हा किताब धारण केला. ) त्यानें ती मुकाट्यानें परत घेतली.

१८४८ च्या नवंबरांत मेकालेस स्काटलंदांतील ग्लासगो एथील युनिव्हर्सिटीचा डायरेक्टर ( मुख्य अधिकारी ) निवडलें होतें; त्या जाग्यावर त्यास स्थापन करण्याचा विधि २१ मार्च १८४९ रोजीं व्हावयाचा होता. हा प्रसंग निवडलेला माणूस जर वक्ता ह्मणून नांवाजलेला असेल तर त्यास मोठा भयंकरच असतो. कारण त्यानें पुष्कळ बोलावें अशी श्रोत्यांची आशा असते, व विषय तर शिळा असल्यामुळें त्याच्यावर बोलण्यासारखें असेल तें आधीचे रेक्टर किती तरी बोलून गेलेलेच असतात. पण याच्या सुदैवानें ह्या सालीं त्या युनिव्हर्सिटीची मूळ स्थापना होऊन बरोबर चार शतकें पुरीं होत होतीं. त्यामुळें प्रत्येक शतकाच्या प्रारंभीं तिची स्थिति कशी होती याचें थोडक्यांत निदर्शन करून त्यानें आपल्या त्या समारंभाच्या वेळच्या भाषणास रंग व नावीन्य आणण्याची युक्ति केली. ती फार उत्तम साधली, व याच्या भाषणास सारखा टाळ्यांचा गजर चालला होता. दुसऱ्या दिवशीं त्याला त्या शहरची फ्रीडम ( शहरच्या स्वतंत्र मनुष्याच्या सामान्य व विशेष हक्कांचें दान; ज्यानें सार्वजनिक कामगिऱ्या विशेष बजाविल्या आहेत अशा इतर शहरच्या माणसांस सन्मानार्थ ह्मणून हें हक्कदान करण्याची चाल पूर्वी फार असे, हल्लीं तितकी नाहीं. ) देण्याचा समारंभ तेथील टौनहालांत तेथील प्रोव्हस्टच्या हस्तें झाला; तेथेंहि त्याचें भाषण

असेंच नामी वठलें व शेवटीं तर डाळ्यांची कमालच झाली. तेथून तो लार्ड जेफ्री यास भेटावयास एडिंबरो येथें गेला. जेफ्री आतां मरावयास टेंकला होता. त्यानें याची अत्यंत स्तुति केली. दोघांचे हि डोळे अश्रूंनीं भरून आले. पुढें थोडक्याच दिवसांनीं जेफ्री निवर्तला.

या वर्षी केंब्रिज येथील अर्वाचीन इतिहासाच्या प्रोफेसराची जागा रिकामी झाली; ती तेव्हां मेकालेनें पत्करावी, असें राणीचा नवरा प्रिन्स आल्बर्ट याच्या मनांत फार होतें. ह्मणून त्यानें आपल्या वाड्यावर याला मुद्दाम बोलावून नेलें, व ती पत्करण्याविषयीं त्यास आग्रह केला. पण ज्यानें २५०० पौंड दरसाल आणि क्याबिनेटांत जागा एवढीं स्वातंत्र्यार्थ हातांतून दवडिलीं होतीं, तो दरसाल ४०० पौंड पगाराची प्रोफेसरी पत्करण्यास तयार कसला होतो ? त्यानें मर्यादेनें पण स्पष्टपणें नाहीं ह्मणून सांगितलें, तेव्हां स्टीफन व क्यांबेल ह्मणून जे दुसरे उमेदवार त्या जाग्याला होते, त्यांबद्दल ह्याचें मत प्रिन्स आल्बर्टनें ह्यास विचारिलें.

ह्या वर्षाच्या–आगस्ट महिन्याचा दुसरा पंध्रवडा मेकालेनें ऐर्लंदांत घालविला; आणि आपल्या नेहमींच्या शिस्तीस अनुसरून पूर्वीचे कांहीं दिवस त्या देशाच्या वाङ्मयाचें अध्ययन करण्यांत त्यानें घालविले. त्यानें स्विफ्टचा पत्रव्यवहार चाळून पाहिला, आणि निदान अर्धें कपाट तरी ऐरिश कादंबऱ्या पालथ्या घातल्या; आणि शेरिडन या वक्त्याचें मूर कवीनें लिहिलेलें चरित्र पुनः वाचिलें. आगबोटींत बसला तों वारा फार होता व आगबोट एकसारखी डुलत होती; त्यामुळें वाचण्याची सोयच नव्हती; ह्मणून मिल्टनचें पाराडाइज लॉस्ट हेंच कवन ह्मणावयास त्यानें प्रारंभ केला. त्यांतील अर्धें त्यास अद्यापि येत होतें. पुढें ऐर्लंदांत पोहोंचल्यावर

त्यानें तेथील बघण्यासारखीं स्थळें १५ दिवस पाहिलीं. तेथून निघून फ्रान्सास गेला, आणि तेथें एक पंध्रवडा त्यानें अशाच रीतीनें घालविला; तेथून परत आल्यावर इतिहासलेखनाचें पुढचें काम त्यानें सारखें सुरू ठेविलें. तेथून पुढें कांहीं आठवडेपर्यंत "माझें ठरींव काम", "ठरींव काम केलें", "ठरींव काम करून आणखी कांहीं वर केलें", अशीं वचनें त्याच्या रोजच्या दिनचर्येच्या प्रारंभीं किंवा शेवटीं आढळून येतात.

१८५० मार्च महिन्यांत राणीनें आपल्या वाड्यांत यास जेवणाचें निमंत्रण केलें होतें. त्या प्रसंगीं तिनें याचा चांगला सत्कार केला. इतिहासाविषयीं तिचें याचें पुष्कळ बोलणें झालें; त्यांत ती यास असें ह्मणाली कीं, "माझा गरीब पूर्वज जो दुसरा जेम्स त्याच्या विरुद्ध तूं जें लिहिलें आहेस, त्याबद्दल मला कांहीं ह्मणावयाचें नाहीं." तेव्हां हा तिला खुश करण्यासाठीं ह्मणून ह्मणाला, "तुमचा पूर्वज नव्हे तो, तुमचा पूर्वग" हें बोलणें तीस फार रुचलेंसें दिसतें.

मेकाले प्रथम राजवाड्यांत जेवावयास गेला तो १८३९ सालीं; त्या वेळच्या त्याच्या स्वागताचें वर्णन त्यानें आपल्या बहिणीस पाठविलेल्या एका पत्रांत केलें आहे. "तेथें आह्मीं सर्व अगदीं हलके बोललों; आणि जेवण जेव्हां आटोपलें तेव्हां बहुतेक सर्वजण पत्ते किंवा बुद्धिबळें खेळावयास गेलों. माझी राणीसाहेबाशीं मुलाखत करून दिली; मी गुडघे टेंकले; राणीसाहेबांच्या हाताचें चुंबन घेतलें; राणीसाहेब सरासरी दोन मिनिटें माझ्याशीं मोठ्या मेहरबानीनें बोलल्या, आणि मी त्यांना असें सांगितलें कीं, जरी हिंदुस्थानची हवा उष्ण आहे, तरी माझी प्रकृति तेथें चांगलीच राहिली होती.

१८५० सालचा सप्टेंबर महिना मकालेनें इंग्लिश चानल

मधील आइल ऑव् वाइट नामक बेटाच्या दक्षिण किनाऱ्यावरील एकबाग बगीच्याच्या व एकांतवासाच्या अशा गृहांत घालविला तेथें त्यानें एलिस यास आग्रह पूर्वक बलावून नेलें, व दोघानीं मिळून ग्रीक व ल्याटिन भाषेंतील ग्रंथ वाचण्यांत, व त्यांजवर वादविवाद करण्यांत, तो महिना मोठ्या सुखानें घालविला.

१८५१ च्या मे महिन्यांत लंदन मधील पहिलें जंगी प्रदर्शन भरलें. तें भरण्यास सर्व कारण प्रिन्स आल्बर्ट हा होता. मेकालस तो एकंदर देखावा फार पसंत पडला. निरनिराळ्या देशांतील अनेक लोक तें पहावयास आले आहेत हें पाहून त्यास फार समाधान वाटलें. मेकाले यास आपल्या लहान भाच्यांस बरोबर घेऊन असलीं ठिकाणें पहाण्याचा नाद पहिल्यापासूनच फार असे. त्यांत हा असला अपूर्व देखावा ! मग काय विचारतां ! त्याला त्या गर्दीतून धक्के बुक्के देत व घेत जाण्याचीच फार मजा वाटली.

ह्याच सालीं फ्रान्सांत नेपोलियन बोनापार्टाचा पुतण्या लुई नेपो-लियन यानें लोकसत्तात्मक राजसत्ता मोठ्या शिताफीनें बुडवून आपणास तिसरा नेपोलियन या नांवानें बादशाह करवून घेतलें होतें. ही क्रांति पुर्ती होण्याच्या अगोदरच इंग्लंदचा फारेन सेक्रेटरी लार्ड पामर्स्टन ह्यानें ही गोष्ट आपणास पसंत आहे ह्मणून फ्रान्साच्या वकिलाला बोलून दाखविलें होतें. हें फाजीलपणाचें वर्तन राणीस न आवडून तिनें त्यास कामावरून हाकलून लाविलें. लार्ड जान रसेल ह्याच्या प्रधानमंडळांत हा जो मोठा खड्डा पडला, तो भरून काढ-ण्याकरितां मेकालेस क्याबिनेटचा प्रधान होण्याबद्दल पुनः बराच आग्रह झाला. खुद्द लार्ड जान यानें त्यास आपल्या वाड्यावर बलावून नेऊन प्रधानमंडळांत जागा पत्करण्याविषयीं स्वतः आग्रह केला. यानें अनेक प्रतिकूल कारणें दाखविलीं, व देऊं केलेली जागा नाकारिली. ह्या सर्व कारणांत विशेष कारण, पामर्स्टन जो आपला मित्र त्याच्या विरुद्ध आपणास पार्लमेंतांत बोलावें लागेल, हें होतें.

# प्रकरण ९ वें.

## इतिहासाचे आणखी दोन खंड.

जें १८५२ साल सुरू झालें तें मेकालेला फार सुखावह अशा रीतीनें सुरू झालें. जानेवारी ते जुलईपर्यंतच्या त्याच्या दिनचर्यालेखांवरून पाहतां त्याचे ते दिवस सारखें लिहिण्याचें काम करण्यांत आणि स्नेह्यांच्या व आप्तांच्या घरीं जेवणांत व न्याहाऱ्यांत गेलें असें दिसतें. पण अशा रीतीनें ह्या सालचे हे पहिले सहा महिने जरी त्यास शांत व सम अशा चित्तस्थितींत घालवितां आले होते, तरी दुसऱ्या सहामाहींत त्यास बरें आणि वाईट ह्या दोहोंचाही वांटा मिळावयाचा होता. त्या सालच्या पार्लमेंताच्या सेशनांत बऱ्याच मोठमोठ्या गोष्टी घडून आल्या होत्या. मेकाले लिहितो:—"मला रस्त्यांत ग्रेव्हिल भेटला. तो ह्मणतो कीं, लार्ड पामर्स्टनच्या मनांत लार्ड जानच्या विरुद्ध सूड केव्हां घेईन असें झालें आहे; तो लवकरच लार्ड डार्बीच्या हाताखालीं हौस आफ् कामन्सचा लीडर (अग्रणी) होऊन येईल अशी मला शंका वाटते." मेकालेला शंका आली ती बरोबरच आली. पण लार्ड पामर्स्टनची स्वारी कोणी आपला अपमान केला असतां स्वस्थ बसणारी नव्हती. त्याचें उसनें सभ्यरीतीनें कसें फेडावें हें त्यास चांगलेंच माहीत होतें. त्याच्या साह्यानें कानसर्व्हेटिव्ह पक्षानें मिलिशिया—(इंगामी सैन्य) बि-

ल्याच्या एका लहानशा कलमावर रसेल प्रधानमंडळाचा पराजय केला, आणि लार्ड डार्बी हा बहुमत आपल्या विरुद्ध असतांच अधिकारारूढ होऊन त्यानें तेवढें तें सेशन कसें तरी पार पाडलें. उन्हाळा लागतो न लागतो इतक्यांत त्यानें पार्लमेंत बरखास्त केलें, आणि सामान्य निवडणूक जुलई महिन्यांत झाली. त्या वेळीं आम्हीं अमुक एक करूं किंवा करणार नाहीं, असें कोणत्याच पक्षानें विशेष किंवा स्पष्ट अभिवचन लोकांस दिलेलें नव्हतें. उदाहरणार्थ, धान्याचे कायदे पुनः जिवंत करणार किंवा नाहीं ह्याबद्दल लार्ड डार्बीनें दुटप्पी व संदिग्ध अशींच भाषणें केलीं होतीं. इंग्लंदचा स्थापित चर्च आहे तसा कायम राखण्याचा आपला पूर्ण बेत आहे असें त्यानें स्पष्ट सांगितलें होतें. पण लोकांना टोरी प्रधानांच्या साहाय्याशिवाय इंग्लंदचा चर्च कायम राहील हें माहीत होतें. त्यांना त्या प्रधानमंडळाकडून अभिवचन पाहिजे होतें तें असें कीं, धान्याच्या अनिर्बंध व्यापारांत पुनः आपण ढवळाढवळ करणार नाहीं. असलें वचन न मिळाल्यामुळें राष्ट्रानें त्याच्या पहिल्या वचनास फारसा मान दिला नाहीं.

जेथें अगदीं निराशा असली तरी आपल्या पक्षाचे उमेदवार विजयी होण्यास खूप खटपट करावयाची असा कान्सर्व्हेटिव्ह लोकांनीं निश्चय केला होता, त्यापैकीं एडिंबरो हें एक होतें. तेथच्या लिबरल पक्षाच्या लोकांमध्यें आपापसांत तंटा पडला होता; आणि १८४७ सालीं ज्या गोष्टी घडून आल्या होत्या त्या लक्षांत ठेवून, हा तंटा मिटविण्यास समर्थ असे उमेदवार आपण होऊन पुढें येईनात. स्काटलंदच्या राजधानीस योग्य प्रतिनिधि मिळावा अशा योग्य महत्वाकांक्षेनें प्रेरित होऊन, आणि एवढ्या मोठ्या माणसास आपण एकवेळ विनाकारण दुखविलें त्याबद्दल त्यास योग्य मोबदला

दिला पाहिजे अशी खरी इच्छा मनांत धरून, तेथील निवडणारांनीं मेकालेकडे धांव घेतली. त्याची निवडणूक खात्रीनें व्हावी एतदर्थ अवश्य त्या गोष्टी करण्याकरितां एका जंगी सभेपुढें जो ठराव त्यांनीं आणिला तो सर्वानुमतें टाळ्याच्या गजरांत पसार झाला. त्या ठरावाच्या पुष्टीकरणार्थ जीं भाषणें झालीं तीं त्या वक्त्यांस मोठीं भूषणावह अशींच होतीं. मि. आडाम ब्लाक ह्मणाला: " स्वच्छंद अधिकाऱ्यांच्या अतिक्रमणाविरुद्ध आणि लोकसत्ताकाच्या फाजील-पणाविरुद्ध लोकांच्या हक्काचें रक्षण आपण करूं ह्याबद्दल मेका-लेनें जेवढीं बळकट अभिवचनें दिलीं आहेत, त्यापेक्षां ज्यास्त बळकट अभिवचनें कोणी दिलेलीं नाहींत. त्यानें हीं जीं वचनें दिलीं आहेत, तीं निवडणुकींच्या धामधुमींत व निवडणुकीच्या मंड-पांतच दिलेलीं नाहींत; तर खोलींत बसून स्वस्थ विचार करून सर्व जगापुढें मांडिलेलीं आहेत; आणि त्याचा जय होवो, वा पराजय होवो, त्या वचनांची कांस तो कधीं सोडणार नाहीं. मेकालेच्या अंगीं जर कांहीं कांहीं दोष असेल तर तो फारच स्पष्टवक्ता आहे हा होय; तो फारच उघड्या मनाचा आहे; विरोधाचीं शिंगें मोड-ण्यासाठीं तो संदिग्ध भाषणें करीत नाहीं. लहानपणापासून आपलें सर्व वक्तृत्व खर्च करून नागरिकांच्या स्वातंत्र्याची त्यानें जी एक सारखी वकिली केली आहे. तिचा पुष्कळांना विसर पडलेला आहे; आणि कांहीं घाईनें बोललेल्या शब्दांचें तेवढें स्मरण राहिलेलें आहे. थोडक्याशा मानापानाच्या समजुतीसाठीं तुमचा अत्यंत जोर-दार वकील गमावण्यास तुह्मी तयार आहां काय ? ब्रिटिश सेने-टांतून त्यांतील अत्यंत शोभादायक मणि काढून घ्यावा अशी तुमची इच्छा आहे काय ? सध्याच्या काळच्या एका अत्यंत प्रसिद्ध अशा पुरुषाचें एडिंबरोशीं साहचर्य असण्यांत जें मोठें भूषण आहे,

तें त्या शहरापासून तुह्मी हिरावून घेणार काय ? ज्या कंठाच्या स्वरांनीं सगळ्या यूरोपांतील नियमित स्वातंत्र्यभक्तांचें खचणारें धैर्य पुनः ताजें होण्यासारखें आहे, त्या कंठास तुह्मी मौन धरावयास लावणार काय ? छे; नाहीं; खचीत नाहीं. मला माहीत आहे कीं एडिंबरोचे रहिवाशी इतके बेडेपीर नाहींत. त्यांच्या स्वताच्या पक्षाचें, आणि सगळ्या जगांतील स्वातंत्र्य व सत्य यांच्या पक्षाचें, मंडण करणारा अत्यंत जोरदार वकील आपलासा करून घेणें त्याच्या हातांतलें आहे; आणि ते त्याला आपलासा करून घेतीलच."

एडिंबरो एथील व्हिगपक्षाच्या धुरीणानें जो ठराव अशा शब्दानीं सभेपुढें आणिला, त्यास रॅडिकल पक्षाच्या एका गृहस्थानें अनुमोदन दिलें; तो फारच छानदार माणूस होता; त्यानें आपले विचार फारच थोडक्या शब्दांनीं बोलून दाखविले. स्काटलंदांत व उत्तर इंग्लंदांत ज्या ज्या स्थानिक पुढाऱ्यांचे राजकीय कामांत त्यांच्या नगरबंधूंवर कांहीं खरेंखुरें वजन आहे त्यांचीं भाषणें बहुधा अशीं नेहमी आंखूड असतात. तो ह्मणाला, " ज्या त्रासदायक प्रश्नामुळें गत निवडणुकीच्या वेळीं दुसऱ्या शेंकडों मतदारांप्रमाणें मलाहि मेकालेला आपलें मत न देणें मोठ्या नाखुशीनें अवश्य वाटलें, त्या प्रश्नाचा निकाल कधींच लागून गेला असल्यामुळें, त्या नामांकित इतिहासकाराच्या व मुत्सद्याच्या नांवाची जी सूचना तुमच्यापुढें आली आहे, तिला अनुमोदन देऊन माझ्या पहिल्या प्रियमित्राकडे परत जाण्याची जी ही संधि मला आली आहे, तिजबद्दल मी आपला अत्यानंद प्रदर्शित करितों. "

मेकालेच्या मनांत निवडणुकीच्या संबंधानें काय विचार घोळत होते हें त्याच्या पत्राच्या पुढील उताऱ्यावरून व्यक्त होतें. आपल्याला तेथें खेप घालण्यास लाविल्याशिवाय, किंवा आपल्यापासून

कांहीं वचन घेतल्याशिवाय, किंवा राजकीय बाबतींत आपलें कांहीं मत विचारल्याशिवाय, त्यांनीं निवडिलें तर आपण पार्लमेंतांत बसावयास तयार आहों एवढ्याच अटीवर एडिंबरोचे लोक आपणास निवडण्यास तयार कसे झाले आहेत हें बहिणीस कळवून तो ह्मणतोः " माझें स्वतांचें ह्मणशील, तर, यांत फार नुकसानच आहे; कारण मी जरी हेलकऱ्यासारखें काम करण्यास कधीं तयार होणार नाहीं, किंवा प्रधानमंडळांत जागाहि पत्करणार नाहीं, तरी माझ्या इतिहासाचे पुढील दोन खंड प्रसिद्ध होण्याचें काम एक वर्ष किंवा दोन वर्षेंहि लांबणीवर पडण्याचा संभव आहे. पण मोठमोठ्या निवडणुकीच्या शहरांतील मतदारांनीं त्यांच्या प्रतिनिधींची सदसद्विवेक बुद्धि व स्वाभिमान यांचा योग्य सन्मान ठेवण्यास शिकावें, पाणीदार व हुशार अशा माणसांपासून गुलामांसारख्या आज्ञाधारकपणाची अपेक्षा करूं नये, आणि अशा माणसांना प्रश्न विचारून विचारून व त्यांना दोष लावून त्यांची परीक्षा करण्याच्या ऐवजीं त्यांच्यावर उदार विश्वास ठेवावयास लागावें, ही गोष्ट मला अत्यंत महत्वाची वाटते. अशा लोकांनीं आलीकडे अशाप्रकारचें वर्तन चालविलें आहे कीं, तेणेंकरून पुष्कळ उत्तम माणसांनीं सार्वजनिक कामांतून आपलें अंग काढून घेतलें आहे, आणि याला कांहीं उपाय न योजिल्यास आणखीहि कांहीं माणसें त्यांचेंच अनुकरण खास करितील असा संभव आहे. एडिंबरोच्या लोकांनीं मजशीं जें वर्तन केलें तसलेंच वर्तन दुसऱ्या पुष्कळ शहरांतील लोकांनीं आपल्या प्रतिनिधींशीं केलें आहे; पण अत्यंत समजुतदार लोक देखील केवळ लहरीबरहुकूम व अगदीं विक्षिप्त रीतीनें कसे वागतात ह्याचें ढळढळीत उदाहरण ह्मणून एडिंबरो येथील गोष्टीचा गवगवा फार झाला, व पार्लमेंताच्या आंत आणि बाहेर तिचा उल्लेख

फार वेळां झाला ह्मणून तेथील लोकांनीं अगदीं आपणच होऊन ध्यानांत राहील अशा रीतीनें, किंवा कदाचित् पूर्वी कोणी पाहिली नाहीं, ऐकिली नाहीं, अशा रीतीनें, आपल्या चुकीची दुरुस्ती करावी ही गोष्ट अल्प महत्वाची नाहीं, किंवा अनिष्टहि नाहीं. ”

अशी जरी स्थिति होती, तरी स्काटिश रेफर्मेशन सोसायटी ह्मणून एक सभा होती, तिच्या कमिटीनें मतदार या नात्यानें मकालेस मोठ्या अदबीनें असें विचारिलेंच कीं, तुह्मी जर निवडून आलां, तर मेनूथला जी देणगी देतात, तिच्या विरुद्ध आपलें मत द्याल किंवा नाहीं ?' त्यानें त्या कमिटीच्या सक्रेटरीस असें उत्तर लिहिलें:

मला तुह्मी जे प्रश्न विचारिले आहेत त्यांचीं उत्तरें देण्याची तुह्मी मला माफी करा, अशी मी विनंति करितों. ज्या गृहस्थाच्या वतीनें तुह्मी लिहिलें आहे, त्यांना मी मोठा मान देतों; पण त्यांच्याजवळ मला कांहीं एक मागावयाचें नाहीं; मी त्यांचीं मतें मागत नाहीं; मला पार्लमेंतांत पुन: बसण्याची इच्छा नाहीं, आणि जी गोष्ट मला कालपर्यंत शक्यच वाटली नव्हती, व अजूनहि फारशी संभवनीय वाटत नाहीं, ती न झाल्यास मी पुनः पार्लमेंतांत बसणारहि नाहीं. जर एडिंबरो सारख्या शहरांतील मतदारांनीं मजपासून कांहीं एक स्पष्टीकरण किंवा अभिवचन न मागतां माझ्या हातांत आपलें हिताहित विश्वासिलें, तर अशा सन्मानीय व विलक्षण रीतीनें त्यांनीं मला देऊं केलेलें जें विश्वासाचें सार्वजनिक काम तें नाकारणें मला बरें दिसणार नाहीं. एवढा थोर मतदार कर्पू असल्या अटींवर मला आपला प्रतिनिधि करण्यास तयार होईल अशी आशा करण्यास मला मुळींच हक्क नाहीं हें मी जाणून आहें; पण गेलीं चार वर्षें ज्या शांततेच्या व सुखाच्या एकांतवासांत म्या घालविलीं आहेत तो एकांतवास सोडण्यास दुसऱ्या

कोणत्याहि अटीवर मी तयार होणार नाहीं असें ह्मणण्याचा मला हक्क आहे. "

अशा बारीक परंतु बाणेदार रीतीनें मेकालेनें जी आपली एकंदर स्थिति सांगितली ती त्याच्या मतदारांस सर्वांशींच पसंत पडली नाहीं. त्यांनीं त्याच्या शब्दांचा असा अर्थ केला कीं एडिंबरो एथून निवडून येणें याची त्याला किंमत वाटत नाहीं. व ब्ल्याक साहेब भ्याला कीं मेकाले निवडून घेतो कीं काय नकळे. पण त्यास इतकी भीति होती तरी एडिंबरो एथील मतदारांस मेकालेचें उच्च व कडकडीत व्रत नापसंतच पडलें असें दिसत नाहीं. त्यांनीं असा विचार केला, व बरोबर केला कीं, प्रतिनिधीच्या ठिकाणीं स्वाभिमानबुद्धि असेल तर तिचें प्रतिबिंब त्यास निवडणाऱ्या मतदारांवर पडतेंच पडतें. आणि निवडणुकीच्या वेळीं ज्या अनेक खटपटी उमेदवार लोक करीत असतात, त्यांपैकीं एकहि न करणाऱ्या ह्या अद्वितीय उमेदवारास मतें देतांना त्यांना कदाचित् अभिमानच वाटला असें दिसतें. त्याच्याबद्दल जो उत्साह लोकांमध्यें उत्पन्न झाला, तो त्याच्या पक्षालाच धरून राहिला नाहीं. लार्ड मेलव्हिल व सर वाल्टर स्काट याच्या मागें राहिलेला स्कॉच लोकांच्या जुन्या टोरी मतांचा जो अत्यन्त नामांकित अभिमानी प्रोफेसर विल्सन त्यानें आपली आनंदी व गडबडी कारकीर्द पुरी करण्यापूर्वीं जें शेवटचें सार्वजनिक कृत्य केलें, तें मेकालेला आपलें मत देण्यासाठीं मतदानस्थलीं तो गेला हें होय. ह्या निवडणुकीचा निकाल मेकाले सर्वांत पहिला आला हा झाला.

विलायतच्या ह्या टोंकापासून तों त्या टोंकापर्यंत ही बातमी ऐकून बहुतेक सर्व लोकांस फार समाधान वाटलें, असें ह्मटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं. प्रस्तुतच्या सामान्य निवडणुकीवर एका

प्रधानमंडळाचें अस्तित्व नास्तित्व अवलंबून होतें. तेव्हां अशा निवडणुकीच्या वेळीं बळकट मनोविकार, बळकट महत्वाकांक्षा व जबर मत्सर सहजच जागृत झालेले होते. तरी त्या सर्वांना ऊत आला असतां दोन्ही पक्षांच्या लढवय्यांनीं, मेकालेची ही निवडणूक ह्मणजे कोणत्याहि एका पक्षाचा जय नव्हे, तर उत्तम बुद्धिमत्ता आणि राजकीय कामांत उत्तम प्रामाणिकपणा ह्यांचाच विजय होय असें ह्मणण्यास कांकूं केलें नाहीं.

पण ज्या आठवड्यांत आपले देशबांधव आपणांस किती मानतात व चाहतात ह्याबद्दलचा मेकालेस इतका ठळक पुरावा दिसून आला, त्याच आठवड्यांत त्यास अशींहि दुःखकारक व खात्रीचीं चिन्हें दिसून आलीं कीं, ज्या महा श्रमांमुळें आपणास एवढी कीर्ति प्राप्त झाली आहे, त्या श्रमांबद्दल आपणास शिक्षा झाल्याशिवाय राहत नाहीं. तो लिहितोः—" माझ्या विजयाच्या ह्या भरांत मला माझी प्रकृति कांहीं बरी वाटत नाहीं. " आणि तो थोड्या कारणावरून कुरकुरणारा नव्हता. याच्या पूर्वीं कांहीं महिनेपर्यंत, अशा प्रकारचीं वाक्यें त्याच्या दिनचर्या लेखांत वरचेवर आढळतात. " हल्लीं मला बरें वाटत नाहीं; आणि माझ्यानें लिहवत नाहीं. कां तें मला कांहीं सांगतां येत नाहीं. मी एक दोन दिवस थांबेन आणि मग पुनः यत्न करून पाहीन. " आणि पुनः; " मी इतिहासाचा कांहीं भाग लिहिला; वाईट नाहीं; तथापि अद्यापि प्रवाह सुरू होत नाहीं. ह्या कामाचें ओझें पाहून माझी छाती अगदीं दडपून जाते. मनुष्याचें मन ही किती तरी विलक्षण चीज आहे ! माझें मन तरी निदान असें आहे. माझ्या मनाच्या उद्विग्नतेवर मला वाटतें मला मान्टेन ( १६ व्या शतकांतील एक फ्रेंच तत्त्वज्ञ व निबंधकार ) सारखा लांबलचक निबंध लिहितां येईल.

कधीं कधीं माझे महिनेच्या महिने फुकट जातात; कसे तें मात्र मला समजत नाहीं; रोज मी आपल्यास बोल लावून घेतों, आणि चोपून काम करण्याची शक्ति तर मला खरोखरीच नाहीं. कांहीं दिवस शिथिलपणाचें जणूं काय मजवर वारेंच येतें. नंतर मी जरा गरम होतों; व कांहीं दिवस सारखें बारा बारा तास काम करितों. एका वर्षापूर्वीं मी किती बेरें काम करीत असें! आणि हल्लींच तसें मला कां करतां येत नाहीं बेरें!"

कां तें त्याला लवकरच समजावयाचें होतें. जुलईच्या १५ व्या तारखेस, ह्मणजे निवडणुकीचा निकाल लागल्यावर दोन दिवसांनींच, तो आपणास अत्यन्त थकल्यासारखें व अस्वस्थ वाटतें ह्मणून लिहितो; चालण्याची मारामार व श्वासोच्छ्वासाचीहि मारामार. नंतर एका आठवड्यानें तो ह्मणतो:–"मला आज बेरें नव्हतें. हृदयाचें कांहीं तरी बिघडलें आहे. छातीवर ओझें ठेविल्यासारखें मला वाटत होतें. मी जरा घाबरूनच गेलों, आणि अशक्तपणामुळें मला रडें देखील आवरेना; पण मी तें आवरलेंच. एडिंबरोचा प्रवास करण्याकडे व चौघांपुढें जाण्याकडे माझें मनच घेत नाहीं. मला खात्री आहे, सध्याच्या माझ्या स्थितींत मला पांच मिनिटांतच खालीं बसावें लागेल; फार तर काय, पण मला तितक्यांत घेरी देखील येईल. अशी घेरी येण्याची भीति मला अलीकडे वरचेवर वाटते."

ज्या दिवशीं त्यानें आपल्या मतदारांपुढें जाऊन चार शब्द बोलावे ह्मणून ठरलें होतें, तो दिवस नजीक येऊन ठेपला होता; व आतां अवधि मुळींच नव्हता. "मी ब्राइट (डाक्टर) ला बोलावयास पाठविलें. तो स्टेथॉस्कोप (छाती तपासण्याची नळी) घेऊन आला; बोलला कीं, हृत्कमलाची क्रिया फार बिघडली आहे, आणि

त्यानें मला स्पष्टपणें असें सांगितलें कीं, एडिंबरोला जाण्याचा विचारच सोडा. मी अमळ बाहेर पडलों, पण काठीच्या आधारानें देखील चालावयाची मला मारामार पडूं लागली; ह्मणून मी वेस्टबर्न टेरेसपर्यंत गाडींत बसून गेलों व आलों. त्यांचा (बहीण व तिचें कुटुंब) समागम व मायाळूपणा हीं माझा आधींच कमी झालेला उत्साह तितका तरी कायम ठेवण्यास साहाय्यभूत होतात. पुनः सार्वजनिक कामांत शिरण्याच्या मोहांत मी आपणास पाडून घेतलें याबद्दल माझें मला फार वाईट वाटतें. माझा चालू ग्रंथ आता खचीत नीरस उतरणारसें वाटतें........"

पुढें कांहीं आठवडेपर्यंत मेकाले खरोखरच फार आजारी होता; आणि आजपर्यंत जशी त्याची प्रकृति नेहमींची उत्तम राहिलेली होती तशी त्याची पुनः कधींच झाली नाहीं. त्याचा चरित्रकार ह्मणतो, ज्या मायेला पात्र करून घेण्याच्या कामीं त्यानें आपलें सर्व आयुष्य खर्च केलें होतें, त्या मायेनें ह्या वेळेस त्यास अंतर दिलें नाहीं हें सांगावयास नकोंच. लेडी ट्रेव्हेल्यन डा. ब्राइटला जाऊन भेटली; तेव्हां तिला असें समजलें कीं भावाची स्थिति त्याला माहीत आहे अशी दिसते, त्यापेक्षां ज्यास्त भयंकर आहे. पण त्याच्या दिनचर्येवरून तो आपली स्थिति पूर्णपणें जाणून होता असें स्पष्ट दिसतें; मात्र आपली बहीण घाबरूं नये ह्मणून तो तीस असें भासवीत असे. एडिंबरो येथील सभा तहकूब करविण्याबद्दल जी काय व्यवस्था करावयाची ती करावयाचें काम तिनें स्वतः आपल्या शिरावर घेतलें, आणि नंतर इंग्लंदच्या पश्चिम भागांत क्लिफ्टन येथें मेकालेबरोबर ती स्वतः गेली; तेथें तिची त्यानें सर्व व्यवस्था नीट करून दिली, आणि तो सुधरावयास लागे तोंपर्यंत तेथेंच राहिली. तेथें तो दोन तीन महिने राहिला, व एलिसला आठवड्यानें पत्र लिहिणें ह्या

शिवाय इतर लिहिणें जरी त्याचें बंद झालें होतें, तरी वाचन नेहमीं प्रमाणें चालतच होतें. प्रथम कांहीं दिवस त्यास विशेष फरक वाटला नाहीं; पुढें बरीच सुधारणा वाटूं लागली. २५ रुपटंबर रोजीं तो लिहितोः " मला खरोखरच अगदीं चांगलें वाटतें; तथापि माझा एथील डाक्टर बेतानें रहा, बेतानें रहा, ह्मणून अद्यापि मला सांगतच आहे; आणि ब्राइट लिहितो कीं चिल्टर्न हंड्रेड्सला अर्ज कर ( चिल्टर्न हंड्रेड्सला अर्ज करणें ह्मणजे वस्तुतः पार्लमेंताच्या सभासदीचा राजीनामा देणें. गंमत अशी आहे कीं पार्लमेंताच्या सभासदास एकदा निवडिलें ह्मणजे राजीनामा देतांच येत नाहीं. तेव्हां ज्यास पार्लमेंत खलास होण्यापूर्वीं त्या कामांतून मुक्त व्हावयाचें असेल त्यास चिल्टर्न हंड्रेड्स नामक काल्पनिक किंवा निर्जन स्थलाचा समासद होण्याबद्दल अर्ज करावा लागतो)."

डाक्टर ब्राइट यानें जो सल्ला दिला होता तो बरोबरच होता. मेकाले ह्या वेळीं अगदीं बरा नव्हता, इतकेंच नव्हे, तर ह्यानंतर बरा ह्मणून तो कधींच झाला नाहीं, असें ह्मटलें तरी चालेल. मार्च १८५३ मध्यें तो लिहितो:—" गेला जुलई महिना माझ्या आयुष्यांतील मोठा आणीबाणीचा प्रसंग होता. एका आठवड्यांत मी वीस वर्षांनीं ज्यास्त ह्मातारा झालों. एक वर्षापूर्वीं दहा मैल जितके मला वाटत होते त्या पेक्षां हल्लीं मला एक मैल ज्यास्त वाटतो. एडिंबरो एथें ही त्याची दुसरी निवडणूक झाल्यानंतर जो हिवाळा आला, त्यांत त्यास, जबरदस्त खोकल्याचा विकार झाला; आणि पुढें तो जरी जरा कमी झाला तरी दम्याचा उपद्रव त्यास सारखाच राहिला; व वरचेवर खोकल्याच्या भयंकर चळी येऊन त्यास अत्यंत त्रास होत असे. नंतर मग लवकर लवकर तो आपली एकेक आवडती सवय सोडावयास लागला, व त्यास ती पुनः

भरतां येण्याची आशा नष्ट होत चालली. ग्रीक कवि होमर किंवा जर्मन ग्रंथकार गटे यांचे ग्रंथ हातांत घेऊन नदीच्या कांठांच्या बाजूनें, आणि टेंकड्या व उंच मैदान यांवरून, सर्व दिवसभर भटकत रहाणें; तिसऱ्या प्रहरीं पुस्तकें व छापे विकण्याचीं लंदनांतील सर्व दुकानें सावकाश चाळीत जाणें; आणि दर आदितवारीं लांबच लांब फिरावयास जाणें; ह्या सर्व गोष्टी कित्येक महिनेच्या महिने अगदीं सोडून देणें भाग पडूं लागलें; आणि त्याबद्दल, ज्या दिवशीं हवा स्वच्छ असेल त्या दिवशीं भर दोनप्रहरीं रस्त्याच्या ज्या बाजूला उन पडलें असेल त्या बाजूनें हळू हळू फिरावयास जावें, असा क्रम स्वीकारावा लागला. त्याची इतके दिवस अशी चाल असे कीं सकाळीं जरा उशीरां व दिरंगाईनें न्याहारी केली म्हणजे तेव्हांपासून जें लिहित बसावयाचें तें थेट संध्याकाळच्या जेवणापर्यंत; मग आपलें अवजड काम चांगलें तडीस गेलें याबद्दल त्याचें मन थंड झालेलें असावयाचें, व भूक गरम झालेली असावयाची. आतां त्याला, सगळ्या जन्मांत पहिल्यानेंच, मध्यें लंशन ( अल्प फलाहार ) घेण्याची, व अशा रीतीनें आपल्या कामांत खंड पाडण्याची, घाणेरडी आवश्यकता भासूं लागली. त्याला चवथ्यावर्षापासून तों आजपयत आपल्याशीं मुकाट्यांनींच वाचण्यापेक्षां मोठ्यांनीं वाचण्यांत नेहमीच मोठा आनंद वाटत असे; ती सवय आतां त्यास मोठ्या नाखुशीनें सोडावी लागली. चार चौघांत मिसळण्याची मुभा तर आतां त्यास बहुतेक मुळींच नाहींशी झाली होती. कारण त्याचा डाक्टर संध्याकाळीं बाहेर पडण्याची परवानगी त्याला क्वचित्च देई; आणि वरचेवर तर असें वर सांगे कीं आज केव्हांहि बाहेर पडूं नको. १८५५ च्या फेब्रुवारींत् तो एलिस यास लिहितो:—" मी अद्यापि अगदीं बंदींतच आहें. ही स्थिति प्राप्त

होऊन आज सरासरी तीन महिने झाले.... " १८५४ च्या मे महिन्यांत लार्ड कार्लाइल लिहितो:—मेकालेची व माझी थोडक्या प्रसंगीं न्याहारीला एक पंगत झाली; त्याची प्रकृति पहिल्यापेक्षां बिघडलेली पाहून मला वाईट वाटलें." आणि पुनः; "बरीच करमणूक होती;—मेकाले बोलत असे तेव्हां नेहमीच करमणूक असे. हल्लीं मौनाचें साम्राज्य जास्त वरचेवर होत असतें."

लार्ड कार्लाइलपेक्षां ज्यांना मेकालेचा समागम कमी होत असे, व त्याच्याबद्दल ज्यांना काळजीहि कमी वाटत असे त्यांच्या देखील मेकालेची प्रकृति बिघडली आहे ही गोष्ट आतां स्पष्टपणें ध्यानांत येऊं लागली; पण ही गोष्ट त्याच्या चेहऱ्यावरून जरी स्पष्ट दिसत असे, तरी त्याच्या तोंडून त्याबद्दलचा उद्गार फारच क्वचित् निघत असे. त्याची जी घडामोडीची सार्वजनिक कारकीर्द तिजमध्यें त्यास अडचणी व पराजय आले असतां त्यानें आपल्या मनाची जी शांतता कधींच गमाविलेली नव्हती, तीच मनाची शांतता ह्या कठीण प्रसंगींहि त्यानें कायमच राखिली. हल्लींचा कठीण प्रसंग म्हणजे असा होता कीं, तो कित्येक महिनेच्या महिने सारखा आजारी असे, व त्या वेळीं पुष्कळ अंशीं त्याच्या मानसिक धैर्याचाच काय तो त्याला मुख्य आश्रा असे, आणि मनाला उद्योग व करमणूक हीं करून घेण्यासाठीं देखील त्याला पुष्कळ अंशीं स्वताच्याच युक्त्यांवर अवलंबून राहवें लागे. अशा आजारीपणाच्या वेळीं जो माणूस आपलपोट्या असतो तो आपला चिडखोरपणा आपल्या नातेवाईकांवर खर्च करीत असतो, आणि जो अहंभावी ग्रंथकार असतो तो तो आपल्या वाचकांवर खर्चीत असतो. तेव्हां मेकालेच्या निदान दिनचर्यालेखांत तरी त्याचीं चिन्हें दृष्टीस पडावीं असें कोणास सहज वाटण्याचा संभव आहे. पण मेकालेच्या

ह्या लेखांत तसें कांहींच दिसत नाहीं. उलट, प्रत्येक वाढदिवशीं व प्रत्येक नव्या वर्षाच्या आरंभीं, जीं सुखसाधनें आपलीं नष्ट झालीं आहेत त्यांबद्दल रुसवेपणानें कुरकुर करण्याच्या ऐवजीं, जीं अद्यापि कायम राहिलीं आहेत, त्यांबद्दल आभार मानण्यांतच तो गर्क झालेला दिसतो.

" डिसेंबर ३१ सन १८५३:—काम आणि एकान्तवास ह्यांत घालविला आणखी एक दिवस. हे अशक्तपणाचे दिवस मला फारच आवडतात. ह्या वर्षांत जरी माझी प्रकृति हळूहळू जास्तच क्षीण होत गेली, तरी हें वर्ष एकंदरींत मला सुखाचेंच गेलें. माझी शक्ति कमी होत आहे. मी फार दिवस जगेन असें मला वाटत नाहीं, पण माझी इंद्रियें शाबूद आहेत, माझे प्रेममनोविकार प्रबल आहेत, व मला सुखसाधनें विपुल आहेत."

मेकालेला जो हा रोग होता तो अत्यंत उत्साहभंजक आहे; तेव्हां त्यामुळें उत्पन्न झालेला जो निरुत्साह त्यास पुष्कळ दिवसांनीं मध्यें मध्यें त्याच्या दिनपर्यैंत उल्लेख सांपडतात. " मी पूर्वीं होतों तसा नाहीं· आणि प्रत्येक महिन्यास माझी छाती हें मला ज्यास्त ज्यास्तच स्पष्टपणें सांगते; मला जरा उद्विग्नपणा वाटतो; भीतीपासून नव्हे; कारण अनिवार्य जो शेवटचा देखावा व्हावयाचा आहे, त्याबद्दल माझें मन अगदीं स्वस्थ आहे. पण माझी ज्यांच्यावर प्रीति आहे, त्यांजबद्दल वाईट वाटतें म्हणून. मी त्यांना कदाचित् किती लवकर सोडून जाईन हा विचार मनांत आला· म्हणजे कधीं कधीं मला अश्रू दाबणें देखील कठीण जातें. माझ्या आयुष्यदीपांतलें तेल बहुतेक संपत आलें आहे असें माझें मलाच भासतें." पण आपण दुर्दैवी आहों, किंवा देवानें आपणास द्यावें तितकें सुख दिलें नाहीं, अशा प्रकारचा उद्गार त्याच्या ह्या संगळ्या दिनचर्या-

लेखांच्या बाडांत कोठेंच सांपडत नाहीं. दुःख करीत रहाणें व झुरत रहाणें, हें तर एकीकडेसच राहिलें; तर उलट दिवस आहे तेथपर्यंत घ्या काम करून, आणि घड्याळांतील वाळू ज्यास्त ज्यास्त गळत जाईल तस तसे करा जास्त श्रम, असाच त्यानें आपणा स्वतास उपदेश केलेला आढळून येतो; तद्वत्च ज्या गरीबीपासून तो आज पुष्कळ दिवस मुक्त झाला होता, तींतून कांहींकांना तो मुक्त करीत आहे, आणि ज्या निराश झालेल्या महत्वाकांक्षेपासून त्याला कधींच दुःख झालेलें नव्हतें, तसल्या निराशेबदल तो लोकांचें सांत्वन करीत आहे, असाच तो आढळून येतो; आणि शेवटीं, जीं सुखें त्यास आतां भोगण्याची शक्तिच नव्हती तीं सुखें आपल्या संभोवतालच्या तरुण प्रजेवर तो लादीत आहे; आणि आपल्या जीवितावर दुःखाच्या छाया जसजशा जास्त दाट होत जातील तसतशीं त्यांचीं जीवितें जास्त जास्त सुखी करण्याकरितां तो होईल तेवढी खटपट करीत आहे, असाच तो आढळून येतो. असो.

१८५२ च्या आक्टोबरच्या अखेरीस मेकालेची प्रकृति इतकी सुधारली होती कीं, एडिंबरोच्या लोकांशीं जे करार त्यानें केले होते ते पुरे करण्याचें सामर्थ्य त्यास वाटूं लागलें. ह्मणून तेथें तो गेला; आणि त्या ठिकाणीं कांहीं दिवस आपल्या नव्या व जुन्या मित्रांच्या समागमांत घालविल्यावर नवंबरच्या दुसरीस त्यानें त्यांस एक व्याख्यान दिलें. त्यांत इतिहाकारास शोभेल अशा रीतीनें गत पांच वर्षांतील स्वदेशांतील व परदेशांतील ठळक गोष्टींचें संक्षिप्त वर्णन त्याच्या श्रोत्यांपकीं कोणासहि नावडणार नाहीं अशा अगदीं उच्च प्रकारच्या निःपक्षपात बुद्धीनें करून, त्यानें एकदम आपला स्वर बदलिला, व चाळीस मिनटेंपर्यंत असें कांहीं स्वपक्षाभिमानानें ओत प्रोत भरलेलें चुरचुरीत भाषण केलें कीं, तेणेंकरून

त्याचे मतदार गारेगार होऊन गेले, पण यद्यपि जरी तें विशिष्ट पक्षाचेंच ह्मणून भाषण होतें, तरी त्यापासून कोणासहि फारसा राग आला नाहीं. कारण त्यांत प्रतिपक्षाची थट्टा जरी सारखी भरलेली होती, तरी त्यांत कोणास लागेल असा अंश इतका अल्प होता कीं, प्रस्तुत कालच्या राजप्रकरणासंबंधानें तरी मेकालेच्या मनांत पक्षाभिमानाचें वारें कांहीं राहिलेलें नाहीं असें अनुभवी माणसांच्या ध्यानांत तावडतोब आलें. त्याच्या कामन्सव्हेंटिव्ह पक्षकारांनीं त्याला ग्रंथकार यानात्यानें इतक्या गईनें वागविलें होतें कीं, तेव्हांपासून त्यांच्या अंतःकरणाला दुःख होईल किंवा त्यांच्या दृढ समजुतींना धक्का बसेल असें मुत्सदी या नात्यानें कांहींही बोलण्यास तो अगदीं नाखुश असे. त्याच्या प्रस्तुत भाषणाच्या एकंदर धोरणांत दोष देण्यासारखें अगदीं पक्क्या टोरीस देखील अगदीं अल्पच सांपडलें असेल. आणि लार्ड डार्बीचे प्रधान मंडळानें आपल्या मिलिशिया विलास मतदाताचे नवीन हक्क देण्याचें एक कलम जोडण्याची जी विलक्षण शक्कल काढिली होती, त्याबद्दल त्यानें जी त्याची थट्टा केली ती ऐकून टोरी श्रोते विहग श्रोत्यांप्रमाणेंच पोट धरधरून हंसले असावे. ( ह्या कलमांचा उद्देश असा होता कीं ज्यानें ज्यानें ह्मणून मिलिशिया फौजेमध्यें दोन वर्षांहून ज्यास्त नोकरी केली असेल त्यास मतदानाचा हक्क मिळावा. अर्थात् असल्या मतदाराच्या अंगीं हे गुण सांपडावयाचे:—तो १८–१९ वर्षांचा तरुण बांड असावयाचा, गरीब असावयाचा, अडाणी असावयाचा, भटक्या असावयाचा, आणि शेवटचा गुण, पांच फूट दोन इंच उंचीनें असावयाचा ! या ठिकाणीं मेकाले सारख्याला विनोदाला किती जागा आहे, हें वाचकांच्या लक्ष्यांत सहज येणार आहे. )

ह्यानंतर लवकरच नवें पार्लमेंत भरलें; आणि दिजंबरच्या तिस-

रीस मि. डिस्रायलीनें आपल ( बजेट पुढील सालच्या जमाखर्चाचा अंदाज ) पुढें आणिलें. मेकाले लिहितो: " भाषा आणि भाषणपद्धति ह्या दोन्ही गोष्टींनीं हें काम त्यानें चांगलें पार पाडिलें. बजेटाचें निरूपण जरी फारच लांबलचक होतें तरी स्पष्ट होतें. मी तेवढ्याच गोष्टी तितक्याच रीतीनें, किंवा कदाचित् ज्यास्त स्पष्ट रीतीनें, दोन तासांत सभेपुढें मांडिल्या असत्या. डिस्रायलीस पांच तास लागले. त्यांत युक्ति दुसरी कांहीं नव्हती; तर शहरांतल्या लोकांच्या खिशांतून पैसे काढावयाचे, व माल्ट (एक प्रकारची दारू) तयार करणारांच्या खिशांत घालावयाचे; हें बजेट त्यास पास करून घेतां येईल कीं काय याबद्दल मला जबर शंका आहे; पण त्यानें व्यवहारिक चातुर्याबद्दलची आपली किर्ती आज वाढवून घेतली आहे यांत शंका नाहीं."

कामन्स सभेशीं ही जी त्यानें आपली जुनी ओळख ताजी केली, तिच्या पाहिल्या सहा आठवड्यांत, यादींत पुन: नांव घातलेल्या जरठ शिपायाच्या शिस्तीस अनुसरून त्याचें मत असें झालें कीं, हल्लीं भाषणें पूर्वीं इतकीं चांगलीं होत नाहींत. पण हें त्याचें मत बदलण्यास लवकरच कारण झालें. सतरा दिजंबर १८५२ च्या सकाळीं पहिल्या तीन तासांत जो देखावा दृष्टीस पडला, त्यापेक्षां ज्यास्त जोराचे व उत्क्षोभजनक देखावे १८३२ त देखील थोडकेच दृष्टीस पडले असतील. कारण ह्या प्रसंगीं टोरी पक्षाचा अग्रणी (मि. डिस्रायली ) निराशेच्या धिटाईनें नेहमीपेक्षांहि ज्यास्त भयंकर स्वरूप धारण करून, आपल्या पराजय पावण्यास घातलेल्या बजेटाच्या मण्डनार्थ प्रतिपक्ष्यांवर उलटून तुटून पडला; आणि त्यानें असें भाषण केलें कीं, ह्यानें आतां सगळ्यांस अगदीं निरुत्तर करून टाकिलें आहे, असें मित्रांस व शत्रूंस दोघांसही वाटूं लागलें. पण

हें त्यांस वाटतें न वाटतें इतक्यांत, पार्लमेंताच्या चार भिंतीच्या आंत ज्यांचे प्रतिध्वनी पुनः कधीं ऐकूं आले नाहींत, अशा टाळ्यांच्या व प्रतिटाळ्यांच्या गजरांत, ग्लाडस्टन साहेब बाकावरून उडी मारुन ताटकन् उभा राहिला, आणि एकदम असें कांहीं वक्तृत्वपूर्ण संभाषण सुरू करता झाला कीं, तेणेंकरून अवघ्या एका दिवसांत पार्लमेंतांतलें त्याचें वजन दुप्पट वाढलें, आणि राष्ट्रामधील त्याची लोकप्रियता दुणावून गेली.

ह्या वक्तृत्वाच्या पुरांत डार्बी प्रधान मंडळ वाहून गेलें; आणि नवें प्रधान मंडळ बनते वेळीं ज्या ज्या गोष्टी घडत असतात त्या अर्थात् सुरू झाल्या. त्या वेळची ती चळवळ; त्या वेळच्या त्या गटार बातम्या; लोकांचे लहान लहान पुंजके निरनिराळ्या ठिकाणीं जमून एकमेकांना हळूहळू नव्या बातम्या सांगत आहेत, व एकमेकांपासून उत्सुकतेनें ऐकत आहेत, व त्यांजवर टीका करीत आहेत, असे ते राजकीय कळप; श्रीमंतांच्या रस्त्यांतून झपाट्यानें इकडे तिकडे जाणाऱ्या किंवा नव्या मुख्य प्रधानाच्या वाड्याच्या दरवाज्याशीं तासच्या तास थांबण्याऱ्या, त्या भपकेदार गाड्या; जिजोरी ( मुख्य प्रधान ) कडून आतां बोलावणें येईल, अंमळशानीं येईल, ह्मणून आपापल्या अभ्यासाच्या खोल्यांतून वाट पहात बसलेल्या मोठमोठ्या मुत्सद्यांचें तें सारखें वाढत जाणारें अस्वास्थ्य; रोजरोज जसजसे नवे नवे प्रधान नेमिले जातील तसतशीं ज्यास्त ज्यास्त आनंदी अशा ज्यास्त ज्यास्त लोकांचीं नव्या प्रधानांच्या घरीं होणारीं तीं सुखसमाधानाचीं भोजनें; इत्यादि गोष्टींस अर्थात् सुरवात झाली. मेकाले ह्मणतोः—" १७८३ च्या नाताळच्या दिवसापासून, ह्मणजे आज ६९ वर्षांत, नाताळच्या दिवशीं दोन्हीं सभांचे इतके सभासद लंदनांत कधींहि हजर नसतील असें मला वाटतें. हल्लीं-

सारखेंच त्या वेळींहि नाताळच्या आठवड्यांत प्रधानमंडळ बदललें होतें. खरोखरच, दिजंबरच्या २२ व्या तारखेस गच्च भरलेल्या कामन्स सभेंत त्या वेळीं मोठा वादविवाद उडाला होता, आणि त्या प्रसंगीं लार्ड नॉर्थ ( तिसऱ्या जार्जाचा बारा वर्षे १७७०-१७८२ टोरी पक्षीय मुख्य प्रधान ) यानें फारच नामांकित भाषण केलें होतें.

नवीन प्रधानमंडळ जें बनलें तें दोन्ही पक्षांतील मुख्य माणसांचें मिळून बनलें. कान्झर्व्हेटिव्ह लार्ड आबर्डीन हा मुख्य प्रधान झाला, व लिबरलपक्षीय लॉर्ड जॉन रसेल हा कामन्स सभेचा अग्रणी झाला. मुख्य प्रधानकी सोडून ही गोष्ट करण्यास तो प्रथम तयार नव्हता; पण राणीच्या आग्रहावरुन, व मेकालेनें दिलेल्या दुजोऱ्यावरून, ती तोड त्यानें अखेरीस पत्करिली. दोन्हीपक्षांचे लोक प्रधानमंडळांत घेतल्यामुळें दोन्हीपक्षांच्या कांहीं पुढाऱ्यांची अर्थात् निराशा झाली. मेकालेनें तर आपल्याला प्रधानमंडळांत जागा पुनः पत्करावयाची नाहीं हें अगोदरच एडिंबरो येथें सांगून ठेविलें होतें; ह्मणून निराश झालेल्या व्हिग मुत्सद्यांपैकीं हा एक आहे अशी शंका घेण्यास कोणास जागा नव्हती. तथापि त्याच्या मनाची स्थिति चंचल झालेली होतीच, आणि त्यामुळें कांहीं दिवस त्याचें लिहिणें बहुतेक बंदच पडलें होतें.

मेकाले सरकारी जागा पत्करण्याच्या फंदांत पडला नाहीं, हें त्यानें शहाणपणच केलें. कारण ह्याच्यापुढें जेव्हां जेव्हां तो तोंड उघडी, तेव्हां तेव्हां त्याला असेंच दिसून येई कीं आपण क्याबिनेटचा प्रधान झालों असतों तरी देखील आपलें वजन सध्या आहे त्यापेक्षां किंचितहि वाढलें नसतें. ह्याचें उदाहरण. कान्सर्व्हेटिव्हपक्षाचा एक सन्मान्य सभासद लार्ड होटम् नांवाचा होता

त्यानें एक बिल कामन्स सभेपुढें आणिलें होतें; त्याचा मुख्य उद्देश मास्टर ऑव् धि रोल्स नांवाच्या एका न्यायाधिकाऱ्यास कामन्स सभेंत बसण्याची परवानगी नसावी हा होता. त्यानें तें बिल तिसऱ्या वाचनापर्यंत सर्व खांचाखळग्यांतून पार पाडून आणिलें होतें; आणि जेव्हां १ जून १८५३ रोजीं तो तिसऱ्या वाचनाची सूचना करावयास उठला, तेव्हां तें आतां अखेरचें पार पडणार अशी जी त्यास खात्री वाटत होती ती बरोबरच होती. पण त्या बिलाचा जो अखेर निकाल झाला तो ह्या त्याच्या, व ज्यांस ज्यांस ह्मणून तें बिल सभेपुढें आलेलें आहे ह्मणून माहीत होतें त्या सर्वांच्या, अंदाजाच्या अगदीं विरुद्ध झाला, व फारच चमत्कारिक रीतीनें झाला.

ती कथा त्यावेळच्या लीडर नामकवर्तमान पत्राच्या बातमीदारानें उत्तम रीतीनें दिली होती, त्यांतून संक्षेप करून सांगतों. " बुधवारीं जेव्हां मेकालेच्या वजनाची चांगलीच परीक्षा झाली तेव्हां भाषणें ज्यास्त चांगली झालीं. ह्या दिवशीं कामन्स सभा व तिच्या कमिट्या हीं दोन्ही एकदम बसलेलीं असतात. प्रथम भाषणांत मौज नव्हती; बुधवारच्या दिवशीं क्वचित्च असते;—त्या वेळीं वरच्या मजल्यावर कमिट्या बसण्याच्या खोल्यांच्या बाहेरच्या सज्जांतून पुढें मी रेंगाळत होतों, व आतां कोणत्या खोलींत बरें शिरावें असा मनाशींच विचार करीत होतों. अशा रीतीनें मी चाललों असतां मागून मला कोणाचा धक्का लागला. त्यानें माझी क्षमा मागितली व तडक तो धांवत सुटला; अरे ! सभासद ! लङ्ठ सभासद ! त्याच्या आंगलटीवरून तो कधीं धांवण्याच्या भानगडींत पडेल, असें कोणास कधींच वाटावयाचें नाहीं; तरी आपली स्वारी अगदीं वेड्यासारखी धांवतच होती. मी त्याच्याचकडे आश्चर्यानें बघीत आहें इतक्यांत माझ्या दोन्ही

बाजूंनीं माझ्या मागून येऊन आणखी दोन माणूस माझ्या पुढें धांवत गेले; आणि तेहि सभासदच. " सभासदांनीं आण्याचा दरवाजा " ह्मणून पाटी मारलेला जो माझ्या नजीकच दरवाजा होता तो इतक्यांत खाडकन् उघडला, त्यांतून पांच सभासद झपाट्यानें बाहेर पडले, आणि सज्जांतून तसेच पळत सुटले. आणखी दरवाजे उघडतात, आणखी सभासद धांवत बाहेर पडतात. माझ्या चोंहोंकडून मागून येऊन माझ्या पुढें सभासद चाललेच आहेत, आणि ते सगळे एकाच दिशेला. नंतर मग झगेवाली वकीलमंडळी बाहेर येतात, आणि त्यांच्या त्या आनंदी मुद्रांनीं असें कळवितात कीं त्यांच्या कमिट्या तहकूब झाल्या आहेत; आणि नंतर तिसऱ्या एका जातीची मंडळी बाहेर पडते; कोण ? वर्तमानपत्राचे बातमीदार! आणि चेहरे प्रफुल्लित ! अरे ! काय आहे रे ! काय आहे तें नाहीं का तुला माहीत ! अरे ! मेकाले बोलावयास उठला आहे. ही वार्ता आज कित्येक वर्षें कधीं कोणाच्या कानावर आलेली नव्हती; आणि ती वार्ता ऐकल्याबरोबर पूर्वी जसे कळप रिकामे होत तशाच आतां कमिट्यांच्या खोल्या रिकाम्या झाल्या होत्या.

" मी लागलाच त्या धांवणारांस जाऊन मिळालों, आणि ग्यालरींत ( वर्तमानपत्राचे बातमीदार बसण्याची जागा ) जाऊन पोहोंचतों, तों माझ्यापुढें धांवत गेलेले सभासद घामाघुम होत्साते आपल्या जाग्यांवर जाऊन कसे तरी आपटताहेत. खरीच बातमी ती. तो उठलाच होता, व मोठें भाषण करण्यासाठीं उठलेला. तो नव्याच जाग्यांत दिसला; तिजोरीच्या बांकाच्या ( मुख्य प्रधानमंडळांचें बांक ) मागें वर दुसऱ्या ओळींत; आणि ती जागा उंच असल्यामुळें, आणि वक्त्याला तें वातावरण ज्यास्तच स्वच्छ असल्यामुळें, तो एरवींपेक्षां ज्यास्तच चांगला दिसत होता, व

त्याचा आवाजहि ज्यास्त खणखणीत ऐकूं येत होता. तोच जुना आवाज, तीच जुनी पद्धत, व तीच जुनी भाषासरणी; किती छानदार भाषण ! नीट तयार केलेलें, काळजीपूर्वक व्यवस्थित रीतीनें जुळलेलें, आणि अगदीं उघडउघड निबंधाच्या धाटणीवर; पण अगदीं पूर्ण चातुर्यपूर्वक व विलक्षण व्यवस्थापूर्वक, असें बोललेलें;—सभ्यगृहस्थांच्या मंडळीपुढें आपली विद्वत्ता, आपल्या आठवणी, आपलें न्यायचातुर्य, विश्वासपूर्वक मांडणाऱ्या, आणि सभागृहांत तेवढेंच ऐकूं येईल इतकाच आपला स्वर मोठा करून बोलणाऱ्या, जगांत पुष्कळ वापरलेल्या अनुभवी माणसाचे महामोलवान् संभाषणच. पण अशा प्रकारचें तें जें होतें तें तो आपल्या विषयाची प्रस्तावना करीत होता, व श्रोते मंडळी जमत होती तोंपर्यंतच; सभागृह तर, फारच जलद भरलें; आणि तें भरल्या बरोबरच त्याला ज्यास्त अभिमान चढला, व त्याच्या भाषणांत वक्तृत्वाची झुळूक ज्यास्त स्पष्ट मारूं लागली; आणि नंतर तो आपलें भाषण ओतूं लागला, आणि प्रत्येक वाक्यानंतर त्याची ती बोलण्याची त्वरा ज्यास्त ज्यास्तच वाढत चालली; शेवटीं तो एक उत्तम शब्दांचा लोंढाच बनून गेला, व त्यानें आपल्या श्रोत्यांस स्वतःचा उत्साह आणून दिला; तो इतका कीं त्यांना टाळ्या वाजविण्यास देखील फुरसत झाली नाही. मेकाले एकदां गरम झाला, व त्याच्या भाषणाचा वेग आला, ह्मणजे मग त्याच्या त्या बोलण्याला ' शब्दांचा लोंढा ' हेंच वर्णन बरोबर शोभतें. आणि काय ते शब्द ! अजून संध्याकाळचे चार देखील वाजले नव्हते; मंडळीचें ' लंच ' देखील जिरलेलें नव्हतें; तथापि रात्रीं दहा वाजतां निशाचर मंडळी नाटकगृहांत जितकी उल्हासांत आलेली असते, तितके एरवी थंड असणारे, व कधीं फार न बोलणारे किंवा हंसणारे गृहस्थ त्या

वेळीं उल्हासांत आलेले होते. काय ? ह्याची तुम्हांला शंका वाटते काय ? मतें मागें घेतलीं तेव्हां काय झालें तें पहा; मेकालेचें भाषण होण्याच्यापूर्वी लार्ड होटम आपले बिल खचीत पार पाडून नणार ह्याबद्दल एकास पन्नास अशी पैज तुह्मी सहज मारली असती. पण तें भाषण झाल्यानंतर बहुमतानें तें बिल नुसतें ढकलून दिलें इतकेंच नाहीं, तर उडवून दिलें...."

लार्ड होटम ह्यानें धीर न सोडतां, प्रमाणें व दृष्टान्त ह्यांच्या ज्या ह्या धबधब्यांत त्याचें दुर्दैवी बिल गटांकळ्या खात होतें, तो आवरण्यास होईल तेवढा यत्न केला, पण तो सर्व फुकट गेला. त्यावेळीं कामन्स सभेंत निदान दोनशें गृहस्थ तरी असे होते कीं ते मेकालेचें भाषण ऐकण्यासच तेथें आले होते, व त्यांस त्यानें त्या बिलाबद्दल जें सांगितलें त्या पलीकडे त्याची त्यांस कांहींच माहिती नव्हती. तरी १२३ स २२४ या बहुमतानें तें बिल पराजित झालें. त्यानंतर पुढें २० वर्षांनीं तें पास झालें. त्या वेळीं अर्थात् मेकाले मरून किती तरी वर्षे झालीं होतीं! काय हें त्याचें वर्चस्व !

ह्या गोष्टीची स्वत: मेकालेनें जी हकीकत लिहून ठेविली आहे तिजकडे पाहतां, त्याच्या एकंदर भाषणांमध्यें देखील प्रमाणप्राचुर्य आणि सुबकपणाची कमाल ह्यांविषयीं अत्यंत प्रख्यात असें जें हें भाषण, तें तयार करण्यास त्यास किती अल्प वेळ लागला होता हें दिसून येतें. जो हा प्रसंग, त्याच्या स्वताच्या संबंधानें, व सार्वजनिक हिताहिताच्या संबंधानें इतका कठीण होता, त्या वेळच्या देखील आपल्या संभाषणाची जुळवणी करण्यांत त्यानें काय ते दोन प्रहर खर्च केले होते. हा वादविवाद होण्याच्या पूर्वींच्या संध्याकाळीं तो लिहितो:—" मी लार्ड होटमच्या बिलाचा विचार

केला. क्रेग भेटावयास आला, व दोन तास राहिला. एडिंबरो एथील तो जी स्थिति सांगतो ती एकंदरींत चांगलीच आहे. संध्याकाळीं त्या बिलासंबंधानें मी पुनः विचार केला. मी काळजींत आहे, व माझी अगदीं फजिती होणार अशी मला भीति पडली आहे,असें आहे तरी तो धोका मला शिरावर घेतला पाहिजे."

१८३३ चें इंडिया बिल पार्लमेंतांतून फार कुशलतेनें पार पाडिल्याबद्दल मेकालेची प्रधान या नात्यानें जी पहिल्यानें कीर्ति झाली, त्या गोष्टीस या वेळीं बरोबर वीस वर्षे होऊन गेलीं होतीं. हिंदुस्थानाशीं इंग्लंदांचे जे संबंध त्या वेळीं होते, त्यांत सुधारणूक करण्याचा काळ आतां येऊन ठेपला होता. ह्मणून बोर्ड आव् कंट्रोलचा अध्यक्ष या नात्यानें सर चार्लस वूड यानें सभेपुढें एक बिल आणिलें; तें मेकालेला फारच पसंत पडलें. आजपर्यंत हिंदुस्थांतील सिव्हिल सर्व्हिसमध्यें ज्या नेमणुका होत असत त्या, प्रधानमंडळाला राजकीय कामांत जे आपला आश्रय देतील, व जे वडे लोकांचे संबंधी वगैरे असतील त्यांना किंवा त्यांच्या नातलगांना त्या द्यावयाच्या अशा मनुन्यावर होत असत. सर चार्लस वूड यानें प्रस्तुत बिलांत असें कलम घातलें होतें कीं, ह्यापुढें त्या जागा प्रसिद्ध रीतीनें परीक्षा घेऊन तिच्या निकालाप्रमाणें नंबरवारी भराव्या. ह्मणजे, इतके दिवस जें काम वशिल्याचें होतें तें आतां उद्योगाचें व अक्कलहुशारीचें होऊन बसणार होतें. अशा रीतीनें धैर्य व सार्वजनिक हिताची खरी कळकळ दाखविल्याबद्दल मेकालेनें त्याचें अभिनंदन केलें. त्यानें स्वतः देखील १८३३ च्या आपल्या बिलांत ह्या जागा परीक्षा घेऊन भराव्या अशी तजवीज सुचविली होती. पण त्या वेळीं ईस्ट इंडिया कंपनीच्या डिरेक्टरांनीं याचा तो सद्धेतु अमलांत येऊं दिला नाहीं. कारण इतक्या जागा हव्या

तशा भरण्याचा जो त्यांनीं आजपर्यंत चालविलेला हक्क तो ते एकदम सोडावयास तयार नव्हते. ह्मणून बोर्ड आफ् कंट्रोलकडे गुप्त खटपट करून त्या वेळीं त्यांनीं तीं कलमें तशींच दाबून ठेविलीं होतीं, व पुढें पार्लमेंतांतहि गुप्त खटपट करून शेवटीं तीं त्यांनीं ह्मणून पाडिलीं होतीं.

दुर्दैवेंकरून क्रेकरपंथीय प्रसिद्ध वक्ता जो ब्राईट साहेब त्याला हें बिल असावें तितकें चांगलें झालें नाहीं असें वाटलें. हिंदुस्थानच्या कल्याणार्थ उदार बुद्धीनें व मोठ्या उत्साहानें खटपट करणारा असा तो होता. ह्मणून त्याला असें वाटलें कीं, इंग्लंदानें हिंदुस्थानच्या संबंधानें ज्या सुधारणा एकदम करणें अगदीं इष्ट आहे त्यांचा या बिलांत समावेश झालेला नाहीं. पहिल्याच वाचनाच्या वेळीं जो वाद-विवाद झाला त्यावरून ह्या बिलास इष्ट ग्रह लागलेले नाहींत अशी भीति उत्पन्न झाली. त्यावेळीं असें असे कीं कोणत्याहि बिलावर ब्राइटनें गरम पाणी ओतणें ह्मणजे तें पुढें जीव धरील अशी विशेष आशाच नको. ह्मणून मेकालेला या बिलाचें काय होतें अशी मोठी भीति पडली. कारण त्यामध्यें जरी पुष्कळ व्यंगें व उणीवा होत्या तरी त्या सर्वांपेक्षां त्यामध्यें जे गुण होते, त्यांची पुष्कळ ज्यास्त किंमत आहे, अशी मेकालेची समजूत होती. ६ जून रोजीं तो लिहि-तो मी वूडचें भाषण वाचिलें, आणि या बिलानें हल्लींच्या पद्धतींत फार सुधारणा होणार आहे असें माझें मत झालें. ब्राइटचे कांहीं आक्षेप निराधार आहेत, व कांहींमध्यें अतिशयोक्तीचा भाग आहे. पण त्याच्या भाषणाच्या जोरदारपणामुळें बिलास अपाय होण्याचा संभव आहे. म्यांचेस्टर येथील या वीराचा मला समाचार घेतां येतो किंवा नाहीं हें मी दुसऱ्या वाचनाच्या वेळीं पाहीन. ”

इंडिया बिलाच्या दुसऱ्या वाचनाची सूचना २३ जूनला पुढें

आली. वादविवाद सुरू झाला ह्मणजे, जितकें लवकर तुझ्यानें बोलावयास उठवेल तितका ऊठ, असा सर चार्लस वूड यानें मेकाले यास आग्रह केला होता; पण त्याच्या प्रकृतीची स्थिति एव्हांच अशी होऊन गेली होती कीं, तो जर बोलावयाला पाहिजे असेल, तर त्याच्या साठीं कांहीं तरी विशेष व्यवस्था केली पाहिजे. त्याच्या छातींत जें कोंडल्यासारखें वाटत असे त्यामुळें खाल्यानंतर कांहीं तास बोलण्याची त्यास मुळींच सोय नसे; बरें, दुसऱ्या-पक्षीं त्याच्या ठिकाणीं घेरी येण्याचा कल उत्पन्न झालेला असल्यामुळें संध्याकाळीं फार उशीरपर्यंत खाल्याशिवायहि त्यास ठिकाव काढतां येत नसे. सामान्यत: सगळ्यांची इच्छा अशी होती कीं, २४ वीच्या तिसऱ्या प्रहरीं त्यानें प्रथम बोलावयास उठावें; पण प्रधान असावे तितके सावध राहिले नाहींत; आणि २३ व्या तारखेस रात्रीं फार उशीरां जोसेफ ह्यूम यानें काम दुसऱ्या दिवसा पर्यंत तहकूब ठेवण्याची सूचना पुढें आणिली, आणि तेणें करून अर्थात् दुसऱ्या दिवशीं प्रथम बोलण्याचा हक्क त्याच्याकडे गेला.

दुसऱ्या दिवशीं सभागृह गच्च भरून गेलें. ह्यूमशीं बोलण्याइतकी ज्याची ज्याची त्याच्याशीं वग होती, तो तो त्यास असें प्रार्थना करून सांगूं लागला कीं, मेकाले व त्याचें श्रोतृमंडळ यांच्यामध्यें तूं आडवा येऊं नकोस; पण ह्यूम साहेबानें उत्तर दिलें कीं माझी स्वताची छाती तरी अशक्तच आहे, दुसऱ्या कोणत्याहि सभासदाच्या प्रकृतीचें जितकें महत्व आहे, तितकेंच माझ्या प्रकृतीचेंहि आहे, मेकालेला हिंदुस्थानाबद्दल जितकी माहिती आहे, तितकी मलाहि आहे, आणखी सारांश काय, तर, मी बोलणारच. मी सन्मान्य गृहस्थांस ( सभासदांस ) फार वेळ अडकवून ठेवणार नाहीं, असें त्यानें भाषणाच्या आरंभीं आश्वासन दिलें होतें; तरी

तो गृहस्थ गेल्या दहा दिवसांत सहा वेळा बोलावयास उठलेला असल्यामुळें, असल्या ' अशक्त ' माणसाबद्दल सभेस फारशी कींव आली नाहीं. ह्मणून सभेनें त्याचें बोलणें इतक्या कंटाळ्यानें ऐकिलें कीं, हान्सार्डमध्यें त्याच्या भाषणाला जितका उल्लेख केलेला आढळतो, त्यापेक्षां ह्या कंटाळ्याच्या उद्गारांनाच जास्त उल्लेख केलेला आढळतो. पुष्कळ वेळ बोलणें ह्मणजे काय ह्याबद्दलची ह्यूमची कल्पना व त्याच्या श्रोत्यांची कल्पना ह्या अगदीं भिन्न होत्या; कारण ह्यम साहेब बसले व मेकाले उठला तेव्हां बहुतेक आठ वाजण्याची वेळ जवळ जवळ आली होती. तो लिहितोः—

त्या वेळीं अगदीं संध्याकाळ होऊन गेली होती ( जूनच्या अखेरीस विलायतेस आठाच्याच सुमारास सूर्यास्त होत असतो. ), तरी सभागृह फारच चांगलें भरलेलें होतें. मी दीड तासपर्यंत बोललों. साधारणपणें बेरंच बोललों, इतर ह्मणतात फारच चांगलें बोललों. माझें स्वताचें समाधान कांहीं झालें नाहीं. माझा विषय जरी बोलून मुळींच संपला नव्हता, तरी माझी शक्ति मात्र बरीच संपली होती,

अशा रीतीनें त्याला आपलें भाषण एकाएकीं, व विषय पुरा न करतां, मध्येंच थांबवावें लागलें असल्यामुळें त्यानें आपल्या एकंदर भाषणांची जी पुढें आवृत्ति * छापून प्रसिद्ध केली, त्यांत यास स्थळ देणें बरोबर वाटलें नाहीं. अपुर्त्या कामावर आपली अब्रू अवलंबून ठेवावी असें करण्यासारखा तो अर्धवट अभिरुचीचा माणूस नव्हता; आणि मुळींच बोलला नाहीं तें छापील भाषणांत घुसडून द्यावें असें करण्यासारखा तो अर्धवट व्यावहारिक माणूस नव्हता. पण त्यानें हें अर्धवट भाषण जसेंच्या तसेंच छापून आपल्या ग्रंथकर्तृत्वविषयक सदभिरुचीस जर जरासा धक्का दिला असता

तर बरें झालें असतें. कारण उघडउघड रीतीनें परीक्षा घेऊन सार्वजनिक नेमणुका करणें हें तत्व किती फायद्याचें आहे ह्या गोष्टीचें प्रतिपक्ष्यांस निरुत्तर करणारें मण्डन इतकें उत्तम यापूर्वी कधींच कोणीं केलें नव्हतें. बोर्ड आव् कंट्रोल व कोर्ट आव् डिरेक्टर्स ह्यांजमध्यें परस्पर संबंध काय आहेत, तें प्रथम त्यानें थोडक्यांत सांगितलें; आणि नंतर हिंदुस्थानचें राज्य विलायतेंतून करणारीं जीं माणसें त्यांजबद्दलचा जो हा बिलाचा भाग त्यांतून लीलेनें निघून, हिंदुस्थानांतूनच त्या देशाचें राज्य करणारीं जीं माणसें त्याबदलचा जो बिलाचा पुढचा भाग त्यांत त्यानें प्रवेश केला. तो ह्मणाला: " प्रस्तुत बिलाची किंमत मी ज्या कसास तें लावून करणार आहें, तो कस हा कीं, त्याचा परिणाम हिंदुस्थानांतील सिव्हिल सर्व्हिसवर बहुतकरून काय होण्यासारखा आहे ? ज्या नामांकित सर्व्हिसमधून हिंदुस्थानास जजेस्, कलेक्टर्स मिळतात त्या सर्व्हिसमधल्या लोकांचें एकंदर वर्तन व मनाचा कल हीं त्या योगानें उच्च होण्याचा संभव आहे किंवा नीच होण्याचा संभव आहे ? " हे अधिकारी ह्यापुढें कोणत्या रीतीनें निवडावयाचे ह्या प्रश्नाचा विचार सभेस करावयाचा होता. गव्हर्नर जनरलास पसंत होतील ते लोक नेमण्याचा अधिकार त्यास द्यावा असें कोणीं ह्मटलें होतें. त्यावर मेकालेनें असें उत्तर दिलें कीं, असें केल्यास सर्व प्रकारच्या खटपटी सुरू होतील. गव्हर्नरजनरलाचे पुतण्ये, भाचे, दुसरे नातेवाईक, मित्र, मित्रांचे मुलगे, इत्यादि लोक त्याच्या बरोबर किंवा मागून हिंदुस्थानास जावयास लागतील; दारूची बाटली आणण्याबद्दल किंवा पंखा खेंचण्याबद्दल हुकूम करण्यापलीकडे ज्यांना एतद्देशीय भाषांचें ज्ञान नाहीं असे लोक जज, कलेक्टर, रेसिडेंट, वगैरे मोठमोठ्या पगाराच्या जागा पटकावूं

लागतील. आणि शेवटीं याचा परिणाम असा होईल कीं, हिंदुस्थानचा कारभार बिघडेल इतकेंच नाहीं, तर इंग्लंदचाहि बिघडेल; कारण प्रधानहि पार्लमेंतांत आपणास आश्रय मिळावा ह्मणून सभासदांच्या नातेवाईकांची गव्हरनर जनरलाकडे शिफारस करूं लागतील.

नंतर, बंगाल्यांत जेव्हां इंग्लिशांचा कारभार प्रथम सुरू झाला तेव्हां तेथें काय ब्रह्मघोंटाळा झाला होता, व तो क्लैव साहेबानें कसा मोडला, ह्याचें वर्णन त्यानें केलें. त्यासंबंधानें त्यानें त्या साहेबाची एक चमत्कारिक आख्यायिका सांगितली. क्लैवच्या अखेरच्या कारकीर्दीच्या वेळीं एका प्रधानाकडून एक जबरदस्त शिफारसपत्र घेऊन एकजण त्याजकडे गेला. त्यास त्यानें आपल्या विलक्षण पद्धतीस अनुसरून विचारिलें, "काय रे भाई, तुला किती पैसे पाहिजेत?" अशा स्पष्ट रीतीनें त्यास प्रश्न विचारून घेण्याची संवय नसल्यामुळें त्या माणसानें उत्तर केलें कीं, माझा उपयोग होईल अशी एकादी जागा मला मिळावी, एवढीच माझी इच्छा आहे. लार्ड क्लैव ह्मणतो, "पण भाई, हें माझ्या प्रश्नाचें उत्तर मुळींच नव्हे. तुला पाहिजे किती? एक लक्ष पौंड पुरतील किंवा नाहीं?" त्यानें उत्तर दिलें कीं, फार वर्षें फार श्रमाची नोकरी करून जर एवढे पैसे मला मिळाले, तर त्यांत माझें समाधानच आहे. त्यावर लार्ड क्लैवनें त्यास एकदम ती रकम देण्याविषयीं हुकूम सोडिला, आणि त्याला सांगितलें कीं, ही रकम घेऊन आला आहेस त्याच तारवांनें विलायतेस परत जा, आणि तेथें पोहोंचलास, ह्मणजे तेथून पुनः हालूं नको!

मेकाले ह्मणाला, ही गोष्ट फार संभवनीय दिसते. आणि क्लैवनें हें जें केलें त्याबद्दल हिंदुस्थानानें त्याचे उपकारच मानिले पाहिजेत; कारण हा मनुष्य तेथें लागता, तर तो आपलें कामच

वाईट करून लोकांस त्रास देता इतकेंच नाहीं, तर आणखीं त्यांस लुटताहि. तेव्हां असे अनर्थ टाळण्यास उपाय एकच आहे; आणि तो हा कीं सिव्हिल सर्व्हिसमध्यें प्रसिद्ध परीक्षेविना कोणाचा प्रवेश होऊं देऊं नये.

नंतर ह्या परीक्षेच्या संबंधाचीं वूडसाहेबानें त्या बिलांत जीं कलमें घातलीं होतीं त्यांकडे तो वळला, त्या आणि व्यवस्थेबद्दल लार्ड आव् डार्बीनें पसंती दर्शविली होती, त्याबदल त्याचें अभिनंदन करून, लार्ड एलेन्बरो ( माजी गव्हर्नर जनरल ) यानें त्यास विरोध केला होता, त्याबद्दल त्यानें आपलें आश्चर्य व निराशा हीं प्रकट केलीं. त्यासंबंधानें तो ह्मणाला:—

ह्या लाट साहेबांचीं जीं मतें ह्मणून प्रसिद्ध झालीं आहेत तीं जर मला बरोबर समजलीं असतील तर त्यांच्या बोलण्याचा भाव असा दिसतो कीं, ज्या व्यासंगांनीं माणसास उदार शिक्षण प्राप्त होतें असें समजतात, त्यांच्या मागें लागणें ह्मणजे पुढें चांगलें नांव मिळविणें ह्याचें भावी चिन्ह नव्हे इतकेंच, नाहीं तर असें करणें ह्मणजे ह्या व्यासंगांत जे लोक अशा माणसाच्या मागें राहिलेले असतील ते पुढें व्यवहारांत त्याच्या पुढें जातील ह्याचें भावी चिन्ह होय. लाट साहेबांचें मत असें दिसतें कीं, लहानपणीं ज्यांस उदार शिक्षण मिळतें ते पुढें मंद निपजतात, आणि त्यांच्या हातून श्रमाचीं कामें पुढें मुळींच होत नाहींत; आणि उदारशिक्षणापेक्षां क्रिकेट खेळणें किंवा कुस्ती करणें हीच माणसाच्या योग्यतेची अधिक बरोबर परीक्षा आहे असें लाट साहेब ह्मणाले कीं नाहीं, ह्याबद्दल मी खात्री देऊं शकणार नाहीं. मला वाटतें कीं पुढील गोष्ट जितक्या पुष्कळ अनुभवानें, किंवा जितक्या अखंड अनुभावानें, सिद्ध झालेली आहे, त्यापेक्षां अधिक अनुभवानें दुसरी कोणतीच गोष्ट सिद्ध

झालेली नाहीं; ती गोष्ट ही कीं .जीं माणसें लहानपणीं आपल्या सोबत्यांपेक्षां ज्यास्त नांव मिळवितात तींच माणसें पुढेंहि तें मिळविलेलें श्रेष्ठत्व तसेंच कायम राखितात. हा अनुभविक इतका सार्वत्रिक आहे कीं त्याच्या विरुद्ध कोणी बोलावयास लागल्यास आर्सेनिक हें विष नाहीं, किंवा ब्रांडीनें कैफ येत नाहीं असें कोणी प्रतिपादूं लागल्यास तें जितकें मला खेरें वाटेल, तितकें हेंही वाटेल; नंतर त्यानें आक्सफर्ड व केंब्रिज येथील युनिव्हर्सिटींच्या क्यालेंडरांस उल्लेख करून गणित विषयावर र्‍यांग्लर लोक व भाषाविषयांत पहिल्या वर्गांत पास झालेले लोक यांनीं इतरांना जगांत मागें सारिल्यांचीं उदाहरणें कशीं व किती आहेत हें पहिल्यापासून तों क्यानिंग व पील ह्यांच्यापर्यंत दृष्टान्त देऊन स्पष्ट करून दाखविलें. तसेंच ईटन, वेन्टमिन्स्टर, वगैरे प्रसिद्ध शाळांतून कीर्ति मिळविलेले वॉरन हेस्टिंग्स, लार्ड वेलस्ली, सर चार्लस मेटकाफ वगैरे गृहस्थ, हिंदुस्थानांतहि मोठें नांव कसे मिळविते झाले, व खुद्द लार्ड एलेनबरो व त्याचा बाप हे दोघेही प्रसिद्ध विश्वविद्यालयीन गृहस्थ कसे होते, हें त्यानें सांगितलें. व शेवटीं तो असें ह्मणाला कीं, लहानपणीं आळसांत वेळ घालवून पुढें चांगल्या नांवा लौकिकास चढलेल्या माणसांचीं जरीं थोडींशीं उदाहरणें सांपडतात, तरी ते अपवादच समजले पाहिजेत. आणि तीं जीं पुढें आणावयाचीं तीं सामान्य नियमास बाधक ह्मणून नव्हेत, तर ज्यांनीं लहानपणीं चैनीच्या वगैरे नादीं लागून आपला वेळ फुकट घालविला आहे त्यांनीं देखील पुढें अगदीं निराश होऊं नये, तर सुधारण्यास लागावें, यासाठीं. इतकें सांगितल्यानंतर पुढें त्यानें नंबरवारी नांवें लावण्याची 'कांपिटिटिव्ह' परीक्षा व नुसते कांहीं विषय साधारणपणें येत आहेत किंवा नाहींत हें पाहण्याची 'पास' परीक्षा या दोहोंमधील भेद

सभेस स्पष्ट करून दाखविला, व तो ह्मणाला कीं पहिल्या परीक्षेच्या योगानें वेळोवेळीं उत्तम माणसें तेवढीं निवडतां येतात एवढेंच नाहीं, तर दिवसें दिवस ज्यास्त उत्तम माणसें मिळूं लागतात.

कांहीं लोकांची कल्पना अशी आहे कीं परीक्षेंत ज्यांस उत्तम यश येतें त्यांची शरीरप्रकृति बहुधा अशक्त होते, व त्यांच्यांत हिंमत आणि धैर्य हीं बहुधा कमी आढळतात; या गोष्टीस त्यानें नंतर आपल्या भाषणांत थोडासा उल्लेख केला. आणि मोठ्या कुळांत उत्पन्न होणें किंवा राजकारणाशीं संबंध असणें ह्या गोष्टी ज्याच्यापाशीं आहेत त्याची प्रकृति जितकी चांगली असण्याचा संभव आहे, तितकीच परीक्षेंत ज्यानें वर नंबर मिळविला आहे त्याचीही असण्याचा आहे हें त्यानें दाखविलें. आणि जो तरुण माणूस एकाद्या पुस्तकाचें अगदीं मर्म काढूं शकतो, व अनेक प्रश्नांचीं उत्तरें अगदीं मन तल्लीन करून देऊं शकतो, त्यास घोड्यावर बसतां, हातांत ब्याट धरतां, व प्रसंग पडल्यास दुष्काळाची व्यवस्था करतां, कां येऊं नये, हें आपणास समजत नाहीं, असें तो ह्मणाला.

प्रतिपक्षी जीं विरुद्ध कारणें दाखवीत आहेत त्यांवर त्यांचा स्वतांचा विश्वास किती अल्प आहे हें व्यक्त करण्यासाठीं शेवटीं तो असें ह्मणाला; लाट साहेबांचें (लार्ड एलेनबरो यांचें) मत असें आहे कीं, यूरोपांतील कला व विद्या यांचें अध्ययन करण्यास नेटिव्हांस जें आह्मी उत्तेजन देत आहों तेणेंकरून हिंदुस्थानांतील आमच्या राज्याचा शेवट करून घेण्याचाच मार्ग आपण तयार करीत आहों. जें शिक्षण यूरोपियनांस दिलें असतां लाट साहेब तिरस्कार्य समजतात, तेंच शिक्षण नेटिव्हांस दिलें असतां भयप्रद कसें मानतात, हें मला मुळींच समजत नाहीं. ते आह्माला

सांगतात कीं हें शिक्षण यूरोपियनांस बुकांतला किडा करितें, रिकामी बडबड करावयास शिकवितें, आणि व्यवहारांतील मेहनतीचीं कामें करण्यास नालायक करितें; पण तेंच हिंदूस द्या, कीं तो बुद्धीच्या कामांत लागलाच इतका बळवान् होतो कीं, त्याच्या त्या अनिवार्य शक्तीपुढें, ज्याला २५०००० सैन्याची बळकटी आहे, आणि इंग्लंदच्या सगळ्या लष्कराचें व आरामाराचें पाठबळ आहे, असें चांगलें स्थापन झालेलें सरकार खचीत उलटून पडणार. ”

अशा रीतीनें मेकालेनें हिंदुस्थानाबद्दल स्वकर्तव्य बजाविल्यावर आपल्या मतदारांच्या संबंधानें जें त्याचें कर्तव्य तें बजावून त्यांस आपली कृतज्ञता व्यक्त करून दाखविण्याचें राहिलें होतें, ह्मणून त्या उद्योगास नंतर तो लागला. एडिंबरो एथील सरकारी किंवा धर्मसंस्थेचा खर्च मुख्यत्वें करून आन्युइटि टाक्स ( वार्षिक उत्पन्नावरील कर ) नामक एका स्थानिक कराच्या उत्पन्नांतून इतके दिवस भागत असे. हा कर गोळा करण्याची पद्धति जुलमाची व अन्यायाची असल्यामुळें लोक तो फार नाखुशीनें देत असत. ह्मणून १८५३ च्या सेशनांत, एडिंबरो एथील धर्मोपदेशकांचा पगार उत्पन्न करण्याची जरा कमी अन्यायाची पद्धति घालून देणारें एक बिल सभेपुढें आलें. एडिंबरोचा लार्ड प्रोव्हस्ट व टौन कौन्सिल ह्यांनीं त्या बिलास दगडपेक्षां वीट मऊ ह्मणून आश्रय दिला होता. पण सार्वजनिक पैसा धर्मविषयक कामाकडे लावणें मुळींच गैर आहे असें ज्यांचें मत होतें त्यांनीं या बिलास बळकट विरोध केला. ह्या संबंधीं सामान्य व्हिगपक्षाचें जें मत होतें तेंच अर्थात् मेकालेचें होतें. ह्मणून आपल्या आश्रयदात्यांस पाठिंबा देण्याची आणि धर्मसंस्था व राज्यसंस्था ह्या प्रश्नाच्या संबंधानें आपलें मत बोलून दाखविण्याची ही जी संधि आली, तिचा त्यानें मोठ्या आनंदानें उपयोग करून घेतला.

जुलईच्या १९ तारखेस त्याचें भाषण झालें. त्या दिवशीं बरो-बर बारा वाजतां कामात सुरुवात झाली. लार्ड आडव्होकेट यानें तो विषय सभेपुढें आणिला. त्याच्यावर स्टॉकपोर्टचा सभासद मि. स्मिथ यानें त्यास विरोध करून अशी सूचना पुढें आणिली कीं, हें बिल आजपासून तीन महिन्यांनीं पुनः हातीं घ्यावें. (असल्या सूचनेचा अर्थ तें बिल पुनः हातीं घेऊं नये असाच असतो; सेशनांच्या प्रारंभीं ही सूचना आणिल्यास तिहींच्या बद्दल सहा महिने घालि-तात; एका सेशनांत आणिलेलें बिल पास होण्यापूर्वीच जर तें सेशन खलास झालें तर तें बिल फुकट जातें. तेंच बिल दुसऱ्या सेशनांत घेतां येत नाहीं. अगदीं नवें बिल आणावें लागतें, व त्याचा पहिल्या वाचनापासून सर्व विधि पुनः व्हावा लागतो.) हॅडफील्ड नामक सभासदानें त्यास अनुमोदन दिलें. मेकाले त्याच्या मागून उठला. त्यानें पूर्वी तयारी केली नव्हती, तरी त्याचें भाषण अगदीं अस्खलित झालें, व त्याची छाप बरीच बसली.

मेकाले बिलास अनुकूल भाषण करणार आहे, असें आधीं समजलेलें असल्यामुळें हॅडफील्ड असें ह्मणाला होता:–" एडिंबरोचा रैट आनरेबल (प्रिव्हि कौन्सिलच्या सभासदास ही पदवी लावीत असतात. नुसत्या पार्लमेंताच्या सभासदास आनरेबल एवढेंच ह्मणतात) वक्ता सभासद ह्या बिलास आपला टेंका देणार आहे, अशी वदंता आहे, आणि अशा वक्त्याच्या तोंडांतून ह्या बिलाचें होणारें मण्डन मी मोठ्या जिज्ञासेनें ऐकेन. ह्या सभागृहांत किंवा राष्ट्रांत ह्या रैट आनरेबल गृहस्थाची जितकी पत (ह्यासंबंधानें) आहे तितकी दुसऱ्या कोणाची नाहीं, तेव्हां तो भलतेंच बोलून ती गमावणार नाहींच." मेकालेनें उत्तर केलें:–" शेफील्डचा ऑनरेबल सभासद (हॅडफील्ड) ह्यानें माझ्या तोंडून वक्तृत्व

ह्मणून ज्यास ह्मणतात तें ऐकण्याची आशा मुळींच करूं नये."
खरोखरच, त्याच्या भाषणाचा उद्देश श्रोत्यांचीं मनें गुंग करण्याच्या ऐवजीं त्यांची खात्री करण्याचा होता. आणि त्याच्या भाषणाचा जो अखेरचा भाग झाला तो असा होता कीं, धर्मसंस्थांचा खर्च लोकांनीं खाजगी रीतीनें चालवावा असें ह्मणणारांमध्यें जे अगदीं अग्रणी असतील त्यांस देखील तो नापसंत होऊं नये. तो ह्मणाला:—सरकारी धर्मसंस्था लोकांस नावडती होणें ही गोष्ट अबकारीचा बंदोबस्त, फौज, किंवा पोलीस हीं लोकांस नावडतीं व्हावीं ह्या गोष्टीपासून अगदीं भिन्न आहे. शेवटच्या तीन संस्थांचे लोक जे नावडते होतात ते त्या लोकांना जें काम करावें लागत असतें त्याच्या रूपावरून होत असतात. पण धर्मसंस्थेचें असें आहे कीं, ती जर लोकांस अप्रिय झाली, तर ती नुसती कुचकामाचीच होते असें नाहीं, तर त्याच्यापेक्षांहि वाईट होते; कारण ह्या संस्थेच्या अस्तित्वाचा हेतु लोकांमध्यें धर्माविषयीं सन्मानबुद्धि व प्रेम हीं उत्पन्न करावीं हा असतो; ह्मणून तिच्या योगानें जर ह्या मनोभावाच्या उलट मनोभाव त्यांच्या मनांत उत्पन्न होत असतील, तरी ती मुळींच नसलेली बरी. ह्मणून माझी सभेस अत्यन्त आग्रहपूर्वक अशी विनंति आहे कीं, जी संस्था प्रेमोत्पादक नसेल तर निरुपयोगी ठरते, त्या संस्थेस ज्याच्या योगानें ती द्वेष्य मात्र होईल अशा साधनानें अस्तित्वांत ठेवण्याची खटपट करूं नये."

कामन्स सभेंत मेकालेचे हे शेवटचे शब्द होते. तो जर राजकारणांत या वेळीं पुनः पडलेला नसता, सुखास बरेंच झालें असतें. पार्लमेंतात परत आल्यावर त्यानें ज्या दोन वादविवादांत भाषणें केलीं त्यांवरून त्यास असें अगदीं निर्विवाद रीतीनें कळून आलें कीं, जर आपलें आयुष्य आंखुड करून आपल्या

इतिहासलेखनाच्या कामास कायमचा व्यत्यय आणावयाचा नसेल, तर वक्त्याच्या कारकीर्दीस इतःपर अखेरचा रामराम ठोकिला पाहिजे. दुसऱ्या एका प्रसिद्ध विद्वानाच्या ( ऐझाक कॅझाबाँ नामक फ्रेंचलेखक ) चरित्रकारानें आपणास असें सांगितलें कीं, " मेंदू जेव्हां दुसऱ्या एकाद्या कामांत अगोदरच गुंतलेला असतो, आणि शक्तीचा व्यय जेव्हां ग्रंथलेखनाकडे होत असतो, तेव्हां इतर गोष्टींकडे लक्ष्य देणें भाग पडल्यास तेणेंकरून घाबरेपणा आणि अस्वस्थता हीं उत्पन्न होतात; " आणि मेकालेच्या इतकमलाची स्थिति अशी कांहीं होती कीं, अशा प्रकारची अस्वस्थता त्यास केव्हांच उत्पन्न होत असे. प्रत्येक चांगल्या वक्त्याला पुढें भाषण व्हावयाचें असलें ह्मणजे अगोदर एकप्रकारचा थरथराट सुटत असतो; त्यांच्या स्वरूपाचें विवरण करणें कठीण आहे, व अनुभव आणि विचारशक्ति ह्यांच्याशीं त्यांचा मेळ घालून देणें जास्तच दुर्घट दिसतें;—तसले थरथराट ह्याला पहिल्यापासूनच सुटत असत; आणि हल्लीं हल्लीं तर असें होऊं लागलें होतें कीं, प्रत्यक्ष भाषणाचे जे श्रम आहेत, व त्या वेळीं जो क्षोभ होत असतो, तेच ह्यास सहन होत नाहींसे झाले होते. १८५२ त जेव्हां हा पार्लमेंटांत पुनः प्रवेश करिता झाला, तेव्हां अग्रणी होण्याची महत्वाकांक्षा धरावयाची असा त्याचा मुळींच बेत नव्हता; आणि पुढें त्याच्या लवकरच असें अनुभवास आलें कीं अग्रणीत्व तर राहूंद्याच पण अनुयायित्व देखील चांगलेसें आपल्या हातून होण्याची आशा इतःपर करणें नलगे. ही आपली दुःखकारक अवस्था त्याच्यानें एकदम लक्ष्यांत आणवेना. वेस्टमिन्स्टर येथें ( पार्लमेंतगृहांत ) त्याच्या हजर राहण्याच्या संबंधानें ह्मणाल तर त्याचे मतदार त्याला हवी तितकी गय करीत असत; पण त्याला त्या मद्दचा फायदा घेणें

फारच थोडें आवडत असे. आपल्या पक्षाच्या हिताहिताचा एकादा प्रश्न आला, मतें घेण्याची वेळ आली, ह्मणजे त्या वेळीं आपण हजर राहिलेंच पाहिजे असें त्यांस वाटे. कारण रिफार्म बिलाच्या वेळीं कमिश्यांमध्यें तो बसलेला होता, व मेलबर्नच्या कारकीर्दींतहि तो सभासद होताच; त्या वेळीं अशी स्थिति असे कीं, तें प्रधानमंडळ केव्हां पदभ्रष्ट होईल याचा नेम नसे. त्यामुळें त्याच्या पक्षाच्या प्रत्येक सभासदानें नेहमी हजर असणें अगदीं जरूरच असे; मग तो कोणीहि असो. ती संवय मेकालेला लागलेली होती, व ती त्याची अद्यापि कायम होती. पण १८५२ च्या हिंवाळ्यामधील सेशनांत ( हें त्या सालचें जादा सेशन; महत्वाचीं कामें असतील तरच हिंवाळ्यांत सेशन भरत असतें ) ज्या रात्रीं पहिल्यानेंच सभा उठण्यास उशीर झाला, त्या रात्रींच त्यास कळून आलें कीं, १८३२ आणि १८४१ एव्हांचा मेकाले आपण आतां नव्हे. नवंबरच्या २६ वीस तो लिहितो: " आमचीं दोनदां मतें घेतलीं; आणि तें काम मला फार त्रासदायक वाटलें. मी पहाटेस दोन वाजतां हळू हळू घरीं चालत गेलों, व फार थकून जाऊन बिछान्यावर जाऊन पडलों. आणखी कांहीं रात्री असे प्रसंग आल्यास पुनः क्लिफ्टन येथें ( हवा बदलण्यास ) जाण्याचा प्रसंग येईल. "

हा जर कर्तव्याचा प्रश्न असता, तर आपल्या प्रकृतीस ही कामन्स सभेची दगदग सोसते किंवा नाहीं ह्याबद्दल मेकालेनें मुळींच पर्वा केली नसती. प्रकृति आणि स्वास्थ्य यांचा कंजूषपणा तो मुळींच करीत नसे. आपल्या ग्रंथावर आपली सर्व शक्ति खर्च करणें; डाक्टरांचा सल्ला, व त्यापेक्षांहि ज्यास्त खात्रीचें जें स्वतांच्या इंद्रियवेदनांचें सांगणें, यांस न जुमानतां सारखे श्रम करीत रहाणें; इतिहासाचा एक खंड ज्यास्त लिहून व्हावा एव-

द्र्थ, जरूर पडल्यास, आपल्या आयुष्याचें एक वर्ष कमी करून देखील घेणें,–हे जे त्याग आहेत ते करण्यास, तो तयार होता; आणि इहलोकींच्या आपल्या वेळाची किंमत आपल्या हातून जेवढें होईल तेवढ्यावरून जे करीत असतात, आणि आपल्याला जेवढी चैन भोगावयास सांपडेल तेवढ्यावरून जे करीत नाहींत, त्या सर्वांचें असेंच असतें; व मेकालेचेंहि अर्थात् तसेंच होतें, पण आन राणीच्या कारकीर्दीची हकीकत लिहावयाची राहिलीच असतां आपण आपली अल्पशक्ति कंटाळवाण्या व थकवा आणणाऱ्या असल्या ह्या सभासदीच्या नेहमीच्या कामांत खर्च करावी ह्मणजे तिचा अगदीं अपव्यय करणें होय, ही गोष्ट त्याच्या लक्ष्यांत आल्याशिवाय राहिली नाहीं, व त्याच्या मित्रांनींहि त्याच्या लक्ष्यांत आणिल्याशिवाय ठेविली नाहीं. मत देण्याची पाळी केव्हां येईल ह्मणून सगळी रात्र वाट पहात बसणें, नंतर ती वेळ आली ह्मणजे सभागृहाच्या सज्जांतून पुनः पुनः मिनिटाला फूट या वेगानें अर्ध्या मैलाचा फेरा घेणें, गलबा व गोंधळ यांत रात्रीचें जेवण करणें, व दोन घांसांच्या दरम्यान वीस मिनिटें मतदानांत घालविणें; फेब्रुवारीच्या महिन्यांतील अर्धवट वितुळलेल्या बर्फाच्या रेंदांतून पहाटेस तीन वाजतां घरीं पायांनीं रखडत जाणें; आणि लंडनच्या उन्हाळ्यांतील अगदीं कडक उष्णतेच्या आठवड्यांतून प्रधानांच्या मागच्या बाजूस गचडी झालेल्या बांकाच्या मध्यभागीं बसणें; अशा प्रकारचीं पार्लमेंतीय कारकीर्दीचीं सुखें (!) मेकाले सारख्या अशक्त प्रकृति झालेल्या माणसास अगदीं कंटाळा व थकवा आणितीं झालीं, ह्यांत नवल तें कोणतें ?

सारांश, पार्लमेंताचा सभासद या नात्यानें मेकाले जी हयगय करी तीस सबळ कारण होतें. ह्या ठिकाणीं तो जो आपल्या श-

फीचा हात राखून खर्च करी, तो इतरत्र ती फाजील रीतीनें खर्च करावी ह्मणून नव्हे. त्याच्या खाजगी पत्रव्यवहाराच्या रूपामध्यें या वेळीं जो फेरबदल होऊन गेला, त्यावरून आपल्या ग्रंथावर आपली सर्व शक्ती खर्च करतां यावी एतदर्थ इतरत्र ती किती हात राखून तो खर्ची हें स्पष्ट दिसतें. पूर्वी प्रकाशकांस किंवा संपादकांस देखील जीं तो पत्रें लिही त्यांत ग्रंथकर्तृत्वाच्या संबंधानें किती तरी बारीक सारीक गोष्टींचा समावेश तो करीत असे, हें नेपियरला त्यानें लिहिलेल्या पत्रांवरून चांगलेंच व्यक्त होतें; पण आतां तें सर्व त्यानें सोडून दिलें. तद्वत्‌च पूर्वी आपल्या बहिणीस वगैरे जीं पत्रें तो लिही त्यांत मेजवान्या, मेळे, वादविवाद, इत्यादि किती तरी गोष्टींचा भरपूर व विनोदपूर्ण उल्लेख असे; तशीं पत्रें यापुढें त्यानें कधीं पाठविलीं नाहींत. एलिसशीं मात्र त्याचा पत्रव्यवहार पूर्वीसारखा वारंवार होत असे; पण हा पत्रव्यवहार ह्मटला ह्मणजे जेवणाचें निमंत्रण, व तें जरा खुबीदार अशा एक दोन ओळींत लिहिलेलें, इतकाच कधीं कधीं असे; तथापि बहुत प्रसंगीं तीं पहिल्याच सारखीं सरासरी लांबलचक असत.

१८५३ सालच्या उन्हाळ्याचा कांहीं भाग त्यानें टनब्रिजवेल्स या शहरीं घालविला. तेथें एक सुखाचें घर भाड्यानें घेतलें, व ग्रीकग्रंथांचें, व विशेषतः प्लेटोच्या ग्रंथांचे, अध्ययन करण्यांत तो काळ त्यानें घालविला. पण या ठिकाणीं तो असतां एक नवेंच काम त्याच्यावर अकस्मात् येऊन पडलें. तें त्यांची पार्लमेंतांतील भाषणें छापून प्रसिद्ध करण्यासाठीं तयार करणें हें होय. त्यांतून कांहींकांचे रिपोर्ट पूर्ण छापलेले होते, कांहींकांचे अर्धवट होते, कांहींकांचा नुसता गोषवारा होता. तेव्हां ह्या सगळ्या उणीवा त्याला त्याच्या स्मरणशक्तीवरून व ह्या रिपोर्टांवरून भरून का-

ढाव्या लागल्या. हा सर्व उपद्याप या विश्रांतीच्या वेळींच त्यास अंगावर घेण्याचें कारण असें झालें कीं, व्हिजेटेली नामक एका प्रकाशानें याचीं भाषणें याच्या 'विशेष परवानगीवरून' म्हणून नुक्तींच छापून काढिलीं होतीं, व तीं लार्ड लॅण्ड्सडौन ह्यास समर्पण केलीं होतीं. वास्तविक रीत्या त्यानें ह्याची परवानगी मुळींच घेतलेली नव्हती; आणि शिवाय त्यांत अनेक चुका केल्या होत्या. मेकालेनें कधीं न बोललेले शब्द किंवा कधीं न व्यक्त केलेले विचार त्याच्या माथीं त्यांत त्यानें मारिलेले होते; त्यामुळें तीं तशींच राहूं दिल्यास ह्याच्या कीर्तीस बट्टा लागण्याचा संभव होता; म्हणून ह्यानें स्वतः आपलीं भाषणें शुद्ध करून लांगमन कडून छापविलीं, व त्यांना जोडलेल्या प्रस्तावनेंत व्हिजेटेली हा थोडक्याशा पैशाच्या लोभास्तव आपली व माझी अब्रू घालविण्यास उद्युक्त कसा झाला, हें स्पष्ट व झणझणीत रीतीनें त्यानें लोकांच्या नजरेस आणून दिलें.

पण येणेंप्रमाणें मेकालेचीं भाषणें छापून तयार होण्याच्या अगोदर त्यानें राजकारणांतून आपलें अंग वस्तुतः काढून घेतलें होतें. आपल्या इतिहासग्रंथांत सदा निमग्न होत्साता वेस्टमिन्स्टर येथें काय चाललें आहे इकडे तो बहुतेक मुळींच लक्ष्य देत नाहींसा झाला. राष्ट्रीय कर्ज सर्व एका व्याजावर आणावें ह्याबद्दल ग्लाडस्टन साहेबानें या वेळीं जी कृति योजिली तिचें महत्व यास, नाणें योग्य किमतीवर पुनः आणण्यासाठीं छाटलेले शिलिंग परत मागविण्याची जी मान्टेगची (तिसऱ्या विलियमच्या कारकीर्दीतील) युक्ति तिच्या महत्वाहून फारच कमी वाटे; आणि १८५४ च्या गर्भांतच नष्ट झालेल्या रिफार्म बिलापेक्षां १६९२ चें जें त्रैवार्षिक पार्लमेंट करण्याबद्दलचें तसलेंच बिल त्याचें महत्व या वेळीं त्यास जास्त वाटत होतें. फेब्रुवारीच्या १३ वीस तो

लिहितो. "लार्ड जॉन आज आपलें नवें रिफार्म बिल सभेपुढें आणणार होता. मी जाण्याचा बेत केला होता, पण धीर झाला नाहीं. हा पूर्वेचा वारा मला बंदिवान् करून ठेवितो. पहिल्या रिफार्म बिलानें जें जग दणाणून गेलें त्यापेक्षां हल्लींचें जग किती निराळें आहे ! जसा राष्ट्राच्या कारकीर्दीत तसाच माझ्या कारकीर्दीत अत्यंत महत्वाचा दिवस जो ता. १ मार्च १८३१, त्या दिवसाहून हा दिवस किती तरी निराळा ! " या वेळीं तो कामन्स सभेस इतका विरळ जात असे कीं, एकाद्या दिवशीं तो गेला, तर ती एक कांहीं अशीं महत्वाचीच गोष्ट समजली जात असे. स्पीकरच्या खुर्चीच्या मागें तो कधीं उभा राहिलेला दृष्टीस पडला, ह्मणजे कोणी तरी स्नेही किंवा ओळखी त्याला बोलावयास लावयाचें सोपें काम अंगावर घेई, आणि मग लवकरच त्याच्या सभोंवतालच्या जाग्यांत इतकी गर्दी जमावी कीं, जणूं काय प्रधानमंडळाचें अस्तित्वनास्तित्व ज्याच्यावर अवलंबून आहे, अशा महत्वाच्या प्रश्नावर पांच मिनिटांनीं मतें घ्यावयाचीं आहेत. आपल्या स्वताला पार्लमेंटाचा सभासद ह्मणवून घेणें हें त्याला आतां अगदीं आवडत नाहींसें झालें होतें. ह्मणून त्यानें ब्लयाक साहेबास लिहिलें:—"मी कामन्स सभेंत आतां राहणें योग्य नाहीं हा विचार माझ्या मनाला सध्या खात आहे. मला वाटतें कीं, ज्या मतदारांनीं आजपर्यंत माझी फार गय केली त्यांच्याशीं हल्लींचें माझें वर्तन फार अनुदारपणाचें व कृतघ्नपणाचें आहे." पण एडिंबरो येथील लोकांस तसें वाटलें नाहीं; आणि त्याच्या मुख्य मुख्य मतदारांनीं त्यास आग्रहपूर्वक व पुनः पुनः विनंति केल्यावरून तो आणखी कांहीं दिवस त्या शहराचा प्रतिनिधि ही पदवी आपणास लावून घेण्यास कबूल झाला.

मुत्सद्दी या नात्यानें त्याचा काल जरी अगदीं निघून गेला होता, तरी १८५४ व १८५५ या सालीं इंग्लंदच्या इतिहासांत ज्या महत्त्वाच्या गोष्टी घडल्या, त्या सर्वांकडे त्याचें फारच लक्ष होतें. त्याचा चरित्रकार ह्मणतो: स्वदेशभिमानी ह्मणून जर कोणी एकादा असेल, तर तो तो होता. आपण इंग्रज आहों ह्या गोष्टीचा अभिमान त्याला जितका मनःपूर्वक व कायमचा असे, त्यापेक्षां ज्यास्त मनःपूर्वक किंवा ज्यास्त कायमचा अभिमान ज्यास आहे, असा मोठा किंवा लहान माणूस शोधून काढणें फार कठीण जाईल. तो असें ह्मणत असे कीं, "मी जेव्हां यूरोपांत प्रवास करीत असतों, तेव्हां मी एकाद्या हलक्या सलक्या शहराचा नागरिक नाहीं हा विचार मनांत आणणें मला फार आवडतें." आपल्या राष्ट्राची युद्धशक्ति कमी झालेली नाहीं, व त्याचें पाणी पूर्वी सारखेंच कडक आहे, असे कांहीं दृष्टीस पडलें ह्मणजे त्यास मोठा आनंद होत असे. यूरोपांतील पूर्व भागांत लढाईचें चिन्ह दिसावयास लागण्याच्या पुष्कळ अगोदरच इंग्लंदच्या फौजफाट्याबद्दल त्याला फार काळजी लागूं लागली होती.

पुढें जेव्हां रशियाशीं युद्ध प्रत्यक्ष सुरू झालें, तेव्हां तें सर्व हा फारच औत्सुक्यपूर्वक व तसेंच विचारपूर्वक अवलोकन करीत राहिला. तें सुरू होण्यापूर्वी जीं बोलणीं चालणीं झालीं त्यांत प्रिंस आल्बर्टचें गुप्तपणें अंग आहे अशी एक गप्प उठली होती, तिच्याबद्दल यानें आपला तिरस्कार स्पष्टपणें व्यक्त केला होता. ता. १७ जनेवारी १८५४ रोजीं लिहिलेल्या एका पत्रांत तो ह्मणतो: "प्रिन्स आल्बर्टच्या विरुद्ध जें भुंकणें चाललें आहे तें फक्त पार्लमेंट भरेपर्यंत वेळ घालविण्याचें एक साधन आहे. या ओरडीचा तिरस्कार करण्याइतकी जर त्याच्या अंगीं अक्कल व धीर

असेल, तर ती लवकरच संपून व विसरून जाईल. त्यानें इंग्लिश राज्यपद्धतीच्या तत्वाविरुद्ध कांहीं एक केलें आहे असें मला वाटत नाहीं; आणि माझी खात्री आहे कीं त्याच्याविरुद्ध जे सर्वांत मोठ्यानें ओरडत आहेत त्यांना त्यानें काय केलें हेंही माहीत नाहीं, किंवा आपल्या राज्यपद्धतीविरुद्ध ह्मणजे काय, हेंही माहीत नाहीं." ज्या दिवशीं राणीनें पार्लमेंत उघाडिलें त्या दिवशीं तो आपल्या दिनचर्येंत लिहितो: "प्रिन्स आल्बर्ट याच्या स्वागतांत लार्डांच्या सभेंत कमीपणा झाला नाहीं, याचा मला संतोष वाटतो. नुक्ते जे त्याजवर हल्ले झाले, ते अत्यन्त लज्जास्पद व मूर्खपणाचे होते.....मला माझ्या देशाची लाज वाटते, तथापि उलट प्रवाह आधींच सुरू झाला आहे."

बाल्टिक समुद्रांतील आरमार मार्च महिन्याच्या प्रारंभींच निघालें; त्याचा मुख्य सर चार्लस नेपियर हा होता. त्यास निघण्यापूर्वी एक सार्वजनिक मेजवानी दिली होती, व त्या प्रसंगीं कांहीं मुख्य मुख्य प्रधान हजर होते. त्या वेळीं जीं भाषणें झालीं तीं हल्लीं देखील वाचण्यास इंग्रजांस लाज वाटते. मेकालेचा चरित्रकार ह्मणतो: त्यांची सरणी व सार यांना उत्तम नांव द्यावयाचें ह्मटलें तर त्यांस इंग्लिशांच्या ब्रीदाविरुद्ध असें ह्मणणें हेंच होय. ज्या परराष्ट्राशीं लढाई अद्यापि सुरू झाली नसेल त्याच्या विरुद्ध बढाईचें व रागाचें भाषण करणें अशी ब्रिटिश मुत्सद्यांची कधींच चाल नाहीं; आणि जो जय अद्यापि मिळावयाचा आहे त्याच्याबद्दल अगोदरच आनंद मानणें अशी तर ब्रिटिश खलाशांना मुळींच सवय नाहीं. ह्या अनिष्ट मेजवानीच्या वेळीं कांहीं क्याबिनेट प्रधान हजर होते ह्या गोष्टीस ब्राईट साहेबानें पार्लमेंतांत असा उल्लेख केला. "त्या मेजवानीची हकीकत वाचून मला दुःख व लाज वाटलीं आहेत,

त्या ठिकाणीं अविचारानें जो हलकटपणा दाखविण्यांत आला, तो माझ्या मतें सुधारलेल्या व ख्रिस्ती राष्ट्राच्या सभ्य व जबाबदार मुत्सद्यांना लाजिरवाणा आहे." लार्ड पामर्स्टन यानें जें यावर उत्तर दिलें त्यांत मुत्सद्दीपणाचीहि फारशी खूण नव्हती, किंवा ख्रिस्तीपणाचीहि नव्हती. त्यानें जी सुरवात केली ती ब्राईट यास "सन्मान्य व रेव्हरंड (हीं पदवी अर्थात् धर्मोपदेशकासच लावितात) गृहस्थ" असें ह्मणून केली. तेव्हां वादविवादामध्यें एकमेकांची अदबी राखण्याची जी सामान्य शिस्त आहे तिचें हें उल्लंघन आहे, उल्लंघन आहे, अशा अर्थाचे ऑर्डर, ऑर्डर, (शांतिः, शांतिः) ह्मणून चोहोंकडून लागलेच उद्गार निघाले. पण एवढ्यानें सावध व्हावें तें एकीकडेच राहून तो पुढचें आपलें भाषण अशा कांहीं तऱ्हेवर करिता झाला कीं, याबद्दल स्पीकरनें त्यास शुद्धीवर आणावें असें जरी त्यामध्यें कांहीं नव्हतें, तरी इतर सभासदांच्या अभिरुचीस व मनोवृत्तींस अत्यन्त तिटकारा आणणारें असेंच तें भाषण झालें. ह्या वेळीं मात्र मेकालेला आपल्या ह्या विभूतीच्या मण्डनार्थ कांहीं बोलतां आलें नाहीं. तो लिहितो "मी सोमवारीं सभेस गेलों, पण तेथें आनंद होण्याच्या संबंधानें ह्मणाल तर मी घरींच राहिलों असतों तरी बरें झालें असतें. माझे सर्व विचार ब्राईटनें बोलून दाखविलेले मी ऐकिले; आणि ग्रेहाम व पामर्स्टन ह्यांनीं शोचनीय रीतीनें आपल्या अकलेचें प्रदर्शन केलेंलेंहि मी पाहिलें. पामर्स्टननें धिमेपणा, विचार, आणि सभ्य चालरीत ह्यांचा जो अभाव त्या वेळीं प्रदर्शित केला, तो कोणास खरा देखील वाटणार नाहीं. सर्व जगांतील त्याचे शत्रू व निंदक ह्यांनीं वीस वर्षांत त्याचें जें नुकसान केलें असेल, त्यापेक्षां ज्यास्त नुकसान त्यानें स्वतः तीन मिनिटांत करून घेतलें आहे. मी घरीं आलों तो अगदीं निरुत्साह होऊन आलों."

पुढें होणाऱ्या जयाबद्दल अगोदर आनंद मानणारा जरी मेकाले नव्हता, तरी गर्व वाहण्यासारखें आपल्या सैन्यानें कांहीं केल्याबरोबर प्रत्येक राष्ट्रांतल्या लोकांस जो त्याबद्दल अभिमान वाटत असतो, तसा वाटून घेण्यास तो तयार असे. आणि तशी संधि लवकरच आली. ४ आक्टोबर १८५४ रोजीं तो ह्मणतोः—"किती वैभवाची बातमी! ती इतकी वैभवाची आहे कीं, ती सगळी खरी देखील नसेल, तथापि त्यांतली बरीच खोटी ठरली तरी हरकत नाहीं. ह्या विजयांचा एक परिणाम, आणि अत्यन्त महत्वाचा परिणाम असा होईल कीं, हें युद्ध फ्रान्सांत जें आजपर्यंत सर्व लोकांस संमत नव्हतें तें आतां होईल; आणि त्यामुळें असें होईल कीं, बादशहा (तिसरा नेपोलियन) जरी मेला, किंवा तदनंतर जरी महाक्रांति झाली, तरी सध्याची जी दोस्ती (इंग्लंद व फ्रान्स यांजमधील) तिच्यांत व्यत्यय येणार नाहीं." पुढच्या हिंवाळ्यांत रशियांत इंग्लिश शिपायांना जीं संकटें व दुःखें भोगावीं लागलीं त्यांबद्दल त्यास किती वाईट वाटलें, व या संकटांमध्यें त्या शिपायांचें जें आज्ञाधारकत्व, जो सोशिकपणा, व जी निर्भीति, दिसून आली, त्याबद्दल त्यास किती अभिमान वाटला, हें त्याच्या रोजच्या दिनचर्येवरून स्पष्ट दिसतें. १३ नवंबर रोजीं तो लिहितोः—"क्रिमिया (जेथें लढाई सुरू होती तो रशियाचा दक्षिण भाग) मधील आमच्या शूर शिपायांबद्दल मला धास्ती वाटते, पण माझ्या देशाबद्दल मला अभिमान वाटतो; आणि आमच्या राष्ट्राची हिंमत इतकी मोठी व अविजेत्य आहे याबद्दल आनंद वाटतो. आमचें शौर्य जोपर्यंत कायम आहे तोंपर्यंत बाहेरून तुमच्या देशावर स्वारी करितों असें कोणी ह्मणणें ह्मणजे केवळ बागुलबुवा आहे." या लढाईसाठीं ज्या ज्या गोष्टी खर्चीं घालणें अवश्य होतें त्या त्या सर्व

खर्च करण्यास आपले देशबांधव उत्सुक आहेत हें पाहून त्यास ज्यास्त ज्यात संतोष होत गेला. इंग्लंदचें वैभव व स्वातंत्र्य हीं फुकट मिळालेलीं नाहींत, आणि तीं कायम राखण्यासाठीं जी किंमत पडेल ती देण्यास जोंपर्यंत इंग्लंद तयार असेल तोंपर्यंत तीं कायम राहतील, ह्या गोष्टींची आठवण आपणास व इतरांस देण्याची मेकालेस मोठी आवड असे. ब्रिटिश लोकांच्या खऱ्या धैर्याची किंमत ज्यांत झाली अशी जी इंकरमनची लढाई तिची हकीकत वाचून हे शब्द त्यानें आपल्या दिनचर्येंत लिहिले: " मी लहान होतों तेव्हां वेलिंग्टनच्या कृत्यांनीं जितकी चळवळ उत्पन्न होत असे, तितकी हल्लीं जागृत झालेली आहे. एकंदरींत मला फार संतोष वाटतो. इतकीं शूर माणसें मेलीं, व इतकीं कुटुंबें विपत्तींत पडलीं, ह्याबद्दल वाईट न वाटणें अशक्य आहे. पण आज इतकीं पुष्कळ वर्षे लढाईचा प्रसंग आला नसतां देखील आमचें सैन्य पूर्वीपेक्षां ज्यास्त तयार असावें, ही मोठी गोष्ट होय. दोन तीन वर्षांपूर्वी जीं संकटें आह्मावर येण्याची भीति उत्पन्न झाली होती तिला आमच्या शिपायांची व आमच्या सर्व राष्ट्राची हिंमत हें चांगलें औषध आहे. आतां पुष्कळ वर्षेपर्यंत इंग्लंदावर स्वारी करण्याची कोणी घाई करणार नाहीं. "

१८५३ च्या इंडियन आक्टाचा जो भाग उघड परीक्षा घेऊन नेवरवारी जागा सिव्हिल सिर्व्हिसमध्यें द्याव्या ह्या विषयाच्या संबंधानें होता, तो अमलांत आणण्याची वेळ आतां आली होती. ह्मणून त्यासंबंधानें योग्य ती व्यवस्था करण्यांचें काम चार्लस वूडनें एका कमिटीकडे संपविलें, व तिचा अध्यक्ष मेकाले यास नेमिलें. १ जुलै १८५४ रोजीं तो लिहितो. " मला रिपोर्ट तयार करावयाचा आहे. मला तो एका आठवड्यांत · केला पाहिजे,

व मी करीनच. " त्याचा ठोकळ मसुदा त्यानें ७ जुलैस तयार केला; शनिवार ८ जुलै रोजीं त्याची कायमची नक्कल केली; आणि रविवारीं ती आपल्या मेव्हण्यास वाचून दाखविली. ट्रेव्हेल्यन यास ती फार आवडली, पण त्यांत नवल नाहीं. कारण असल्या प्रतिस्पर्धेच्या परीक्षेचे जे गुण आहेत त्या सर्वांचा त्यानें त्यांत समावेश केला होता, व जे दोष आहेत त्यांना फांटा दिला होता. सर्व्हिसमध्यें हुशार व सशक्त अशाच माणसांचा प्रवेश व्हावा, ह्मणजे, ज्यांच्या बुद्धी तरतरीत असतील व ज्यांनीं विद्या चांगली संपादन केली असेल अशांचाच प्रवेश व्हावा, आणि ज्यांनीं अर्धवट अर्धवट पुष्कळ विषय चावले असतील, अशांना प्रतिबंध व्हावा. ह्या हेतु साधणारी एक सरल पण खात्रीची अशी एक योजना त्यानें तयार केली.

त्यानें असें लिहिलें " रुंदी फार व खोली थोडी अशा ज्ञानाला उत्तेजन द्यावें अशी आमची मुळींच इच्छा नाहीं. आमचें असें मत आहे कीं ज्या विषयाचें एकाद्या उमेदवारानें केवळ वर वर ज्ञान मिळविलें असेल त्याला त्याबद्दल मुळींच मार्क देऊं नयेत. अर्धा डझन भाषांत वाईट भाषान्तरें करण्यापेक्षां व निबंध लिहिण्यापेक्षां एकाच भाषेचें खोल व यथार्थ ज्ञान संपादिलेलें असणें, यास ज्यास्त महत्व दिलें पाहिजे.... "

या व्यवस्थेंत परीक्षेच्या विषयांची योजना त्यानें अशी केली कीं, इंग्लंद, आयर्लंद व स्काटलंद ह्या तिन्ही देशांतील विद्यार्थ्यांना सिव्हिल सर्व्हिसमध्यें शिरण्याची संधि मिळावी. हिंदुस्थानांतून विद्यार्थी या परीक्षेस येतील असें त्यास वाटलें नसावें. कोठें शास्त्रीय विषयाचें ज्ञान जास्त मिळतें, तर कोठें भाषांचें मिळतें इत्यादि गोष्टीही विषयांची व मार्कांची जंत्री तयार करतांना त्यानें

लक्षांत ठेविल्या होत्या. ती जंत्री हिंदुस्थान सरकारानें जशीच्या तशीच अमलांत आणिली; आणि उमेदवारांचे वयाची ईयत्ता ठरविणें, हेल्बरी येथील कंपनीचें आजपर्यंत सिव्हिल सर्व्हंट्स् तयार करण्याचें कालेज मोडून टाकणें, उमेदवार निवडल्यावर दोन वर्षे त्यांनें इंग्लंदांत विशेष प्रकारचें शिक्षण घेत राहणें, ह्यासंबंधाच्या ह्या कमिटीच्या सर्व सूचना त्या सरकारानें जशाच्या तशाच स्वीकारिल्या. या रिपोर्टांत मेकालेनें असें भाकीत करून टेविलें होतें कीं, ह्या परीक्षेंतून जे उमेदवार पार पडून नोकरीवर लागतील, ते दुसऱ्या कोणत्याहि नोकरांपेक्षां सभ्यपणा व इभ्रत या गुणांत कमी असणार नाहींत.

मेकालेला अशी थोडीशी आशा होती कीं हिंदुस्थानसरकारानें स्वीकृत केलेली ही जी नवी पद्धति ती इंग्लंदचें सरकार आपल्या नोकरांसंबंधानें अमलांत आणील. कारण ह्या वेळीं ग्लाडस्टन साहेब क्याबिनेटांत असून इंग्लंदच्या सिव्हिल सर्व्हिसमध्यें सुधारणा अवश्य केली पाहिजे असें ह्मणणारांपैकीं तो प्रमुख होता. आणि सर चार्लस ट्रेव्हेल्यन व सर स्टाफर्ड नार्थकोट यांनीं निरनिराळ्या खात्यांच्या सुधारणेच्यासंबंधाने एक रिपोर्ट तयार केला होता, त्यांतही अशीच सूचना आग्रहपूर्वक केली होती; पण प्रमुख राजकारणी पुरुषांपैकीं थोडक्यांसच ही गोष्ट मनापासून हवी आहे असें लवकरच दिसून आलें. ईस्ट इंडिया कंपनीच्या डिरेक्टरांच्या हातून इच्छेनुरूप नेमणुका करण्याची सत्ता काढून घेणें, व स्वताच्या हातांतील तसलीच सत्ता सोडून देणें, ह्या गोष्ठी अर्थात् अगदीं भिन्न होत्या. ह्मणून सरकारी नोकऱ्या देणारे व घेणारे ह्या दोघांनीं या कुसीविरुद्ध मोठी व भयंकर ओरड सुरू केली; व त्यामुळें या नव्या पद्धतीच्या अभिमान्यांस, तिची वेळ अजून आली नाहीं, असें कबूल करणें भाग पडलें. असो.

आपलीं भाषणें छापावयास देण्यासाठीं तयार करण्याचें काम संपल्यानंतर मेकाले आपल्या इतिहासलेखनाच्या कामास पुनः लागला; आणि नवंबर १८५३ पासून पुढं सतत दोन वर्षेंपर्यंत त्याचें तें काम बहुतेक अव्याहत चाललें होतें. ह्या वेळीं हें काम त्याच्या शक्तीच्या बाहेर त्यास नेहमीच वाटे, व कधीं कधीं तर तेणेंकरून त्याच्या सुखाला देखील बाध येई. १८५४ च्या प्रारंभीं हा ताण त्याला फारच दुःखदायक रीतीनें भासला. पण पुढें जेव्हां उन्हाळा लागला, तेव्हां त्याची प्रकृति सुधारली; आणि पुढें बराच वेळपर्यंत त्याला शक्ति चांगलीच वाटत असे. तेव्हांपासून आपल्या इतिहासलेखनाच्या कामापासून त्याला शुद्ध आनंदच होत असे. १८५४ च्या सपटंबरांत त्याची इतकी तयारी झाली कीं, आतां आपल्यास त्या ग्रंथाच्या संबंधानें नवें कांहीं वाचावयास नको असें त्याचें त्यास वाटलें. ह्मणून तो पुढें एकसारखा लिहीत राहिला, व दर महिन्यास त्या कामीं ज्यास्त ज्यास्तच मेहनत करूं लागला. त्याचे हे श्रम जरी त्याचे आवडते होते तरी ते त्यास फार असत. पत्रें लिहिण्याचें तर त्यानें आतां बहुतेक सोडूनच दिलें; आणि शेवटीं दिनचर्या लिहिण्यासाठीं देखील त्यास फुरसत मिळत नाहींशी झाली.

ता. २९ जानेवारी १८५५ रोजीं मि. रीबक ह्यानें अशी सूचना पार्लमेंटापुढें आणिली कीं, सीबास्टोपल ( क्रिमिया मधील एक किल्ला, ज्यास इंग्लिश व फ्रेंच यांनीं बरेच महिने वेढा घातला होता. ) येथें इंग्लिश सैन्याची स्थिति कशी होती ह्याची चवकशी करण्याकरितां एक कमिटी नेमावी. ही सूचना अर्थात् लार्ड आबर्डीनच्या प्रधानमंडळाविरुद्ध होती, कारण तिचा गर्भित अर्थ, प्रधानांनीं सैन्याची खाण्यापिण्याच्या वगैरे संबंधानें व्यवस्था नीट ठेविली नाहीं, असा होता. ती सूचना फारच बहुमतानें पसार

झाली; त्याबरोबर लार्ड आबर्डीननें लागलाच राजीनामा दिला; व लार्ड पामर्स्टनच्या हातांत मुख्य अधिकार आला; त्यानें सैन्याच्या कामिसेरियट व्यवस्थेत इतकी सुधारणा केली कीं, लढाईचें पारडें लागलेच फिरलें. ह्या संबंधानें मेकाले आपल्या दिनचर्येंत लिहितो: " मला वाटतें, आज ( ता. २९ रोजीं ) रात्रीं प्रधानांविरुद्ध सूचना पसार होईल, व उद्यां प्रधानमंडळ बदलेल. असें व्हावें ह्यांत मला समाधानच आहे, आणि माझ्या आजारामुळें मत देण्याचा मला प्रसंग येत नाहीं, ह्याचाहि मला आनंदच वाटत आहे. "

एव्हांपासून मेकालेनें दिनचर्या लिहिण्याची जी सोडिली ती पुढें नवंबरांत सुरू केली. त्या वेळीं त्याच्या इतिहासाचे पुढील दोन खंड बहुतेक छापून झाले होते. दिजंबरांत ते प्रसिद्ध झाले. पूर्वींच्या दोन खंडांप्रमाणें ह्यांचाहि विलक्षण खप झाला; व ते तितकेच लोकांस आवडले. त्यांचा प्रसार केवळ इंग्लंदांतच झपाट्यानें झाला असें नाहीं, तर अमेरिकेंत देखील झाला. एव्हरेट नामक अमेरिकन प्रकाशकानें मेकालेस असें लिहून पाठविलें कीं, बायबल, व एक दोन शालोपयीं पुस्तकें, एवढीं खेरीज करून दुसऱ्या कोणत्याही ग्रंथाचा खप एथें तुमच्या या ग्रंथा इतका कधीं झालेला नाहीं. यूरोपांतल्या इतर देशांतहि मूलग्रंथाचा खप चांगला झाला; आणि जर्मनींत त्यांचें भाषांतर करण्यासाठीं सहा असामी एका वेळीं एकमेकांविरुद्ध चढाओढ करीत होते. यूरोपांतील दहा निरनिराळ्या भाषांमध्यें त्याचीं भाषान्तरें झालेलीं आहेत, व पर्शियन भाषेंतहि त्याचें भाषांतर झालें आहे, ह्मणून ह्मणतात.

# प्रकरण १० वें.

## अखेरचीं वर्षें.

इसवी सन १८५६ च्या प्रारंभीं मेकालेनें पहिली जी खबरदारी घेतली ती पार्लमेंतांतून निघण्याबद्दलची तयारी करणें ही होय. त्यानें आपल्या मतदारांचा निरोप घेण्यासाठीं त्यांस एक पत्र लिहिलें; आणि तें वाचून त्यांस फार वाईट वाटलें. त्यांत त्यानें असें लिहिलें होतें; " गेल्या दोन वर्षांच्या अनुभवावरून माझी खात्री झाली आहे कीं, जीं कर्तव्यें कामन्स सभेच्या सभासदानें केलींच पाहिजेत, तीं अर्धवट रीतीनें देखील करण्याची शक्ति आतां मला पुन: कधीं येईल अशी मला आशा वाटत नाहीं. आजपर्यंत तुम्हीं जी माझी गय केली, त्याबद्दल मी तुमचा अत्यंत आभारी आहें. मीं राजीनामा द्यावा अशी माझ्या मतदारांपैकीं थोडक्यांनीं सुद्धां जरी सूचना केली असती, तरी देखील मी ती आनंदानें मान्य केली असती. पण एकानें देखील माझ्या विरुद्ध तक्रार किंवा कुरकुर केली नाहीं. " हें पत्र त्यानें १९ जानेवारीला पाठविलें, व २१ तारखेस चिल्टन हंड्रेड्सला अर्ज केला. दुसऱ्या फेब्रुवारीस तो आपल्या दिनचर्येंत लिहितो: " एडिंबरो एथील मतदारांनीं मोठी सभा भरवून सर्वानुमतें पसंत केलेलें मानपत्र आज मला लार्ड प्रोव्हस्टकडून आलें. तें वाचून मी अगदीं सद्गित झालों."

अशा रीतीनें, जें स्वास्थ्य भोगण्यासाठीं त्याचे आप्त व मित्र इतके दिवस त्याच्या पाठीस लागले होते, तें स्वास्थ्य भोगण्यास

त्यानें आतांपासून आरंभ केला. इतके दिवस पूर्वी सांगितले-ल्याच आल्बनी चौकामधील खोल्यांत तो राहत असे; पण तिसऱ्या-मजल्यावरचें राहणें त्याच्या सध्याच्या प्रकृतीस बहुतेक असह्य झालें होतें, व तो आज कित्येक दिवस दुसरीकडे कोठें तरी घर घ्यावें या विचारांत होता. त्याचें जुनें लाडकें नांव क्लाफाम येथें एकादी घरवाडी विकत घ्यावी असें त्याच्या एकदां मनांत आलें; पण तें जमलें नाहीं. शेवटीं केन्सिग्टन ( लंदनचाच एक भाग ) येथें एक चांगलें घर व बाग विकावयास काढिलीं होतीं, तीं सोईचीं समजून यानें घेतलीं; आणि त्याच्यांत आपल्या व आपल्या बहिणीच्या अभिरुचीप्रमाणें नवीन सामान भरून तो तेथें या वर्षाच्या मे महिन्यांत रहावयास गेला.

" १ मे, १८५६.—घर बदलण्याची वेळ अगदींच नजीक येऊन ठेपली. ह्या आल्बनी चौकामध्यें पंधरावर्षे सुखानें घालविल्यावर मी तो आतां सोडीत आहे. मीएथें प्रथम आलों तेव्हांपेक्षां तिप्पट श्रीमंत झालों आहे, व प्रसिद्ध तर फारच जास्त झालों आहे; माझी प्रकृति ढासळली आहे, पण माझे प्रेमभाव पूर्वी इतकेच बळकट आहेत, व इंद्रियेंहि तशींच तिखट आहेत. मी एथें होतों तेवढ्यामुदतींत माझ्या अत्यन्त प्रेमाचें कोणी गमा-वलें नाहीं. माझे प्रिय स्नेही कांहीं निवर्तले, पण ते माझ्या रोजच्या समागमांतील कांहीं नव्हते. आणखी पंधरा वर्षे मी जगेन अशी मला मुळींच आशा नाहीं. एथून हालण्याचें मला वाटत वाईट आहे; आणि हा गेला आठवडा एथें जी माझी अत्यन्त गैरसोय झाली आहे ती जर झालेली नसती, तर याच्यापेक्षाहि मला ज्यास्त वाईट वाटलें असतें; पुस्तकें एथून गेलीं आहेत, व त्यामुळें कपाटें निवळ सांगाड्यासारखीं दिसतात. ज्या ह्या खोलीमध्यें आज बतकीं वर्षे माझे

जागेपणाचे बहुतेक तास म्या घालविले, तिला उद्यां मी शेवटचा रामराम ठोकणार. सध्याच तिचें स्वरूप बदललेलें दिसतें. गेल्या रविवारीं ती जी दिसत होती त्याचें आज केवळ शव राहिलें आहे. वियोगांचा मला मोठा द्वेष आहे. आजच जेव्हां त्या जिन्याच्या असंख्य पायऱ्या, धापा टाकीत व अगदीं थकून जाऊन, मी चढत होतों, तेव्हांच माझ्या मनांत विचार आला कीं, हें शेवटचें चढणें आहे, आणि माझ्या डोळ्यांत पाणी आलें. पण एवढे कष्ट केल्यावर पुढें तरी मला सुख झालें. एलिस जेवावयास आला;—सरासरी चारशें किंवा अधिक वेळां आम्ही एथें एकत्र जेवलों असूं, त्यांतलें हें अखेरचें. नंतर निजावयास गेलों. आज मी जें जें करितों त्यामध्यें ' अखेरचें ' हा विचार आपला येतोच. एक दिवस अगदीं खरोखरच अखेरचा येईल ! "

मेकालेची ह्या नव्या घरांत मात्र व्हावी तशी सर्व सोय झाली. कारण हें घर मोठ्या रस्त्यापासून अगदीं दूर होतें, सभोवती झाडेंझुडें पुष्कळ होतीं, आणि ह्याच्या पलीकडे काय ती एकच वाडी होती. ती कोणाची ह्मणाल तर ड्यूक आव्ह् आर्गाइलची. त्याला देखील मेकाले सारखाच एकांत वास फार पसंत असे, व त्याला कारणहि तेंच; दोघे मोठे अभ्यासी. हा ड्यूक मोठा वयातीत होऊन नुक्ताच निवर्तला.

ह्या त्याच्या नव्या घराचें नांव त्यानें हॉली लॉज ह्मणून ठेविलें होतें. त्यांतील बहुतेक खोल्या लहानच असत. पण ग्रंथकर्त्यांच्या सुखाचीं जीं दोन अत्यन्त मोठीं साधनें तीं एथें होतीं; लायब्ररी व बागबगीचा. लायब्ररीची खोली मोठी व सोईवार आकाराची अशी होती. हिवाळ्यांत तिच्यांत उब राही, व हवाहि खेळे, आणि तिच्यापुढें हिरवीगार गवताळ जमीन असल्यामुळें उन्हाळ्यांत

जरा बाहेर पडण्यास मोठी सोय असे. बागांत तीस फुटाहून उंच झाड मुळींच नव्हतें; पण निरनिराळ्या जातीच्या सुवासिक फुलांची व पानांची रेलचेल असे. मेकालेस ही बाग अत्यंत पसंत पडली.

अशा रीतीची सभोवतालच्या वस्तूंची शोभा, व आपल्या मालकीचें घर ह्यामुळें जो एक मनाला आनंद होत असतो तो, ह्या दोन गोष्टींमुळें मेकालेस रोजच्या बारीक सारीक गोष्टींबद्दल देखील एक नवीन प्रकारची आस्था वाटूं लागली; अशी पूर्वी त्यास कधींच वाटत नसे. घरांतील व घराबाहेरील वस्तु नीटनेटक्या ठेवाव्या, अशी जी घराच्या मालकास हांव सुटते तशी त्यास आतां सुटूं लागली. ह्याचा एक चांगला परिणाम असा झाला कीं, दिवसांतून दहा मिनिटें कां होईना, पण लिहिणें, बोलणें व वाचणें, ह्या खेरीज त्याच्या हातून कांहीं अन्य उद्योग होऊं लागला. बागबगीच्याकडे आतां तो लक्ष देऊं लागला; बाकी त्यांतील माहिती त्यास बेताचीच होती. झाडांमधून रान उपटून काढणें, सुकलेल्या डाहाळ्या, पानें वगैरेंचा निकाल करणें, ह्याच्या पलीकडे त्याची फारशी मजल प्रथम प्रथम जात नसे. पुढें तो खिडक्यांवरून वगैरे वेल सोडणें, कारंज्या सभोंवतीं फुलझाडें लावणें, वगैरे जास्त खोल अशा बागशाईच्या कामांत शिरावयास लागला.

मेकाले खाण्यापिण्याच्या कामांत आपल्या जिभेचे फारसे चोचले लावणारा कधींच नसे. बाहेर जेवावयास गेला ह्मणजे तो मिष्टान्नें वगैरे खात नसे असें नाहीं, पण साध्या जेवणांतच त्यास समाधान वाटत असे. पण आपल्या घरीं कोणी पाहुणे आले, मग तीं लहान मुलें कां असेनात, ह्मणजे मात्र कांहीं तरी मेजवानीचा थाट केल्याशिवाय त्यास बरें वाटत नसे. पण त्याच्या ह्या जेवणांपेक्षां त्याच्या गप्पा गोष्टी व संभाषण हींच त्याच्या पांहुण्यांस जास्त

प्रिय होत, व जेवण संपलें तरी टेबलावरून उठण्याची मंडळीस आठवण होत नसे.

अशा रीतीनें त्याचे ह्या नव्या घरांत दिवस सुखानें जाऊं लागल्यामुळें चैनीसाठीं ह्मणून बाहेर जाण्याची त्यास फारशी इच्छा होत नाहींशीं झाली. लंदन समाजांत महिन्याच्या महिने यानें मुळींच जाऊं नये; आणि वर्षेच्या वर्षे देखील देशावरील आपल्या मित्रांकडे किंवा ओळख्यांकडे रहावयास जाऊं नये. यानंतर एक दोन रात्रीं विंडसर क्यासल (राणीचा वाडा) येथें, आणि एक दोनदा केंट प्रांतांत लार्ड स्टानोप याच्या घरीं, एवढाच काय तो हा घर सोडून गेला असेल. असें करणें हें जसें त्याच्या प्रकृतीस आतां आवश्यक झालें होतें, तसेंच त्याच्या मनाच्या कलासहि तें अनुकूलच होतें.

मेकालेला लोकांच्या घरीं जाऊन राहण्याचा जरी इतका कंटाळा असे, तरी होटेलांतून राहण्यास, व विशेषतः इतर देशांतील होटेलांतून राहण्यास, त्याचा मुळींच प्रत्यवाय नसे. यूरोपांत लढाईच सुरू असली, किंवा एलिस याच्या बरोबर येऊंच शकत नसला, तर गोष्ट निराळी; नाहीं तर प्रत्येक पावसाळ्यांत हा फ्रान्स, इटाली वगैरे देशांतून फिरावयास जावयाचाच. १८५६ त त्यानें आणखी एकदा आल्प्स पर्वत वलांडिला, आणि आगष्ट अखेरीस मिलान शहरीं जाऊन तो पोहोंचला; तेथून व्हेरोना येथें गेला; आणि अशा रीतीनें त्यानें तो प्रवास संपविला. पुढच्या वर्षी अशीच त्यानें फ्रान्सांतून फेरी केली. बाहेर देशीं गेला ह्मणजे त्या त्या देशाचें वाङ्मय वाचावयाचें, हा त्याचा क्रम सुरू होताच.

१८५८ च्या फेब्रुवारीच्या शेवटच्या तारखेस मेकाले आपल्या दिनचर्येंत लिहितो. "लांगमन भेटावयास आला. इति-

ह्यासाची नवीन आवृत्ति छापिली पाहिजे. काय चमत्कार! साडेसवीस हजार प्रती दहा आठवड्यांत खलास! ह्यावर्षी अशा रीतीनें लेखकाच्या धंद्यांत मला निवळ वीस हजार पौंड मिळाले तर त्यांत नवल तें काय? बावीस वर्षांपूर्वी कर्ज फेडतां मजजवळ कांहीं शिल्लक नव्हतें; ह्याचा विचार करतां, हें बरेंच ह्मणावयाचें. आणि पुनः माझा चुलता जनरल यानें जें मला थोडेंसें द्रव्य ठेविलें होतें त्याशिवाय बाकीचा सर्व पैका म्यां स्वतः संपादन केलेला आहे; आणि शिवाय तो सहजगत्या व प्रामाणिपणानें संपादिला आहे, व ज्या धंद्यांत तो संपादिला आहे तो मला सुखाचाच आहे; बरें मी कंजुषपणानें वागलों आहें असेंहि नाहीं.'

मेकालेनें जो हा पैसा अशा रीतीनें मिळविला होता, तो तो राजाप्रमाणें खर्च करीत असे; पण स्वताच्या चैनीसाठीं खर्च न करतां इतरांच्या सुखासाठीं करीत असे. जेव्हांपासून त्याच्या हातांत पैसा खेळूं लागला, तेव्हांपासून त्याच्या दिनचर्येच्या बहुतेक प्रत्येक पानांत त्याच्या औदार्याची कांहीं ना कांहीं तरी खूण सांपडतेच. कोणी एकाद्यानें एकादें पुस्तक लिहिलेलें असलें, मग तें चांगलें असो वा वाईट असो, ह्मणजे मेकालेला त्या लेखकाला पैसे देण्यास तेवढें शिफारसपत्र पुरे होत असे.

आतां अगदीं तिऱ्हाइतांशीं जर त्याचें वर्तन असें उदारपणाचें असे, तर त्याचे नोकर चाकर व त्याचे आप्त इष्ट यांना तो विसरत नसे, हें सांगावयास नकोच. त्याचे नोकर त्यावर नेहमी संतुष्ट असत, व त्यानें आपल्या सर्व भावाबहिणींच्या शिक्षणाचें सर्वच ओझें आपल्यावर घेतलें होतें व त्यांस तो केवळ बापाप्रमाणें वागवीत असे हें मागें सांगितलेंच आहे. पण त्याचें बापाचें नातें तो एव-ढ्याच गोष्टींत काय तें दाखवीत असे. बाकी, त्यांनीं अमुकच ध्यावें,

किंवा त्यावें, किंवा करावें, वगैरे बाबतींत त्यांच्यावर आपला अधिकार मुळींच चालवीत नसे.

आनंदाची गोष्ट अशी होती कीं, हे जे त्याचे कुटुंबांतील माणसांवर त्याचे अनंत उपकार होते, त्यांची फेड कृतज्ञता व प्रेम ह्यांच्या योगानें जेवढी होण्यासारखी असेल तेवढी तीं करीत असत. आणि त्याच्या सुदैवाची गोष्ट अशी कीं, यापुढें त्याच्या हयातींत त्याच्या प्रिय आप्तांपैकीं कोणीच गमावलें नाहीं. त्याचें मन इतकें कोमळ असे कीं, त्याच्या निकट आप्तांपैकीं जर कोणी दुर्दैवानें त्याच्या देखत गमावलें असतें, तर ती हानि सहन करण्यास त्यास मोठी मारामार पडती. त्याच्या बहिणीचें कुटुंब बाहेर गांवीं कधीं गेलें तरी देखील त्यास कसेंसेंच होत असे; व एकदा त्याच्या लाडक्या बहिणीस व तिच्या मुलीस जरा भयंकर ताप या सुमारास आला होता, तेव्हां तर त्याची त्याबद्दल काळजी करून करून अगदीं त्रेधा उडून गेली.

१८५७ सालीं जेव्हां हिंदुस्थानांत बंड झालें, तेव्हां यास फार दुःख झालें. बंडाचा अखेर परिणाम काय होईल याबद्दल त्यास संशय नव्हता; पण दिल्ली, कानपुर वगैरे ठिकाणीं जी बायाबापड्यांची कत्तल उडाली, ती अर्थात् याच्या मनास फार दुःख देत होती. ह्या दुःखाच्या भरांत त्यास कांहीं सुख होण्यास एक मोठें कारण झालें ते हें कीं, मुख्य प्रधान लार्ड पामर्स्टन ह्याच्या शिफारशीवरून यास राणीनें सरदार केलें, व तेव्हांपासून तो लार्ड मेकाले आव् राथ्ले ( "राथलें" हें त्याच्या जन्मभूमीचें नांव) या पदवीस चढला; व अर्थात् लार्डांच्या सभेचा सभासद झाला.

हा जेव्हां त्या सभेंत प्रथमच गेला तेव्हांच्या सेशनांत एक दोनदां हिंदुस्थानांतील गोष्टींच्या संबंधानें बोलवयाचें यानें मनांत

आणिलें होतें. १८५८ च्या फेब्रुवारींत लार्ड एलेनबरो यानें हिंदुस्थान संबंधी कांहीं कागद हजर करण्याविषयीं प्रधानांस नोटीस दिली. त्याचा हेतु असा होता कीं, हिंदुस्थानांतील बंडाचें कारण हिंदुस्थान सरकारचा लोकांना बाटविण्याचा कल होता हें त्या कागद पत्रावरून सिद्ध करावें. या विषयावर बोलण्याचा मेकालेनें निश्चय केला, पण तो फुकट गेला. कारण लार्ड एलेनबरोचें भाषण व्हावें तेवढें जोरदार झालें नाहीं, व त्याला वरील गोष्टीबद्दल पुरावाहि फारसा आणतां आला नाहीं. शिवाय, लार्ड ग्रानव्हिल यानें त्यास समर्पक उत्तर दिलेंच होतें. ह्मणून हा बोलावयास उठलाच नाहीं. याच वर्षाच्या मे महिन्यांत पुनः एकदा असाच प्रसंग आला होता, व त्या वेळींहि असेंच झालें. लर्ड शाफ्टसबरी हा हिंस्थानांतील खिस्ती धर्माच्या प्रसाराच्या संबंधानें एक अर्ज पुढें आणणार होता, व त्याला प्रसंग पडल्यास उत्तर देण्यास यानें तयारी केली होती. पण लार्ड शाफ्टसबरी यानें त्या संबंधानें फारच थोडक्यांत भाषण केलें, व लार्ड एलेनबरो, जो एवढ्या मुदतींत बोर्ड आव कंट्रोलचा सेक्रेटरी झाला होता, त्यानें थोडक्यांत त्यास उत्तर दिलें. ह्मणून हा न बोलतां मुकाट्यानेंच घरीं आला.

१८५९ साल जेव्हां सुरू झालें तेव्हां मेकालेच्या शांतपणाच्या कारकीर्दीस विघ्न आणण्यासारखी कांहीं गोष्ट घडेल असें कोणाच्या स्वप्नांत देखील नव्हतें. खोकला, दम, छातींत दुखणें, हे त्याचे आजार जरी बरेच कडक होते, तरी तेणेंकरून तो जीवास कंटाळलेला नव्हता, किंवा आतांवरील त्याचें प्रेम कमी झालेलें नव्हतें. १८५८ च्या शेवटीं त्याची भाची मार्गारेट हिचें लग्न त्याचा जुना मित्र लॉर्ड हालंड याच्या मुलाशीं झालें होतें; आणि मि. हालंड हा देखील लंदनांतच रहात असल्यामुळें ह्या लग्नापासून एका प्रियकर

आप्ताचा त्यास वियोग होण्याच्या ऐवजीं त्यानें एक नवेंच घर मोडण्यासारखें झालें होतें. पण ह्या वेळीं अशी कांहीं एक गोष्ट घडून आली कीं, तेणें करून त्याच्या संसारयात्रेचें सर्व स्वरूप एका क्षणांत बदलून घेल्यासारखें झालें. १८५९ च्या जानेवारींत मद्रासच्या गव्हर्नराची जागा त्याचा मेव्हणा ट्रेव्हेल्यन यास मिळाली. त्याप्रमाणें तो पुढच्या महिन्यांत तिकडे निघून गेला; त्याची बायको मागें राहिली होती, पण ती लवकरच तिकडे जावयाची होती; आणि मेकालेस अशी भीति पडली कीं, आपल्या व आपल्या बहिणीचा वियोग होणार तो अखेरचाच होणार. ही भीति जरी त्याला डाक्टरांच्या सांगण्यावरून नव्हे, तर स्वताच्याच मनाच्या स्थितीवरुन उत्पन्न झालेली होती, तरी आपली अखेर आतां फार लांबणीवर पडत नाहीं, असें त्याच्या मनानें पक्केंच घेतलें होतें. १८ फेब्रुवारी रोजीं तो ह्मणतोः—“ मी ट्रेव्हेल्यनचा निरोप घेतला. तो ह्मणाला, तूं मला नेहमीं भावाप्रमाणें वागविलें आहेस. त्याला मी तसें वागविण्याचा यत्न केला हें खचीत आहे. पुनः आमची गांठ पडेल काय ? मला तर आशा नाहींच. माझी प्रकृति जरा बरी आहे; पण पुढच्या दिवाळ्यांत बहुधा माझी उचलबांगडी होईल.” दुसऱ्या एका ठिकाणीं तो ह्मणतो:—मला बरें मुळींच वाटत नाहीं. हा रोग तर माझी परीक्षाच पाहतो आहे. तथापि मी तो सोसतोंच आहें. माझ्या स्वभावाबद्दल ह्मणाल तर तो चीडखोर कधींच झालेला नाहीं; आणि जोंपर्यंत माझी बुद्धि कायम आहे तों पर्यंत जीं दुःखें आपल्या स्वाधीनचीं नाहींत अशा कितीहि दुःखांनीं तो चिडखोर व्हावयाचा नाहीं. आपल्याला कांहीं दुःख होत आहे, एवढ्यावरूनच आप्त व नोकर यांजवर रागावणें हें चांगल्या माणसास शोभत नाहीं, इतकेंच नव्हे, तर ज्याला अकल ह्मणून

आहे, अशा माणसास देखील शोभत नाहीं; पण असल्या चिडखोर स्वभावाचीं इतकी उदाहरणें माझ्या दृष्टीस पडतात कीं मीहि तसाच होईन कीं काय याची भीति मला वाटते. पण मी सावध राहीन; अली-कडे माझ्या मनांत असा विचार वारंवार यावयास लागला आहे कीं, नाटकाचा शेवटचा देखावा लवकरच होणार आहे. माझी अशी इच्छा आहे कीं त्याची बतावणी मला सरळ रीतीनें, पण धैर्य व सौम्यता ही दोन्ही संभाळून, करतां यावी."

जिच्या समागमांत तो आज इतकी वर्षें तिच्या बाळपणापासून व ह्याच्या तरुणपणापासून सारखा राहिला होता तिचा आतां वियोग होणार, व ती हजारों मैलांवर दूर असतांच आपले डोळे मिटणार, हा जो विचार या वेळीं याचे मनांत येऊं लागला, त्याचा त्याच्या त्या अशक्त कृतीवर फार वाईट परिणाम झाला. त्यानें तो धिरानें व बहुतेकांशीं मुकाट्यानें, सहन केला; पण त्याच्या मनाला जो धक्का बसला त्यांतून तो कधीं उठलाच नाहीं. १८६० च्या वसंत ऋतूंतील व उन्हाळ्यांतील त्याच्या दिनचर्येंत त्याच्या मनाच्या स्थितीस अल्प पण फार हृदयद्रावक असे उल्लेख दृष्टीस पडतात.

जुलै महिन्याच्या अखेरीस तो आपल्या बहिणीच्या कुटुंबासहित स्काटलंदांत कांहीं दिवस फिरावयास गेला होता. तो जेथें जेथें गेला तेथें तेथें लोकांनीं त्याचा चांगला सत्कार केला, व प्रत्येकजण ह्याची मूर्ति पहावयास फार उत्सुक असे. स्टेशनांवरून व बंदरां-वरून त्याला बसावयास जागा चांगली द्यावी, याबद्दल सर्वांची उत्कंठा दिसे, व होटेलांत गेला तर वरचेवर असें होई कीं, ह्यानें सांगितली असेल त्यापेक्षां जेवणाची तयारी अधिक चांगली करावी, व मग हा पैसे द्यावयास लागला, ह्मणजे मुळींच घेऊं नये.

ता. २४ आक्टोबर १८५९ रोजीं एलिस यास लिहिलेल्या

पत्रांत मेकाले ह्मणतोः–“ तुह्मा मी निरोप घेतला तेव्हांपासून माझी शरीरप्रकृति फार चांगली आहे; पण माझ्या मनाला फार दुःख झालें आहे, आणि त्याचें विशेष कारण हें कीं, आनंदी दिसण्यासाठीं मी एवढी खटपट करितों. हाना व तिची धाकटी मुलगी फेब्रुवारींत मद्रासेस जाणार हें ठरल्यासारखें झालें आहे. हें त्यांचें करणें बरोबरच आहे ही गोष्ट मला ना ह्मणतां येत नाहीं; आणि त्यांना जें दुःख होत आहे, त्यांत भर पडण्यासारखें जें कांहीं असेल तें मीं टाळावें हें माझें कर्तव्यच आहे. पण मला फारच दुःख वाटतें. तथापि मी वाचतों, लिहितों आणि तासच्या तास माझें दुःख विसरण्याची मी कांहीं तरी युक्ति करितों. पण तें पुनः जागृत होतेंच, व तसें तें होणारच. ”

मेकालेवर जो हा आतां थोडक्याच दिवसांत मोठा प्रसंग येणार होता, तो त्यास अत्यंत असह्य असाच होता; ह्मणून त्यांतून दृढ निश्चयानें व शांत मनानें पार पडण्यासाठीं साधतील तेवढ्या युक्त्या लढवण्याचा त्यानें निश्चय केला. एकसारखे व दीर्घ असे वाचनलेखनादि बुद्धिविषयक श्रम करून आपलें मन सदा उद्योगांत ठेवावयाचें, व आपली मनःसंयमनाची शक्ति दृढ करावयाची, हें तो यापुढें आपलें कर्तव्यच समजून करूं लागला. तो ह्मणतोः—“ हे विचार लिहिण्यांत गुंतून मला हाकलून दिले पाहिजेत;” आणि त्याची शक्ति जरी कमी झाली होती, तरी त्यानें आपलें लिहिण्याचें काम पुनः हातीं घेतलें, व आपल्या इतिहासाचा आणखी एक भाग पुरा होईतोंपर्यंत तें तसेंच नेटानें चालवावयाचें, असा त्यानें बेत केला. आक्टोबर महिन्यांत लांगमनला त्यानें असें लिहिलें कीं, मी हल्लीं नियमितपणानें काम करीत आहें, व पुढचा खंड एकेराच छापावा असा माझा बेत आहे. १४ दिजंबर रोजीं तो लिहितोः—

" १६९९–१७०० चें सेशन एकदा संपलें. मी जें लिहिलें आहे त्यापैकीं बराच भाग वाचकांस मनोवेधक वाटण्यासारखा आहे. कसें झालें तरी हा उद्योग माझ्या हिताचा आहे, आणि लवकरच मला दुसरें कांहीं काम नाहींसें झालें, म्हणजे ह्यापेक्षांहि जास्त बरा तो मला वाटणार आहे. " त्याचे विचार ह्या वेळीं ज्या दुःखदायक मार्गानें जाण्यास फार तयार असत, त्यांतून ते जबरीनें परत वळवावे, असा दृढ निश्चय करून तो आतां विश्रांतीच्या वेळीं देखील नियमानें वाचावयास लागला. मध्यें दोन वर्षे देखील जेव्हां याचें लिहिण्याकडे मन लागत नसे तेव्हां हा वाचनाचें काम सारखें चालवीतच असे; आणि तें वाचन पुनः जुन्या व नव्या याला ज्या अनेक भाषा येत असत त्या सर्वांतील ग्रंथांचें चालावयाचें; आणि शिवाय, शुद्धलेखन, व्याकरण, भाषापद्धति ह्या संबंधाच्या सर्व चुका दुरुस्त करीत, व कोरी जागा सांपडेल तेथें त्या पुस्तकावर टीकात्मक वाक्यें लिहीत, अशा रीतीनें चालावयाचें. या वेळीं देखील त्यानें ह्याच क्रम सुरू केला. मद्रासेस आपली बहीण जावयास अमुक अमुक दिवशीं निघणार, असें यास समजल्यापासून दुसऱ्या दिवशीं " निकलकृत ग्रंथकर्त्यांच्या संबंधाच्या गोष्टी " हा नव खंडांचा, व प्रत्येक खंडाचीं बारीक टैपानें छापलेलीं सात आठशें पानें आहेत असा, जंगी ग्रंथ वाचावयास त्यानें सुरवात केली. अठराव्या शतकांतील ज्ञान व गप्पागोष्टी ह्यांचा जो हा विशाल निधि, तो तो इतक्या बारीक रीतीनें वाचूं लागला कीं, ज्यांस असल्या ग्रंथाची नवी आवृत्ति काढावयाची नसेल असे फारच थोडे लोक तो तशा रीतीनें वाचूं शकतील;—चुका शुद्ध करावयाच्या, मध्यें कांहीं लिहावयाचें राहिलें असेल तें तेथें घालावयाचें, व्याकरण व लेखनसरणी ह्या संबंधी दोष असतील ते दाखवाव-

याचे, व पृष्ठाच्या प्रत्येक कोऱ्या भागावर मनोरंजक व बोधपर असे टीकात्मक चुटके पेन्सिलीनें खरडावयाचे. प्रत्येक आठवड्यास एक खंड या रीतीनें त्यानें तें काम सारखें चालवून १७ आक्टोबर पासून २१ दिजंबर पर्यंत त्यानें तो सर्व ग्रंथ वाचून व टिपा लिहून पुरा केला.

त्याच्या कारकीर्दीच्या ह्या अमदानींत मेकाले जावत्कालपर्यंत आपल्या लायब्ररींत असे, तावत्कालपर्यंतच तो खरोखर कमींत कमी दुःखी असा असे; कारण जीं आतां लवकरच आपल्यास सोडून जाणार असें त्यास वाटत होतें, त्यांच्या समागमांत तो असला ह्मणज त्याला जें सुख होई, त्या सुखावर या विचाराचें पटल तेव्हांच येई, व त्यावर एकदम विरजण पडे. तो लिहितोः—"माझ्या मनांत हल्लीं बहुतेक अशीच इच्छा उत्पन्न व्हावयास लागली आहे कीं, जें होणार ह्मणून ठरलें आहे तें आतांच होईल तर बरें. वियोग झाल्यानंतरच्या कालांत जें मला दुःख होणार आहे, त्यापेक्षां हे चार महिनेच मला ज्यास्त जड होऊं लागले आहेत. हा लांबणीवर पडलेला जो वियोग आहे, हें जें आम्ल व कटुरसाचें हळूहळू चाखणें चाललें आहे—तेंच फार भयंकर आहे." त्याचा भाचा ह्मणतोः—भविष्यकाल त्याला खरोखर फार भयंकर होता; पण ज्या ईश्वरानें त्याजवर इतके दिवस कृपा केली होती, त्यानें अगदीं शेवटपर्यंत त्याजवर तशीच आपली कृपा दृष्टि ठेविली, आणि त्याच्या शक्तीच्या पलीकडे त्याचें ओझें त्यानें वाढूं दिलें नाहीं.

"शुक्रवार, दिजंबर १६. आज सकाळपासून माझ्या आयुष्यांतील अत्यंत कमी सुखाचे दिवस सुरू झाले, असें मी समजतों. औषध घेतलें तें घेणें जरूरच होतें; पण तेणेंकरून माझी प्रकृति फार हलक झाली. आज थंडी फारच होती, व तेणेंकरून माझ्या

रुधिराभिसरणास व्यत्यय आला. नाडी सारखी न वाहणें एवढी गोष्ट खेरीज करून बाकी सर्व वेदना १८५२ त जेव्हां मला क्लिफ्टन येथें जावें लागलें तेव्हांसारख्याच झाल्या आहेत. निरुत्साह, अशक्तपणा, छाती दडपून जाणें, सारख्या श्रमाचें कोणतेंहि काम करतां न येणें, हीं सर्व फार दुःखदायक होतीं. थोडके शब्द लिहिण्यापासून देखील मला त्रास होतो; तथापि जर्मन, ल्याटिन व इंग्लिश ह्या भाषांतील ग्रंथ मी वाचले, व दिवस बऱ्याच रीतीनें पार पाडिला."

"दिजंबर १७—फारच कडक थंडी. आमच्या ह्या देशांत यापेक्षां थंड हवा फारच क्वचित् आजपर्यंत कधीं पडलेली असेल. मी मार्टिनला बोलावून आणिलें, व माझी सर्व हकीकत सांगितली. पण तो ह्मणतो कीं हृत्कमलांत इंद्रियांचा कांहीं बिघाड झालेला नाहीं, फक्त हृदय दुर्बल झालें आहे."

"दिजंबर १९—अद्यापि पाणी गोठणारी अत्यन्त कडक थंडी आहेच. छाती तर इतकी धडधडते आहे कीं, आज माझ्यानें वस्तादेखील हातांत धरवेना. मला असें वाटतें कीं गेल्या गुरुवारपासून मी वीस वर्षांनीं ज्यास्त वृद्ध झालों आहें. मला वाटतें कीं जणूं काय मी वृद्ध होऊनच मरत आहें. माझी अगदीं तयारी आहे, व यापेक्षां अधिक तयारी माझी कधींच नसेल. हल्लीं जसे मला कंठावे लागत आहेत तसा जर आणखी एक महिना घालवावा लागला, तर गिरणींत काम करून थकलेल्या पोराप्रमाणें, आपल्या लहानशा खोपटांत केव्हां शिरेन असें मला होईल."

"बुधवार, दिजंबर २१—हवा अगदीं बदलली; गोठलेलें पाणी व बर्फ सर्व निघून गेलीं; पाऊस फार पडत आहे; नैऋत्येकडून ढग येऊन आकाशांतून झपाट्यानें पळत आहेत; उन्ह

पडले, व ते इतकें कोंवळें होतें कीं, मी ओटीवर धीर करून गेलों, पण माझी प्रकृति मुळींच बरी नव्हती. माझे दोन डाक्टर, वाटसन व मार्टिन, हे एकमेकांचा सल्ला घ्यावयास आले. त्यांचें मत असें पडलें कीं, माझा आजार हृदयाचें दुखणें एवढाच काय तो आहे. हृत्कमलाच्या क्रियेला जर जोर आला, तर बाकीचे बहात्तर रोग एकदम पळतील. त्याचें मत कदाचित् बरोबर असेल, पण मला मात्र अगदीं अशक्त अशक्त वाटत आहे, अगदीं लहान मुलाप्रमाणें दुबळें वाटतें आहे. तरी नेहमीपेक्षां घाबरेपणा कमी आहे. आज कांहीं दिवस मी अश्रू मुळींच ढाळले नाहींत, जरी, बिचारा कौपर ह्मणतो त्याप्रमाणें, माझे अश्रू ढाळण्यास केवळ माझ्या परवानगीची वाट पहात असतात. बुद्धीच्या संबंधानें मुळींच क्षीणता मला झालेली वाटत नाहीं; अल्पतम देखील नाहीं."

"शुक्रवार, दिजंबर २३. केव्हां मरण येईल याचा कांहीं नेम नाहीं, असे ह्मणतात तें खरें. आज सकाळीं खोलींतून बाहेर पडलों असेन नसेन, इतक्यांत वरचा छताचा चुना धडाधड खालीं आला. जर मी आणखी थोडीं मिनिटें देखील आंत असतों, तर बहुधा मी घाबरूनच गेलों असतों, कदाचित मेलोंहि असतों. मी शेकोटी जवळच बसलों, लिहिण्याचे श्रम केले नाहींत, तर वाचण्यांतच वगैरे वेळ घालविला......."

ह्यापुढें मेकालेनें आपली दिनचर्या लिहिली नाहीं. पुढें दोन दिवसांनीं त्यानें एलिसला लिहिलें: "डाक्टर ह्मणतात कीं माझ्या प्रकृतींत सुधारणा आहे; पण माझें मला तसें कांहींच वाटत नाहीं. परवां मला अगदीं शुद्ध घेरी आली, व मी अगदीं बेशुद्ध पडलों. तशीच जर बेशुद्धि राहिली असती, तर किती बरें झालें असतें! पण मी बर उठलों; आणि दोघांहि डाक्टरांचें असें ह्मणणें पडतें कीं

त्यांत विशेष कांहीं नाहीं." तथापि एव्हांपासून मेकालेची प्रकृति अगदीं स्पष्ट रीतीनेंच ज्यास्त ज्यास्त बिघडत चालली. त्याची बहीण लिहिते:—" नाताळचा दिवस मी त्याच्या बरोबर घालविला. तो फारच थोडें बोलला, व वरचेवर त्याला झोंप येई. नेहमीच्या शिरस्त्याप्रमाणें नाताळचें भोजन त्याच्याकडेच आमचें झालें, व दुसऱ्या दिवशीं तो मला जरा बरासा वाटला. त्या दिवशीं मी त्याला सोडून आलें याबद्दल जें मला दुःख वाटत आहे, त्याचा माझ्या जीवांत जीव आहे तोंपर्यंत मला कधीं विसर पडणार नाहीं. पण तेव्हां मला शंका आली नाहीं. मला वाटलें कीं, छत पड-ल्यामुळें त्याच्या मनाला धक्का बसला होता, त्यांतून तो आतां हळूहळू बरा होत आहे, आणि तो व मी जेव्हां एकटींच असूं तेव्हां तो इतका रडूं लागे कीं, मला वाटलें कीं, त्याची प्रकृति जरा सुधारेपर्यंत त्याच्याशीं फार बसण्याचें टाळणें हेंच बरें." त्याचा भाचा म्हणतो:—मेकालेला लवकरच अत्यन्त भीति आहे, हें आमच्या लक्षांत कसें आलें नाहीं ह्याचें कदाचित् कोणास आश्चर्य वाटेल; पण खरी गोष्ट अशी आहे कीं, त्याचें स्पष्ट दिसणारें जें मानसिक दुःख तें आमच्या पुढें इतकें नेहमीं असे कीं, त्यामुळें त्याच्या शारीरिक दुःखाकडे आमचें लक्ष जावें तितकें गेलें नाहीं. त्याचें मौन व निरुत्साह ह्याचें वास्तविक कारण शारीरिक वेदना हें होतें, पण आम्हास वाटलें कीं, त्याचें बहुतेक सर्व कारण मानसिक वेदना हेंच आहे.

मेकालेच्या ह्या शेवटच्या दिवसांच्या तात्कालिक एका वृतान्तांत असें सांगितलें आहे कीं, बुधवार ता. २८ दिसेंबर या दिवशीं त्याला इतकी शक्ति वाटत होती कीं, एका गरीब धर्मोपदेशकाच्या नांवानें त्यानें एक पत्र देखील लिहविलें; त्याबरोबर त्यानें त्यास पंचवीस

पौंड पाठविले होते; मात्र ह्या पत्रावर सही केल्यानंतर त्यानें आपलें नांव पुनः कांहीं लिहिलें नाहीं. त्याचा भाचा ह्मणतो:—" त्याच दिवशीं सायंकाळच्या सुमारास मी त्याच्या वाड्यावर गेलों, व माझा बेत तेथें जेवणाचें आमंत्रण लावावें हा होता; पण लायब्ररींत शिरल्या-बरोबर तो बेत जशाचा तसाच राहिला. माझा मामा बसला होता, त्याचें डोकें छातीवर ओंथंबलें होतें; व तो मंद व अर्धवट झोंपेच्या तंद्रींत असा होता. कार्नहिलमागाझिनचा ( मासिकपत्र ) पहिला अंक त्याच्यापुढें उघडा पडला होता; तिकडे त्याचें कांहीं लक्ष नव्हतें. विचारल्या प्रश्नाचें उत्तर देणें ह्या शिवाय तो एकहि शब्द बोलला नाहीं; व मी जें त्याच्याशीं कांहीं बोललों त्यापैकीं एका वाक्यानें त्याच्या मनांत असे कांहीं हृदयद्रावक व दुःखकारक विचार आले कीं, तो रडूं लागला.

' त्याच्या प्रकृतीची ही हकीकत माझ्या तोंडून ऐकून, माझ्या आईनें ती रात्र त्याच्याच घरीं घालविण्याचा निश्चय केला. ती निघण्याची तयारी करीत होती ( मला वाटतें त्यावेळीं सात वाजा-वयास थोडासा अवधि असावा ), इतक्यांत एक नोकर अगदीं घाई घाईनें आह्मास बोलवण्यासाठीं आला. आमच्या मामाच्या घराच्या दरवाजापाशीं आमची गाडी जाऊन पोहोंचतें न पोहों-चतें तों दासी काळोखांत आमच्याकडे रडत आल्या, व आम्ही समजलों कीं सर्व कारभार आटोपला. आम्ही गेलों तों तो लायब्ररींतच होता; तो आपल्या आराम खुर्चीवर बसलेला होता, व त्यानें पोषाक नेहमीं सारखाच केलेला होता. त्याच्या जवळ टेबलावर त्याच पुस्तकाचें तेंच पान उघडें होतें. मरणापूर्वी त्यानें आपल्या बटलरास सांगितलें कीं मी आज थकलों आहे, तेव्हां लवकरच निजावयास जाणार. बटलरानें त्यास असें ह्मटलें, एथेंच

कोचावर पडला. तेथेंच निजतों म्हणून तो उठला, पुनः खालीं बसला, व त्याचा श्वासोश्वास बंद पडला. आपल्यास अनायासें मरण यावें अशी त्याची नेहमी इच्छा असे, तसेंच त्यास मरण आलें;— दुःखाविना, सेवाचाकरी घेतल्याविना; त्याच्या सर्व प्रियकर आप्तांच्या आधीं; आणि मागें एवढें मोठें सन्मान्य नांव, व असें कीर्तिमय चरित ठेवून कीं, ज्यांतील प्रत्येक कृत्य त्याच्या ग्रंथांतील प्रत्येक वाक्याइतकें स्पष्ट व स्वच्छ. "

याच्या मरणाची वार्ता जेव्हां बाहेर पडली तेव्हां सर्वांस वाईट वाटलेंच; पण आश्चर्यहि वाटलें. त्याच्या आप्तांस तर अत्यन्त दुःख झालें हें सांगणें नलगेच. त्याची बहीण लिहिते: " आमच्या गृहांतील दीप विझून गेला आहे, आमचा अत्यन्त कोमल, प्रियकर, उदार, परोपकारी, व अनन्यपर असा मित्र निघून गेला आहे. आज पन्नास वर्षें तो काय होता हें मी कसें सांगूं शकेन. मी व माझीं, ह्यांच्यावर किती तरी प्रेम त्यानें ओतावें ! तो माझें अंतःकरण व बुद्धि ह्या दोहोंना व्यापून राहिलेला असल्यामुळें तो गेल्यानें केवढी जागा रिकामी झाली आहे, हें दुसऱ्या कोणासहि समजावयाचें नाहीं; कारण अशा माणसाच्या प्रिय समागमांत मी जें सुखाचें आयुष्य घालविलें, तसें कोणी कधीं तरी घालविलें असेल काय ? "

त्यास ९ जानेवारी १८६० रोजीं वेस्टमिन्स्टरआबेमध्यें पुरलें. त्याचे प्रेतयात्रेस ड्यूक आव् आर्गाइल, लार्ड जान रसेल, लार्ड स्टानोप, लार्ड कार्लाइल, बिशप विल्बरफोर्स, सर डेव्हिड डंडस, सर हेन्री हालंड, डीन मिल्मन, कामन्स सभेचा स्पीकर, इत्यादि बडबडी मंडळी हजर होती. त्याच्या थडग्यावर असा लेख आढळतो. "त्याचें शरीर एथें पुरलें आहे, पण त्याचें नांव अजरामर आहे. "

समाप्त.